**प्रकाशक** : **अजीत सी. पटेल**
**दादा भगवान विज्ञान फाउन्डेशन**
1, वरूण अपार्टमेंट, 37, श्रीमाळी सोसायटी,
नवरंगपुरा पुलिस स्टेशनच्या समोर, नवरंगपुरा,
अहमदाबाद - 380009, Gujarat, India.
**फोन** : +91 79 3500 2100, +91 9328661166/77



**प्रथम आवृत्ति** : 1000 प्रती फेब्रुवारी, 2025

**भाव मूल्य** : 'परम विनय' आणि
'मी काहीच जाणत नाही', हा भाव!

**द्रव्य मूल्य** : 150 रुपये

**मुद्रक** : अंबा मल्टीप्रिंट
एच.बी.कापडिया न्यू हाइस्कूलच्या समोर,
छत्राल-प्रतापपुरा रोड, छत्राल,
ता. कलोल, जि. गांधीनगर-382729, गुजरात
**फोन** : +91 79 3500 2142

**ISBN/eISBN** : 978-93-91375-69-0

**Printed in India**

# त्रिमंत्र







नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं

नमो आयरियाणं

नमो ऊवज्झायाणं

नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं

पढमं हवइ मंगलं ॥ १ ॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ २ ॥

ॐ नम: शिवाय ॥ ३ ॥

जय सच्चिदानंद



## दादा भगवान कोण?

जून 1958 संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रूपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्भुत आश्चर्य! एका तासात त्यांना विश्वदर्शन लाभले! मी कोण? भगवंत कोण? जग कोण चालवित आहे? कर्म म्हणजे काय? मुक्ती कशाला म्हणतात? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षुनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्भुत ज्ञान प्रयोगाद्वारे! त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानी पुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोकाचे' नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! मी स्वत: भगवान नाही. माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो.''

## आत्मज्ञान प्राप्तीची प्रत्यक्ष लींक

परम पूज्य दादा भगवान (दादाश्री) यांना 1958 मध्ये आत्मज्ञान प्रकट झाले. त्यानंतर 1962 ते 1988 पर्यंत देश-विदेश परिभ्रमण करून मुमुक्षुंना सत्संग आणि आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत.

दादाश्रींनी आपल्या हयातीतच आत्मज्ञानी पूज्य डॉ. नीरूबहन अमीन (नीरूमा) यांना आत्मज्ञान प्राप्त करवून देण्याची ज्ञानसिद्धी प्रदान केली होती. दादाश्रींच्या देहविलयानंतर नीरूमा त्यांच्याप्रमाणेच मुमुक्षुंना सत्संग व आत्मज्ञान प्राप्ती निमित्त भावाने करवित असत.

आत्मज्ञानी पूज्य दीपकभाई देसाई यांना सुद्धा दादाश्रींनी सत्संग करण्याची सिद्धी प्रदान केली होती. वर्तमानात पूज्य नीरूमांच्या आशीर्वादाने पूज्य दीपकभाई देश-विदेशात निमित्तभावाने आत्मज्ञान प्राप्ती करवित आहेत.

या आत्मज्ञान प्राप्तीनंतर हजारो मुमुक्षु संसारात राहून, सर्व जबाबदाऱ्या सांभाळत असताना सुद्धा आतून मुक्त राहून आत्मरमणतेचा अनुभव घेत आहेत.

# निवेदन

ज्ञानी पुरुष संपूज्य दादा भगवान यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहारज्ञाना संबंधीत जी वाणी निघाली, तिला रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून पुस्तकाच्या रूपाने प्रकाशित केले जात आहे. विभिन्न विषायांवर निघालेल्या सरस्वतीचे अद्‌भुत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे नवीन वाचकांसाठी वरदान रूप सिद्ध होईल.

प्रस्तुत अनुवादामध्ये विशेष लक्ष ठेवलेले आहे की प्रत्येक वाचकाला दादाश्रींची प्रत्यक्ष वाणीच ऐकली जात आहे असा अनुभव व्हावा. याच कारणाने कदाचित काही ठिकाणी अनुवादाची वाक्य रचना मराठी व्याकरणानुसार त्रूटीपूर्ण जाणवेल, परंतु तिथे जर आशय समजून वाचण्यात आले तर अधिक लाभदायी होईल.

प्रस्तुत पुस्तकात काही ठिकाणी कंसात दर्शविलेले शब्द किंवा वाक्य दादाश्रींद्वारा बोलल्या गेलेल्या वाक्यांना अधिक स्पष्टतापूर्वक समजावण्यासाठी लिहिले गेले आहेत. तसेच काही ठिकाणी इंग्रजी शब्दांना मराठी अर्थाच्या रूपात ठेवले गेले आहेत. दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेले काही शब्द जसेच्या तसेच *इटालिक्स* मध्ये ठेवलेले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठी भाषेत असे शब्द नाहीत की जे त्याचा पूर्ण अर्थ देऊ शकतील. तरी पण त्या शब्दांचे समानर्थी शब्द कंसात तसेच पुस्तकाच्या शेवटी पण लिहिले गेले आहेत.

ज्ञानींच्या वाणीला मराठी भाषेत यथार्थ रूपाने अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा आशय जसा आहे तसा तर आपल्याला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म समजायचे असेल त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी असा आमचा अनुरोध आहे. अनुवादासंबंधी उणीवांबद्दल आपले क्षमा प्रार्थी आहोत.



# मंगलाचरण

निज स्वभाव से सद्‌गुरु, अगुरु–लघु सर्वज्ञ हैं,
सूक्ष्मतम सिद्ध परम्‌गुरु, सत्यम् निश्चय वंद्य हैं.

तैंतीस कोटि देवगण, विश्वहितार्थ स्वागतम्,
जग कल्याणक यज्ञ में मंगलमय दो आशीषम्.

सिद्ध स्वरूपी मूर्तमोक्ष, गलती–भूल की माफी दो,
व्यवहार में सद्‌बुद्धि हो, निश्चय में अभिवृद्धि दो.



# समर्पण

ओहोहो! ही अक्रमिक आप्तवाणी,
उपसून काढी अज्ञान अंधार, तेज सरवाणी.
संतप्त हृदय शांत करुनी बनविते आत्मसन्मुखी,
प्रत्येक शब्द करविते आंतरसूझ उर्ध्वपरिणामी.

विश्वसनीय आत्मार्थ, संसारार्थ प्रमाणित,
मोक्षपथावर एकमेव दीपस्तंभ समान ठरली.
पसरविते सदैव प्रकाश, ओहोहो! महाउपकारी,
उघडून डोळे हे पथिक! चालू लाग, ठोकरा टाळूनी.

दिव्यातिदिव्य आप्तपुरुष अक्रम विज्ञानी,
'दादा' श्रीमुखातून वाहिली वीतरागी वाणी.
ओहोहो! जगकल्याणार्थ अद्‌भुत हा उपहार,
केवळ कारुण्यभावे समर्पित विश्वचरणी आज.



# संपादकीय

वाणी ऐकण्याचे प्रसंग तर खूप आले, पण ती वाणी केवळ कान किंवा मनाला स्पर्श करून निघून गेली. पण हृदयस्पर्शी वाणी ऐकण्याचा योग मात्र कधी आलाच नाही. अशी हृदयस्पर्शी वाणी की जी सरळ आत उतरून सर्व अज्ञानजन्य मान्यतांना पूर्णपणे फ्रॅक्चर करून सम्यक् दृष्टी खुली करते, जी सतत क्रियाकारी बनून ज्ञान-अज्ञान यातील फरक प्रकाशमान करीत राहते, अशी दिव्यातिदिव्य अद्‌भुत वाणी तर जिथे परमात्मा संपूर्ण रूपात, सर्वांग रूपात प्रकट झाले आहेत तिथेच प्रकट होत असते!! अशा दिव्यातिदिव्य वाणीचा अपूर्व संयोग वर्तमानात प्रकट 'ज्ञानी पुरुषां'च्या श्रीमुखातून उपलब्ध झाला आहे! त्या वेधक वाणीची अनुभूती प्रत्यक्ष ऐकणाऱ्याला तर होतेच, पण वाचणाऱ्याला देखील अवश्य होते!

ज्यांचे दर्शन केवळ आत्मस्वरूपाचेच नाही, तर व्यवहारातील प्रत्येक क्षेत्रात चारीबाजूंनी पोहोचून, त्या प्रत्येक क्षेत्राला, त्या-त्या वस्तूच्या सर्व कोपऱ्यांना आणि तिच्या सर्व अवस्थांना प्रकाशित करू शकते, व तिला 'जसे आहे तसे' वाणीद्वारे सांगू शकते, अशा 'ज्ञानी पुरुषां'च्या अनुभवासहित निघालेल्या वाणीचा सर्वांना लाभ होवो, या हेतूने आप्तवाणी श्रेणी-7 मध्ये त्यांच्या जीवन व्यवहारासंबंधी निघालेल्या वाणीचे संकलन केले गेले आहे. जीवनातील अगदी सामान्यातील सामान्य घटनेला 'ज्ञानी पुरुष' ज्या दृष्टीने पाहतात, तिचे वर्णन ज्या साध्या-सरळ भाषेत करतात, त्या-त्या घटनांशी संबंधित व्यक्तींच्या मन-बुद्धी-चित्त-अहंकार वाणी तसेच वर्तनाला 'जसे आहे तसे' पाहून आपल्या समोर त्याचे हुबेहुब तादृश्य वर्णन करतात.

'भोगतो त्याची चूक' 'जाणूनबुजून फसणे', 'कमी नाही, जास्तीही नाही', 'फ्रॅक्चर झाले की जुळले?' 'वाट पाहण्यातील जोखीम', 'जगाविषयी निर्दोष दृष्टी', अशा अनेक मौलिक, स्वतंत्र आणि 'मोस्ट प्रॅक्टिकल' व्यावहारिक चाव्या 'ज्ञानी पुरुषा'द्वारे प्रथमच जगाला मिळत आहेत.

प्रस्तुत ग्रंथामध्ये ज्ञानी पुरुषांच्या त्या हृदयस्पर्शी वाणीचे संकलन करण्यात आले आहे. आणि यात अशा काही घटना सविस्तरपणे प्रकाशित केल्या गेल्या आहेत. त्यामुळे प्रत्येक सूज्ञ वाचकाला स्वत:च्या जीवन व्यवहारात एक नवीच दृष्टी, नवेच दर्शन आणि नवीनच विचारक दशा, यांच्या नव्यानव्या कड्या स्पष्ट होण्यासाठी सहाय्यभूत होतील, असा अंतरआशय आहे.

'ज्ञानी पुरुषां'ची वाणी उदयाधीन रूपाने, द्रव्य-क्षेत्र-काळ आणि समोरच्या व्यक्तीच्या भावाधीन निघते आणि तरी देखील जगत् व्यवहाराच्या वास्तविक नियमांना प्रकट करणारी, तसेच सदैव अविरोधाभासी असते. सूज्ञ वाचकांना या वाणीत विरोधाभासाची क्षती भासली तर ती फक्त संकलनामुळेच असू शकते!

**- डॉ. नीरूबहन अमीन**

# उपोद्घात

जीवनात रोज घडणाऱ्या साध्या-सरळ घटनांमध्ये अज्ञानदशेत कषायांचा स्फोट कसा होतो, कोणत्या संयोगांमध्ये होतो, त्याची गुप्त आणि दिसणारी कारणे काय आहेत? त्यावर उपाय काय? आणि अशा कषायांचा स्फोट झाला तर त्यावेळी वीतराग कसे राहता येईल? याच्या सर्व चाव्यांची सुंदर, सरळ आणि सहज अंतरंगात उतरेल अशी समज, सटीक उदाहरणांसह इथे प्रकट केली गेली आहे.

घटना भले अगदी साधी असेल, आपण अनेक वेळा अनुभवली असेल किंवा ऐकली असेल, पण त्या घटनेच्या वेळी स्वत:वर आणि समोरच्यावर होणाऱ्या आंतरिक सूक्ष्म प्रकियांचे विश्लेषण ज्या प्रकारे 'ज्ञानी पुरुषां'नी केले आहे, तसे तर केव्हाही आणि कुठेही आढळले नाही. अरे! त्यांना प्रत्यक्ष ऐकणाऱ्यांना देखील वेगवेगळ्या ठिकठिकाणी त्यांना सूचित केलेली रहस्ये दृष्टिगोचर होऊन पुन्हा विस्मृतही होतात. ती सर्व इथे एकत्रित करून संकलित केल्याने, सर्वांगाने तो व्ह्यू पॉइंट स्पष्ट होतो, आणि त्याचे हे विश्लेषण सूज्ञ वाचकांसाठी त्यांच्या जीवनातील प्रत्येक घटनेच्या वेळी दीपस्तंभासारखे बनेल!

## 1. जागृती गुंतागुंतीच्या जीवनात...

रात्रंदिवस या संसारात मार खातात, (दु:खे सोसतात, फटके खातात) तरी संसार गोड लागतो, हेही आश्चर्यच आहे ना! मार खातो आणि विसरून जातो, त्याचे कारण आहे मोह! मोह त्याला घेरतो! डिलिव्हरीच्या वेळी (प्रसवकाळी) स्त्रियांना जबरदस्त वैराग्य येते, पण बाळाला पाहिल्याबरोबर त्या सर्व काही विसरतात आणि दुसऱ्या बाळाची वाट पाहतात! मायेचा मार म्हणजे स्वत:च्या स्वरूपाच्या अज्ञानामुळे ओढवून घेतलेला संसार, आणि त्याचाच मग मार खातात. सेल्सटॅक्स, इन्कमटॅक्स, भाडे, व्याज, बायको-मुलांचे खर्च, या सर्व तलवारी डोक्यावर लटकत राहतात, रात्रंदिवस! तरीही अक्रम विज्ञान तुम्हाला या सर्वांपासून निरंतर निर्लेप ठेवून परमानंदात ठेवते! स्वरूप ज्ञानामुळेच जंजाळातून सुटू शकतो! जीवनात 'काय हितकर आहे आणि काय नाही' याचे सार

काढता आले पाहिजे. विवाह करण्यापूर्वी 'विवाहाचा परिणाम वैधव्य' आहे. हे लक्षात असलेच पाहिजे! दोघांपैकी एकाला तरी कधी न कधी वैधव्य येणारच ना?

अब्रुदार तर त्याला म्हणावे की ज्याचा सुगंध चारी दिशांना दरवळतो! पण हा तर घरातच दुर्गंध पसरवत असतो मग बाहेरच्यांबद्दल काय बोलावे?

नक्कल करणाराच्या कधीही दरारा राहत नाही! बाहेर गेल्यावर रुबाब दाखविण्यासाठी हाताने पॅन्ट थोपटत राहतो! अरे, तुझ्याकडे पाहण्यासाठी कोणी रिकामे बसलेले नाही! सगळे आपआपल्या चिंतेत व्यस्त आहेत.

स्वत:चे हित केव्हा होईल? तर दुसऱ्यांचे हित कराल तेव्हा! सांसारिक हित म्हणजे नैतिकता, प्रामाणिकपणा, कषायांची नॉर्मालिटी, कपटरहितपणा आणि आत्म्याचे हित म्हणजे मोक्षप्राप्तीच्याच मागे लागणे!

## 2. लक्ष्मीचे चिंतन?!

साधारणपणे समाजात लक्ष्मीसंबंधी प्रचलित चुकीच्या मान्यता कुठे कुठे, कशाप्रकारे माणसात अधोगतीचे बीज पेरून टाकतात याचे सुंदर चित्रण 'ज्ञानी पुरुष' प्रस्तुत करत आहेत, आणि

*'लक्ष्मी, हे तर बायप्रॉडक्ट आहे.'* – **दादाश्री**

असे म्हणून लक्ष्मीच्या प्रॉडक्शनमध्ये गढून गेलेल्या लोकांचे डोळे उघडतात आणि आयुष्यभराच्या मजुरीचे एकाच वाक्यात बाष्पीभवन करून टाकतात. एवढेच नव्हे, तर आत्मा प्राप्त करून घेणे हेच मेन (मुख्य) प्रॉडक्शन आहे, ही समज पक्की करून देतात!

लक्ष्मीचा संग्रह करणाऱ्यांना ते लालबत्ती दाखवतात आणि सांगतात, या काळातील लक्ष्मी क्लेशकारक आहे, ती खर्च होऊन जाणेच उत्तम आहे. त्यातही जर धर्माच्या मार्गाने खर्च झाली तर सुख देऊन जाईल आणि अधर्माच्या मार्गी खर्च झाली तर रोमारोमात दु:ख देऊन जाईल. अधर्मानेही तितकीच लक्ष्मी मिळेल आणि धर्मानेसुद्धा तितकीच लक्ष्मी

मिळेल, तर मग अधर्माने वागून हा जन्म आणि पुढील जन्म का बिघडवायचा?

लक्ष्मी मिळवण्यासाठी विचार करायचे नसतात. घाम आणण्यासाठी कोणी विचार करतो का? असे सुंदर पण यथार्थ उदाहरण 'ज्ञानी पुरुष' किती सुंदर प्रकारे फिट करतात.

लक्ष्मी प्राप्त करण्यात रेसकोर्स मुख्य भूमिका निभावतो, ज्याचा परिणाम फक्त धापा टाकून मरण्याशिवाय दुसरा काहीच होत नाही.

लक्ष्मीसाठी, 'संतोष ठेवला पाहिजे, संतोष ठेवला पाहिजे' असे नगारे प्रत्येक उपदेशक वाजवितात, पण 'ज्ञानी पुरुष' तर म्हणतात की संतोष ठेवायचा असेल तरी ठेवता येणारच नाही! आणि तो आपला रोजचाच अनुभव आहे. एवढेच नाही, तर संतोषाचे एक्झॅक्ट वैज्ञानिक रहस्य उघड करतात की,

*'जितके ज्ञान असेल, तितक्या प्रमाणात स्वाभाविकपणे संतोष राहीलच. संतोष ही करण्याची गोष्ट नाही, तो तर परिणाम आहे.'*

– **दादाश्री**

लक्ष्मीचे ध्यान आत्मध्यानात किंवा धर्मध्यानात बाधक होते. कारण...

*'फक्त लक्ष्मीचेच ध्यान कधी केले जाते का? एकीकडे लक्ष्मीचे ध्यान असेल तर दुसरीकडचे ध्यान करणे राहून जाते.स्वतंत्र ध्यानात तर फक्त लक्ष्मीचेच काय पण स्त्रीचे ध्यानही करू नये, स्त्रीचे ध्यान केले तर स्त्रीसारखा होईल! लक्ष्मीचे ध्यान केले तर चंचल होईल. लक्ष्मी चलित आणि तो ही चलित! लक्ष्मी तर सतत सगळीकडे फिरत राहते, तसाच तो देखील सगळीकडे फिरत राहील. लक्ष्मीचे ध्यान करूच नये. ते तर सर्वात मोठे रौद्रध्यान आहे.'*

– **दादाश्री**

लक्ष्मीच्या चिंतनामुळे सूक्ष्म स्तरावर जे भयंकर परिणाम होतात ते ज्ञानींशिवाय कोण स्पष्ट करू शकणार? लक्ष्मीची अधिक आशा करणे म्हणजे समोरच्याच्या ताटातून अन्न हिसकावून घेण्यासारखा गुन्हा आहे, ही जोखीम कोणाला समजते का?

रात्रंदिवस लक्ष्मीची भक्ती करणाऱ्या लोकांवर 'ज्ञानी पुरुष' प्रहार करताना म्हणतात की,

*'तर मग महावीरांची भक्ती करणे बंद झाले आणि ही भक्ती सुरू झाली, असेच ना? मनुष्य एकाचीच भक्ती करू शकतो एक तर पैशांची किंवा आत्म्याची. एका व्यक्तीचा उपयोग एकाचवेळी दोन ठिकाणी राहू शकत नाही. दोन ठिकाणी उपयोग कसा राहू शकेल?'*
– **दादाश्री**

एका म्यानात दोन तलवारी राहू शकत नाहीत. आयुष्यभर भगवंताला विसरून फक्त लक्ष्मीच्याच मागे लागून धावला, पडला, ठेचा खाल्या, गुडघे सोलले गेले तरी पण धावायचे चालूच ठेवले, पण शेवटी मिळाले काय? पैसे सोबत घेऊन जाता आले का? लक्ष्मी जर सोबत घेऊन जाता येत असती, तर शेठ तीन लाखांचे कर्ज करून पैसे सोबत घेऊन गेले असते आणि मग मुले ते कर्ज फेडत राहिली असती! असे अद्भुत उदाहरण देऊन 'ज्ञानी पुरुष' लक्ष्मीच्या पुजाऱ्यांना जबरदस्त शब्दरूपी फटके मारतात! या उदाहरणाचे वर्णन करताना शेठजीची रूपरेखा, त्यांचे डिजाइन, त्यांच्या मनाचा कंजुषपणा, यांचे सारे वर्णन शब्दांद्वारे करतात, पण ऐकणाऱ्यां-वाचणाऱ्यांना मात्र त्यांचे हुबेहुब चित्र नजरे समोर दिसते! 'ज्ञानी पुरुषां'ची ही विलक्षण खुबी आहे, आणि त्यामुळे समोरच्याचे फक्त मनच नाही, तर चित्त देखील मुग्ध होते!

ज्ञानी पुरुष लक्ष्मीसाठी रात्रंदिवस मेहनत करणाऱ्यांचे एकाच वाक्याने छेद उडवून टाकतात.

*'लक्ष्मी तर पुण्यशालींच्या मागे मागे फिरत राहते आणि मेहनत करणारे लोक लक्ष्मीच्या मागे मागे फिरत राहतात!'* –**दादाश्री**

म्हणजेच खरा पुण्यशाली कोणाला म्हणावे? तर जो थोडीशी मेहनत करतो आणि खूप पैसे मिळवितो!

*'जो भोगतो, त्याला शहाणा म्हणतात, बाहेर फेकून देतो त्याला वेडा म्हणतात आणि मेहनत करत राहतो त्याला मजूर म्हणतात.'*
– **दादाश्री**

ही किती संक्षिप्त पण उत्तम व्याख्या आहे!

लक्ष्मीच्या स्पर्शाचे नियम आहेत, त्या नियमाबाहेर लक्ष्मीचा स्पर्श होऊच शकत नाही, मग ती कमी मिळाली तरी हाय हाय का करावी? आणि जास्त मिळाली तरी माज का यावा?

*'आपल्या करता मात्र, कमी पडणार नाही आणि जास्तही होणार नाही, एवढे झाले तरी खूप झाले.'* – **दादाश्री**

लक्ष्मीसंबंधी हे सूत्र जीवनात उतरवून जगासमोर प्रस्तुत केले गेले आहे! भरपुरचे पुजारी आणि कमीपणाचे विराधक, या दोघांनाही हे सूत्र संतुलनात ठेवते!

## 3. गुंतागुंतीतही शांती

उठल्यापासूनच समस्या सुरू. टेबलावर चहा पिताना देखील कटकट आणि जेवतानाही कटकट! व्यवसायात भागीदाराची किटकिट आणि घरी पत्नीची खिटखिट! या समस्येतून बाहेर निघायचे असेल तर 'रियल'मध्ये यावे लागेल. 'रिलेटिव्ह'मध्ये तर नुसती गुंतागुंतच आहे.

परवशता कोणालाच आवडत नाही पण परवशतेतून बाहेर पडता येत नाही. रोज तीच खोली, तोच पलंग आणि तीच उशी! नो व्हरायटी!

संसाराच्या सार रूपात काय मिळाले? सार काढले तर लगेच समजेल असे आहे! पूंजीच्या रूपात कोणते सुख मिळाले?

## 4. कंटाळा टाळा

कोणत्याही जागी ओझे वाटणार नाही, कंटाळा येणार नाही, अशा आंतरिक स्थितीपर्यंत पोहोचायचे आहे!

उपयोगमय जीवनाची सूक्ष्मातिसूक्ष्म जागृती ज्ञानी विकसित करतात, जसे नखे कापून रस्त्यात टाकली की तिथे असंख्य मुंग्या गोळा होतात, त्यांच्यावर जर कोणाचा पाय पडला तर? त्याचे निमित्त तो नखे टाकणारा बनतो. जिथे परिणामांबद्दलची दृष्टी उघडत जाते तिथे आत्मा प्रकट होत जातो. यात परिणामाला जो जाणतो तो आत्मा आहे.

## 5. चिंतेपासून सुटका

चिंतारहित कोण आहे? 'माझे काय होईल?' असे म्हणत अपार चिंता करतात. चिंता पाठवते कोण? कोणी पाठविणारा नाही. चिंतेचे मूळ कारण काय? चिंता, हा सर्वात मोठा अहंकार आहे. 'हे मी चालवितो, माझ्याशिवाय हे होणार नाही.' अशी ज्याची मान्यता आहे, त्यालाच चिंता वाटते. आणि तोच अहंकार आहे! ज्याची चिंता गेली त्याला समाधीदशा प्राप्त होते! कर्ता कोण याबद्दलचे अचूक ज्ञान म्हणजे 'व्यवस्थित कर्ता' आहे हे ज्ञान कायमचे चिंतामुक्त करते.

मुलीच्या लग्नाची चिंता, व्यापारात नुकसान झाले तर चिंता, आजारी पडले तर चिंता! चिंता करण्याने तर उलट अंतराय कर्मे बांधली जातात.

ज्ञानी पुरुष आत्मज्ञान करून देतात, वास्तवात 'कर्ता कोण आहे?' कर्ता 'व्यवस्थित शक्ती' आहे, असे समजावतात तेव्हा चिंता कायमची निघून जाते. जेव्हा चिंता बंद होते, तेव्हापासूनच मोक्षमार्ग सुरू झाला असे म्हणतात.

या जगात कोणाला काहीही करण्याची सत्ता नाही, सर्व काही परसत्तेतच आहे.

सहज अहंकाराने संसार चालतच राहतो, परंतु चिंता हा तर विकृत झालेला अहंकार आहे, तो रात्रंदिवस जीव जाळतच राहतो!

प्रतिकूल संयोग आल्यावर जर कोणी चिंता केली तर दुप्पट नुकसान होते आणि जर चिंता केली नाही तर एकच नुकसान होते! आणि जो फक्त आत्म्यातच राहतो, त्याला तर काहीच नुकसान होत नाही! अनुकूल-प्रतिकूल दोन्ही सारखेच असतात तिथे!

## 6. भय असले तरी निर्भयता

साऱ्या जगाने विरोध केला, तरी आपण आतून जरादेखील विचलित होणार नाही, असे असायला हवे.

सामान्यतः 'मी प्रयत्न करतो, कोशिश करतो', अशी चुकीची

समजूत घुसली आहे. जे आपोआपच होणार आहे, त्यात करण्यासारखे काय आहे?

भीती आणि धास्ती तर किती असते? रात्री उंदराने जरा खुडबुड केली, तर तिथे 'भूत घुसले' म्हणत रात्रभर भीतीपोटी घाबरत राहतो. फक्त अफवा उठली की बडोद्यावर बॉम्ब पडणार आहे, तर सगळ्यांची दाणादाण उडते, सगळे लोक चिमण्यांसारखे उडून जातात. संपूर्ण शहर रिकामे करून टाकतात!

जो निसर्गाचा पाहुणा म्हणून जगतो, त्याला कसली भीती? निसर्ग गरजेनुसार सारे काही पाठवूनच देतो. पण 'लोकांना काय वाटेल?' असे विचार करून भयभीत होतात! अशी कशी भीती वाटते? इन्कमटॅक्सची नोटिस आली तर भीतीने थरथर कापतो! 'तार घ्या', ऐकल्यावर थरथर कापतो! केवळ आर्तध्यान आणि रौद्रध्यानातच जगतात! तेव्हा आता वीतराग व्हायचे आहे. जो वीतराग होतो, त्याचे सर्व प्रकारचे भय निघून जातात. ज्ञानींना भय का वाटत नाही? कारण ज्ञानींना ज्ञानामध्ये असे वर्तत (जाणवत) असते की हे जग बिलकूल करेक्टच आहे, म्हणून!

नैसर्गिकपणे आपोआप बुद्धीचा जेवढा उपयोग होईल तेवढीच बुद्धी कामाची, उरलेली सर्व बुद्धी तापदायक असते. कोणाला हार्ट ॲटॅक आलेला पाहिले की लगेच चिंता सुरू होते की मलाही हार्ट ॲटॅक आला तर? ही सर्व अतिरिक्त बुद्धी! अशी बुद्धी चुकीच्या शंका घेते. नुसते लुटारूचे नाव ऐकले की लगेच शंका निर्माण होते, लूट होण्याची गोष्ट तर दूरच राहिली! खरे म्हणजे कुठेही कोणालाही घाबरण्याचे कारण नाही! संपूर्ण ब्रह्मांडाचे मालक आपण 'स्वत:'च आहोत. त्यात कोणाचाही हस्तक्षेप नाहीच. भगवंताचाही हस्तक्षेप नाही! जे काही बरे-वाईट घडत आहे, ते तर आपला हिशोब पूर्ण करवीत आहे.

जग निरंतर भयग्रस्त आहे, पण कोणाला भय आहे? ज्याला अज्ञानता आहे त्याला, जे शुद्धात्मा झाले आहेत त्यांना कसले भय? भय वाटत आहे की निर्भय राहता येत आहे, ह्या दोन्ही गोष्टी जाणण्याच्या आहेत.

शेठनी पन्नास हजार दानात दिले, पण मग मित्र म्हणाला, 'यांना कशाला दिलेस? हे तर चोर लोक आहेत, तुझे पैसे खाऊन टाकतील!' त्यावर शेठ काय म्हणतात, 'हे तर मी मेयरच्या दबावाखाली दिले, नाही तर मी तर कोणाला पाच रुपयेही देईन असा नाही!' दान दिले ही क्रिया तर उत्तम झाली, सत्कार्य झाले पण ते मागील जन्मात जे भाव चार्ज केले होते, त्याच्या डिस्चार्ज स्वरूपात हे फळ आले आणि दान दिले गेले. पण आज नवीन काय चार्ज केले? तर ही जी भावना केली की पाच रुपयेही देईन असा मी नाही, ते चार्ज झाले!

## 7. कढापो-अजंपो

नोकराकडून कप-बशा फुटल्या, या घटनेचे वर्णन, यात नोकराला व्यथा होते, शेठाणीला संताप होतो, शेठला *अजंपा* (आतल्या आत कुढणे, बेचैन होणे) होतो, किंवा *कढापा* (राग, क्लेश) होतो. अशा प्रत्येकाच्या बाह्य आणि आंतरिक अवस्थांचे तंतोतंत 'जसे आहे तसे' वर्णन 'ज्ञानी पुरुष' करतात. नोकरावर रागावू नये, असा उपदेश असंख्य वेळा ऐकला आहे, पण तो कानांपर्यंतच राहतो, हृदयापर्यंत पोहोचतच नाही. याउलट 'ज्ञानी पुरुषां'ची वचने हृदयापर्यंत पोहोचतात आणि नोकरावर कधीच रागवायचे नाही, अशी खरी समज उत्पन्न होते. परिणाम स्वरूप आतापर्यंत नोकराचाच दोष पाहणाऱ्याला स्वत:ची चूक दिसू लागते, आणि हा भगवंताचा न्याय आहे!

यात नोकरालाच दोषी ठरवून त्यावर आक्षेप घेतात किंवा त्याला रागावतात. परंतु ज्ञानी सांगतात की नोकर शेठच्या विरोधात नाही. त्यात त्याचा काय गुन्हा? नोकर वैर धरील अशी वाणी बोलण्याऐवजी, आधी त्याला भाजले आहे की नाही, हे पाहणे गरजेचे नाही का? 'बाबा, तुला भाजले तर नाही ना?' एवढेच शब्द नोकराचे त्यावेळचे भय किती अजब रीत्या दूर करते. आणि मग त्याला भाजले नसेल तर 'बाबा, जरा सावकाश चालत जा.' असे सहजपणे सांगितले तर या शब्दांमध्ये नोकरात किती तरी जास्त परिवर्तन घडविण्याचे सामर्थ्य आहे. पण त्याऐवजी जर तिथे क्लेश केला तर काय उपयोग?

*‘ज्याचा कढापा-अजंपा गेला त्याला भगवंत म्हणतात.’* - **दादाश्री**

हे साधे-सुधे वाक्य थेट भगवंत पदाची प्राप्ती करण्याचा मार्ग मोकळा करून देते! *कढापा* आणि *अजंपा* हे शब्द गुजरातीत खूप सामान्यपणे वापरले जातात, पण त्याचा खरा आणि पूर्ण अर्थ परम पूज्य दादाश्रींनी ज्या प्रकारे दिला आहे, तो तर अद्भुतच आहे!

कुठल्याही जीवाला दु:ख दिले तर मोक्ष थांबतो, मग हा नोकर तर मनुष्य रूपातच आहे, एवढेच नाही तर तो आपला आश्रित आणि सेवक आहे! ज्ञानींचे असे हृदयस्पर्शी शब्द नोकराबद्दल असलेल्या आपल्या अभावाला कसे भावात बदलून टाकतात!

स्वत:च्या काटकसर करणाऱ्या प्रकृतीमुळे घरातील सर्वांना दु:ख होते, हे लक्षात आल्यावर ‘काटकसर केल्याशिवाय घर कसे चालेल?’ हे ज्ञान बदलून मन नोबल असेल तरच सर्वांना सुख देणे शक्य होईल. असे ज्ञान फिट होईल तेव्हा समस्या सुटतील!

स्वच्छतेच्या आग्रह असलेल्यांना परम पूज्य दादाश्री कसा थर्मामीटर दाखवतात?

*‘पुन्हा मळले तरी आपल्याला चिंता वाटणार नाही, इतक्या मर्यादेतील स्वच्छता एडमिट करणे - स्वीकारणे चांगले आहे.’* - **दादाश्री**

संपूर्ण जग दोन प्रकारचे नुकसान पत्करते : एक तर वस्तू हरवते ते भौतिक नुकसान आणि दुसरे *कढापा-अंजपा* केला, ते आध्यात्मिक नुकसान! परंतु ज्ञानी एका प्रकारचेच नुकसान पत्करतात, फक्त भौतिक, की जे अनिवार्य रूपात होणारच होते.

काचेचे पेले फुटले तर नवीन घेता येतील किंवा ‘बरे झाले, झंझट गेली’ असे समजूनही जो आनंदात राहतो, तर चिंता करण्याऐवजी आनंदी राहिला, म्हणून त्याला पुण्य मिळेल. नुकसान झाले तरी त्यात फायदा करून घेण्याची किती सुंदर कला!

कुठल्याही गोष्टीबद्दल असलेली ममताच तिचा वियोग झाल्यावर दु:ख देते, पण शेजाऱ्याच्या घरात पेले फुटतात तेव्हा जसे वाटते तसेच

जर स्वत:च्या घरी फुटल्यावर वाटले तर तो भगवंत बनेल. 'माझेपणा' सुटल्याचे परिणाम सोप्या रितीने समजाविण्याची ज्ञानींची कला तर पाहा! जर तेच पेले फुटल्यावर *कढापा-अजंपा* झाला तर काय भोगावे लागते? जनावर गती!

## 8. सावध हो जीवा, अंतिम क्षणी!

मृत्यशैय्येवर पडले आहेत, तरी पण ऐंशी वर्षांचे काका *नोंद* ठेवतात की 'अमके व्याही तर तब्येतीची चौकशी करण्यासाठी आलेच नाहीत!' अरे, पुढील जन्माचे गाठोडे बांध ना! व्याह्यांचे आता काय करायचे आहे? मरताना आयुष्यभराचा हिशोब करायचा असतो. सर्वांशी बांधलेले वैर, राग-द्वेषाची बंधने, हृदयपूर्वक प्रायश्चित्त-प्रतिक्रमण करून तोडायची आहेत! मरण्यापूर्वी एक तास जरी प्रतिक्रमण सुरू केले, तरी देखील जीवनातील सर्व पापे धुतली जातील, असे शक्य आहे! जीवनाच्या अंतिमक्षणी जन्मभराचे सार पाहावे लागते, आणि त्या सारानुसारच त्याचा पुढचा जन्म होतो. जन्मभर भक्ती केली असेल तर शेवटच्या क्षणीही भक्तीच होईल. आणि कषाय केले असतील तर कषायच होतील!

स्वजनांच्या अंतसमयी नातेवाइकांनी त्यांची खूप काळजी घेतली पाहिजे. ते खुश राहतील आणि भक्ती भावात, ज्ञानात राहतील असे वातावरण ठेवले पाहिजे.

नातेवाइकांची सोबत कुठपर्यंत? स्मशानापर्यंत. कबीर साहेबांनी म्हटले आहे, 'तू जन्मलास तेव्हा लोक हसत होते आणि तू रडत होतास. आता जगात येऊन असे काही कर की जाताना तू हसत असशील आणि लोक रडत असतील!'

जेव्हा नातेवाईक मरण पावतो, तेव्हा लोक कल्पांत करतात. कल्पांत म्हणजे एक कल्पाच्या (कालचक्राच्या) शेवटपर्यंत भटकावे लागते.

कोणी मेल्यावर लोक खूप चर्चा करतात. कसे मेले? कोण डॉक्टर होता? आणि काय इलाज केले? त्याऐवजी सगळ्यांना सांगून टाकावे

की 'काकांना थोडा ताप आला आणि त्यातच ते टप्प झाले (अचानक गेले). शॉर्टकट!' जितके आयुष्यकर्म असते, तितकेच जगता येते. एक सेकंदही जास्त जगता येत नाही, असे एक्झॅक्ट 'व्यवस्थित' आहे हे जग!

मुलगा मेल्यानंतर रडत राहतो, विसरत नाही. त्याने काय होणार? जो गेला तो गेला. रामा तुझी माया! ते परत भेटणार नाहीत. मुलाची आठवण आली तर त्याच्या आत्म्याचे कल्याण होवो अशी प्रार्थना केली पाहिजे आणि त्याची प्रतिक्रमणे केली पाहिजेत.

मृत्यूनंतर लौकिक व्यवहार करण्याचा रिवाज आहे. लौकिक म्हणजे सुपरफ्लुअसली (वरपांगी) समोरा-समोर करण्याचे व्यवहार, पण लोक त्याला खरे मानतात आणि दुःखी होतात!

हिंदुस्तानात मरण्याऱ्यालाही भीती वाटत नाही की मला खांदा कोण देईल!

निसर्ग नियम आहे की आपला मृत्यू आपल्या सही (आपली सहमती)शिवाय येऊच शकत नाही! दुःखाच्याभरात शेवटच्या क्षणी केव्हाही सही करून टाकतो! इतके स्वतंत्र आहे हे जग!

आत्महत्येने काही सुटका होत नाही. पुढचे सात जन्म तसेच जातील! स्वतः परमात्मा आहे, त्याला आत्महत्येची काय गरज? पण याचे भान नाही, म्हणूनच ना!

## 9. क्लेशरहित स्थिती तीच समाधी

खरा धर्म त्यालाच म्हणतात की ज्यामुळे जीवनात क्लेश राहत नाहीत.

क्लेशामुळे मन, चित्त, अहंकार सगळे घायाळ होतात. ज्याचे चित्त घायाळ झाले आहे, तो बेचित्त फिरत राहतो. जो मनाने घायाळ आहे, तो नेहमी व्याकुळ होऊनच फिरत राहतो. जणू काही सारी दुनिया त्याला खाऊनच टाकणार आहे! ज्याचा अहंकार घायाळ झाला आहे तो तर डिप्रेशनमध्ये असतो, त्याला काय सांगणार? क्लेश फक्त समज नसल्यामुळे निर्माण होतात!

आधी स्वत:च मनाला बिघडवतो आणि नंतर त्याला ताब्यात ठेवायला जातो, तर ते कसे होईल?

या जगात सगळ्यात महाग जर काही असेल तर ते आहे फुकटचे!

मोक्षाचे भान तर नंतर पण या संसारातील हिताहिताचे भान तरी असायला हवे की नाही? काही तरी अशी चूक होत असते की जी जीवनात क्लेश निर्माण करते!

पोटात ढकलण्याआधी पोटाला विचार तरी की तुला जरूरत आहे की नाही?

मानव धर्म कशाला म्हणतात? तर आपल्या निमित्ताने कोणाला दु:ख होऊ नये. आपल्याला जे आवडत नाही ते आपण दुसऱ्याला कसे देऊ शकतो? आपण समोरच्याला सुख दिले तर आपल्याला सुख मिळतच राहील!

## 10. फ्रॅक्चर झाल्यापासूनच सांधण्याची क्रिया सुरू

जगातील लोक ज्याला पाय मोडला असे म्हणतात त्याला ज्ञानी 'हा तर सांधला जात आहे' असे म्हणतात? ज्या क्षणी मोडला त्याच्या दुसऱ्याच क्षणी सांधण्याची क्रिया सुरू होते! 'जसे आहे तसे' पाहण्याची किती आश्चर्यकारक आणि तीक्ष्ण जागृती आहे ज्ञानींची!

## 11. पाप-पुण्याची व्याख्या

पाप-पुण्याच्या लांबलचक, कंटाळाजनक व्याख्येच्या तुलनेत, 'ज्ञानी पुरुष' संक्षिप्त पण मार्मिक व्याख्या सांगतात की,

*'जीवमात्राचे काहीही नुकसान करणे, त्याने पाप बांधले जाते आणि कोणत्याही जीवाला कोणतेही सुख देणे, त्याने पुण्य बांधले जाते.'*

– **दादाश्री**

साधारणत: असे मानले जाते की अजाणतेपणी पाप झाले, तर त्याचा दोष लागत नाही. त्यावर ज्ञानी म्हणतात की 'अजाणतेपणी निखाऱ्यावर हात पडला तर भाजेल की नाही?' बुद्धीला फ्रॅक्चर करणारे असे हे उदाहरण आहे!

## 12. कर्तेपणामुळेच थकवा

जगाच्या नियमात पैशांची देवाण-घेवाण आहे, तर निसर्गाच्या नियमात राग-द्वेषाची! पाचशे रुपये घेतले तर तेवढेच परत केले तर आपली सुटका होईल, असा निसर्गाचा नियम नाही. तिथे तर राग-द्वेष केल्याशिवाय निकाल केला तरच सुटका होईल मग जरी फक्त पन्नास रुपयेच का परत करीना?

मुंबईहून बडोद्याला गेले तर लोक काय म्हणतात? मी बडोद्याला गेलो! अरे, तू गेलास की गाडी तुला घेऊन गेली? 'मी गेलो' म्हटले तर थकवा जाणवेल, आणि 'गाडी घेऊन गेली, मी तर आरामात डब्यात बसलो होतो!' असे म्हटले तर थकवा जाणवेल का? नाही! म्हणजे 'मी गेलो' हा तर सायकॉलॉजिकल इफेक्ट आहे. गाडीत बसले, म्हणजे दोन्ही स्टेशनांपासून मुक्त! मधला काळ संपूर्ण मुक्तकाळ! त्याचा उपयोग आत्म्यासाठी करून घ्यायचा!

## 13. भोगवटा लक्ष्मीचा

आयुष्यभर पैसे कमावले, घाण्याच्या बैलासारखे राबराब राबलो, तरी बँकेत किती लाख जमा झाले? जे धन दुसऱ्यांसाठी खर्च झाले ते आपले, बाकीचे सगळे परके. गटारात गेले असे समजा.

दानाचे फळ हेतूनुसार मिळते. कीर्तीसाठी, नावाची पाटी लावून घेण्यासाठी किंवा प्रसिद्धीसाठी दिले असेल तर ते मिळेलच, आणि जर गुप्तदान असेल, शुद्ध भावनेने फक्त दुसऱ्यांना मदत करण्याच्या हेतूने दिले असेल तर त्याने खरे पुण्य बांधले जाते आणि जो अकर्ताभावाने निकाल करण्यासाठी देतो तो कर्मापासून मुक्त होतो!

लक्ष्मी मेहनतीमुळे येते की बुद्धीमुळे? जर मेहनतीमुळे पैसे कमावता येत असेल तर मजुरांजवळच खूप पैसे असायला हवेत. मुनीमजी आणि सी.ए यांना तर खूप बुद्धी असते, पण शेठ तर जन्मापासूनच पैसे घेऊन आलेला असतो! त्याने कुठे मेहनत केली किंवा अक्कल वापरली? म्हणजेच लक्ष्मी फक्त पुण्यामुळेच मिळते!

लक्ष्मीवर प्रेम असेल तर भगवंतावर नाही आणि भगवंतावर प्रेम असेल तर लक्ष्मीवर नाही. वन अॅट अ टाइम!

लक्ष्मी आली तरी ठीक आणि नाही आली तरी ठीक! जी सहज प्रयत्नाने येते, ती खरी पुण्याची लक्ष्मी!

आपल्या हिशोबानुसारच लक्ष्मी कमी-जास्त होत असते! लोकांची निंदा किंवा तिरस्कार करण्याने लक्ष्मी कमी होते. हिंदुस्तानात तिरस्कार आणि निंदा करण्याचे कमी झाले आहे. लोकांना वेळच नाही हे सर्व करण्यासाठी. '2005 मध्ये हिंदुस्तान वर्ल्डचे केंद्र बनेल.' असे संपूज्य दादाश्री 1942 पासून सांगत आले आहेत!

पैशांचे किंवा वस्तूंचे कर्ज नसते, तर राग-द्वेषांचे कर्ज असते. जे पुढील जन्माचे कर्म चार्ज करते! म्हणून पैसे परत करण्यात कधीही भाव बिघडवू नका. ज्यांना 'दुधात धुऊन' पैसे परत करायचे आहेत त्यांना पैसे मिळतीलच आणि ते परत करू शकतील! असा निसर्गाचा नियमच आहे. घेणेकरीला वसुली करण्याचा अधिकार आहे. पण शिव्या देण्याचा अधिकार मात्र नाही. शिव्या देणे, धमकावणे हे सर्व एकस्ट्रा आइटेमस् आहेत. कारण शिव्या देण्याची अट करारात नसते!

जीवन उपयोगासहित असले पाहिजे, जागृतीसहित असले पाहिजे, जेणेकरून कोणालाही आपल्यापासून किंचितमात्र दुःख किंवा नुकसान होणार नाही!

## 14. प्राकृत गुणांची आवड

निस्वार्थी प्रेम हेच खरे प्रेम! आणि...

*'स्वार्थ म्हणजे स्त्रीवर वाईट दृष्टी ठेवणे आणि स्वार्थ साधणे, ह्या दोन्ही गोष्टी सारख्याच आहेत. जिथे स्वार्थ नसते तिथे परमात्मा अवश्य असतात.'*

– **दादाश्री**

*'गांडाने गाम ने डाह्याने डाम.'* (वेड्याला गाव देणे आणि शहाण्याला डाग देणे.) वेड्याला गाव द्यावे लागले तर ते देऊनही आपली सुटका करून घ्यावी. शहाण्याला तर नंतर समजावता येते. सुटण्याची

कला देखील अवगत असली पाहिजे. ही कला ज्ञानींकडे पूर्ण रूपात खुललेली असते!

आपल्या सरळपणा पुढे कोणी नेहमी वेडा-वाकडा व्यवहारच करत असेल, तर मनात येते की वाकड्याच्या समोर वाकडेच राहण्याची गरज आहे. त्यावर ज्ञानी पुरुष खरे काय यावर प्रकाश टाकतात की, 'किती तरी जन्मांतील कमाईनंतर सरळता उत्पन्न होत असते.' मग वाकड्याचा व्यवहार पाहून आपली जन्म-जन्मांतरीची अध्यात्माची पूंजी का वाया घालवायची? आणि दिवाळे काढायचे? वाकड्यासमोर सरळ राहता येणे ही तर फार मोठी गोष्ट आहे!

संसारातील दुःखाच्या मूळ कारणाचे ज्ञानींनी काय संशोधन केले? ज्यांना समोरचा गुन्हेगार वाटतो, ते उघड्या डोळ्यांनी आंधळे आहेत. भगवंताच्या भाषेत कोणीच गुन्हेगार नाही. फुले वाहतो तोही आणि शिव्या देतो तोही! जर कोणी गुन्हेगार वाटत असेल तर तो स्वतःच्याच मिथ्यात्वरूपी दृष्टीचा रोग आहे. स्वतःला नुकसान झाले असे जे वाटते, ते शेवटी तर पुद्‌गल बाजारातीलच आहे ना? 'आपले' तर नाही ना?

विश्वासघात हा भयंकर गुन्हा आहे. भेसळ करणे, बिनहक्काचे उपभोगणे, याला विश्वासघात म्हणतात. गुप्तपणे गुन्हा करण्याने अंतराय (विघ्न, बाधा) निर्माण होतात. खाण्या-पिण्याच्या वस्तूत आणि औषधात जी भेसळ होते त्याने भयंकर गुन्हा लागतो. बाकी सगळीकडे चालून जाईल, पण इथे मात्र कुठल्याही परिस्थितीत चालणार नाही.

जग आपलेच प्रतिबिंब आहे. समोरच्याला आपल्यामुळे दुःख झाले, तर तो आपल्याच चुकीचा परिणाम आहे. आपण चूक संपवली तर सुटका होईल. त्याकरिता काही करायचे नसते, फक्त खरे ज्ञान जाणून घ्यायचे आहे की जे अवश्य क्रियेत फलित होईल!

आपल्याकडून होणारी कोणतीही क्रिया बरोबर आहे की चूक, असा संभ्रम कोणाला पडला नसेल? 'ज्यामुळे स्वतःला सुख मिळेल, ते बरोबर आणि दुःख होईल ते चूक' असा साधा थर्मोमीटर देऊन ज्ञानींना अनेकांचा संभ्रम किती सहज दूर केला आहे!

स्वत: सर्वशक्ती संपन्न असूनही, स्वत:मुळे समोरच्याला किंचितमात्र देखील दु:ख होऊ देत नाही, तो खरा बलवान! तिथे प्रताप गुण उत्पन्न होतो. जो स्वत:चे बळ आणि स्वत:च्या सत्तेच्या जोरावर समोरच्याला तुडवत राहील, तो निर्बळ नाही तर कोण आहे?

*प्रकृतीच्या स्वभावाबद्दल असलेल्या संभ्रमातून बाहेर पडण्याचा मार्ग आजपर्यंत कोणी दाखवला नाही. तिथे अक्रम विज्ञान काय सांगते की, 'प्रकृती आपला स्वभाव सोडणार नाही, पण स्वत:चे ज्ञान बदलू शकते आणि ज्ञान बदलल्यावर द्विधा संपते!'* – **दादाश्री**

## 15. दु:ख दूर करण्याची साधने

समोरच्याच्या दु:खाने दु:खी होणाऱ्यांचा सूक्ष्म अहंकार फ्रॅक्चर व्हावा, त्यासाठी ज्ञानी असे म्हणतात की,

*'तुझ्या सुखासाठी तू त्याचे दु:ख दूर कर, त्याच्या सुखासाठी नाही.'* – **दादाश्री**

दु:खी व्यक्ती दुसऱ्याचे दु:ख कसे घेऊ शकेल? कोणाचे दु:ख घ्यायचे नाही, फक्त ऑब्लाइज (परोपकार)च करायचे आहे, बस. फार खोलात जाईल तो अडकून पडेल.

एकीकडे ज्ञानी पुरुष असे समजावतात की, या दुनियेत जे काही (सुख-दु:ख) मिळते, ते सर्व स्वत:च दिलेले असते तेच परत येत असते. नवीन उधार देणे बंद केले तर हिशोब पूर्ण होईल आणि दुसरीकडे ज्ञानी पुरुष असे समजावतात की आपले पांढरे केस पाहून समोरच्याला बरे वाटत नसेल तर त्यात आपला काय गुन्हा? महावीर भगवंतांना पाहून गोशाळाला दु:ख होत असे, त्यात महावीर भगवंतांचा काय दोष? ते तर समोरच्याने ओढवून घेतलेले दु:ख आहे. त्यामुळे यात...

*''जर तुम्ही कर्ता आहात, जोपर्यंत तुम्हाला 'मी चंदुलालच आहे' असे वाटते, तोपर्यंत जोखीम तुमची आहे.''* – **दादाश्री**

'आपण दिलेले दु:ख' आणि समोरच्याने ओढवून घेतलेले दु:ख, या दोन्ही गोष्टीत खूप फरक आहे, हे समजून घ्यायचे आहे. 'ज्ञानी

पुरुष' म्हणतात, 'मला कोणी दु:ख देत नाही, कारण आम्ही दु:ख ओढवून घेत नाही. जो ओढवून घेतो त्याला दु:ख होते!' ह्या सोन्याच्या कट्यारीचा उपयोग करणे तर संपूर्ण अकर्ता पदापर्यंत पोहोचलेले 'ज्ञानी पुरुष'च जाणतात!

'मला खोटेपणा सहन होत नाही' म्हणणारे किती तरी आढळतात. पण खोटे करणारा आपल्यालाच का भेटला? हे कोणी पडताळून पाहतो का? तरी देखील समोरच्याला शांतीपूर्वक समजावता येते की असे चुकीचे वागू नका. खरे तर जनसेवक तोच असतो, की ज्याला कीर्तीची, मानाची, नावाची, लक्ष्मीची किंवा इतर कसलीही, किंचितमात्रही भीक (हाव) नसते आणि जो स्वत: अपरिग्रही असतो. जो संपूर्ण परिग्रही आहे, तो जनसेवा काय करणार? सेवा करतात, त्यांना देखील ज्ञानी 'प्रकृतीस्वभाव आहे, पुरुषार्थ नाही, प्रारब्ध आहे.' असे म्हणून सेवेच्या पुंजीच्या, कमाईच्या फुगलेल्या फुग्यातील हवा काढून टाकतात. स्वरूप ज्ञानानंतर करुणाभाव प्रकट होतो, तोच खरा आहे.

ज्ञानी पुरुषाने जीवनाचे असे कोणते लक्ष्य निश्चित केले असेल की ज्यामुळे अभ्युदय आणि आनुषंगिक फळ मिळत राहते?

'संपूर्ण जगाला परम शांती मिळो आणि काहींना मोक्ष मिळो!'

या लक्ष्यापर्यंत पोहोचण्यासाठी ज्ञानी पुरुष मार्ग सांगतात की, यात काहीच करायचे नाही, फक्त हेतू निश्चित करायचा आहे आणि तो हेतू नेहमी आपल्या लक्षात असायला हवा. दुसऱ्या कशावरही लक्ष लागू नये.

## 16. बॉस-नोकराचा व्यवहार

आपल्या अंडरहँडला (हाताखालची माणसे, नोकर वगैरे) रागावू नये. जोपर्यंत आपण कोणावर रागावत राहू, तोपर्यंत आपल्याला आपल्यावर रागावणारे भेटत राहतील. उपरींना किंवा अंडरहँड असणाऱ्याला, कोणालाही आपल्याकडून दु:ख होणार नाही असे आपले जीवन असले पाहिजे.

जो इमानदार आहे, त्याच्या पाठीशी इतर कोणी नसला तरी निसर्गाचा न्याय मात्र नेहमी असतोच!

## 17. खिसा कापला गेला तरी समाधान

खिसा कापला गेला तो निसर्गाचा न्याय झाला. निसर्गाचा न्याय काय सांगतो की ज्याचा खिसा कापला गेला तोच गुन्हेगार. 'भोगतो त्याची चूक' या नॅचरल लॉ (कायदा)चे रहस्य जगात प्रथम ज्ञानी पुरुषांनीच अनावृत्त केले आहे. जो एवढे जरी समजेल, तो थेट मोक्षाला जाईल! खिसा कापला गेला तो 'चंदुलाल'चा आत्म्याला खिसा असेल तर कापला जाईल ना?

निसर्गाच्या प्लॅनिंगमध्ये जसे सावकाराला स्थान आहे तसेच चोरांनाही स्थान आहे. हे चोर, लुटारू तर गटारासारखे आहेत, दुर्गंधीयुक्त काळा पैसा शुद्ध करणारे गटार! गटारे नसतील तर शहराची काय स्थिती होईल? म्हणून जे आहे, जे घडते ते करेक्टच आहे.

वस्तूंच्या उपयोगाचे नियम असतात. आज दहा शर्ट वापरले तर पुढे तेवढेच कमी वापरले जातील. आयुष्यभराच्या वापराचा जितका आकडा निश्चित आहे, तो तेवढाच राहतो. मग तो एकदम खर्च करून टाका किंवा मग जसजशी जरूरत पडेल तसतसा खर्च करत जा!

## 18. क्रोधाच्या निर्बलतेसमोर...

दुनियेत असा कोणी जन्माला आला नाही की जो क्रोध करू शकेल. क्रोध केला जात नाही, क्रोध होऊन जातो. हे तर, क्रोध केल्यानंतर स्वत:ची चूक सावरून घेण्यासाठी शहाण्या लोकांनी रस्ता शोधला आहे की त्याला सरळ करण्यासाठी मी क्रोध केला नाही तर तो सरळ होणाऱ्यातला नाही!

क्रोधाचे शमन करण्याच्या खऱ्या समजूतीचे ज्ञानींनी किती सूक्ष्मतेने पृथ्थकरण केले आहे! कप-बशा फुटल्या आणि क्रोध आला, त्याचे कारण काय? स्वत:चे नुकसान झाले म्हणून? नोकरावर खेकसले, ते अहंकारामुळे. विचारवंत तर लगेच विचार करतो की कप-बशा फुटल्या तर खरोखर कोणी फोडल्या? हे निवार्य होते की अनिवार्य? लोक नेहमीच आपल्या कनिष्ठांनाच रागावतात. सुपरवायझरला का रागवत नाहीत? तिथे कसे चूप बसता? एक तर कप गेले आणि दुसरे म्हणजे

क्रोध केला, हे दुहेरी नुकसान कसे भरून काढाल? शिवाय समोरच्याशी जन्मजन्मांचे वैर बांधले, तो अधिक फायदा! अशा प्रकारे 'ज्ञानी पुरुषां'नी क्रोध, तो येण्याचे कारण आणि त्यावर उपाय सर्व बाजूने पाहून आपल्यासमोर प्रस्तुत केले आहेत!

क्रोध येऊ नये यासाठी ज्ञानी पुरुष सम्यक् उपाय सांगतात की स्वत:ची चूक ज्ञानींच्या सत्संगात समजून घ्या, मग क्रोध येणार नाही. 'क्रोध येणे बंद करा, बंद करा' असा उपदेश फार पूर्वीपासून मिळत आहे. पण विज्ञान काय सांगते की क्रोध येणे हा परिणाम आहे, परिणाम कसा बंद करणार? हा परिणाम कोणत्या आधारामुळे येतो हे जाणून घेतले पाहिजे. स्वत:च क्रोधाचा संपूर्ण अभ्यास केला पाहिजे. क्रोध केव्हा केव्हा येतो, केव्हा येत नाही, काही लोकांनी आपले लाख भले केले असते तरी त्यांच्यावर क्रोध आल्याशिवाय राहत नाही आणि काहींनी लाख वाईट केले असले, तरी त्यांच्यावर क्रोध येत नाही. त्याचे कारण काय? ज्यासाठी जशी ग्रंथी बनली आहे, ती तशीच फुटल्याशिवाय राहत नाही. मग काय करायला हवे? ज्ञानी किल्ली देतात की त्या व्यक्तीचा क्रोध जोपर्यंत यायचा तो येणारच. पण आता परत नव्याने त्याच्याबद्दल मन कलुषित होऊ द्यायचे नाही. तिथे स्वत:च्याच कर्मांचा उदय आहे असे समजून, समोरच्याला निर्दोष पाहत राहावे. जेव्हा मन सुधारेल तेव्हा त्याच्यावर क्रोध येणार नाही. तरी आधीचा थोडा परिणाम राहील, पण मग कायमचा बंद होईल. जेव्हा दुसऱ्यांचे दोष पाहणे बंद होईल, तेव्हाच आपल्याला हवा तसा परिणाम येईल.

परिणामाला अजिबात हात न लावता कारण नाहीसे करण्याचा मूलभूत मार्ग इतक्या बारकाईने ज्ञानींशिवाय दुसरे कोण सांगू शकेल? ज्ञानींनी आपल्याला जागृत केल्यावरच हे सर्व सूक्ष्मतेने दिसते आणि त्यानंतर ते निघून जाते.

## 19. व्यापारातील अडचणी

ज्याला अडचणी प्रिय वाटतात तोच प्रगती करतो. आणि जो अडचणींना अप्रिय मानतो त्याची प्रगती खुंटते. समोरच्याने जर अडचणी निर्माण केल्या तर वीतराग राहून पुढे जात राहा, मग मोक्षाला पोहोचाल.

समतेचे सूक्ष्म स्पष्टीकरण ज्ञानी देतात. व्यवहाराच्या लक्षसहित असलेली समता अहंकार वाढविणारी असते, आणि त्यामुळे निर्ल्लजपणा येतो. जेथे आत्मज्ञान आहे तिथे खरी समता विद्यमान असते.

या कलियुगात जसजशी इच्छापूर्ती होत जाते, तसतसा अहंकार वाढत जातो आणि मग माणूस ठेचा खातो. इच्छेनुसार झाले नाही तर अहंकार ठिकाणावर राहतो.

व्यापारातील नफा-नुकसानीच्या परिणामात इनव्हॉल्व होऊन बसलेल्या (गुंतलेल्या) लोकांना 'ज्ञानी पुरुष' एकाच वाक्यात जागृत करतात की...

*''पण नुकसान होत असेल तर ते दिवसा व्हायला पाहिजे ना? जर रात्री पण नुकसान होत असेल, तर रात्री आपण जागे नसतो, मग रात्री नुकसान कसे होते? म्हणजेच नुकसान किंवा फायद्याचे कर्ता आपण नाही, नाही तर रात्री नुकसान कसे होऊ शकते? आणि रात्री फायदा कसा होऊ शकतो? आणि असे होत नाही का की मेहनत केली तरी नुकसान होते?''*

– **दादाश्री**

नुकसान होण्याच्या संयोगात अडकलेल्या लोकांना 'ज्ञानी पुरुष' सुंदर मार्ग दाखवितात की खूप मेहनत केली तरी काहीही निष्पन्न होत नाही! जास्त नुकसान होते तेव्हा संयोगांची साथ नाही असे म्हणून त्या कामावर जास्त जोर लावण्यापेक्षा त्या वेळात आत्म्यासाठी काम करून घेतले पाहिजे.

सोनाराची नजर भेसळ केलेल्या सोन्यावर नाही, तर त्यात शुद्ध सोने किती आहे यावर असते. म्हणूनच तो ग्राहकाला रागाने विचारत नाही की इतकी भेसळ कुठून करून आणली? ज्ञानी तत्त्वदृष्टीने पाहतात, अवस्था दृष्टीने नाही. मग जग निर्दोषच दिसेल ना?

*''संपूर्ण जग निर्दोष आहे, मला स्वतःला निर्दोष अनुभवास येत आहे, तुम्हाला जेव्हा ते निर्दोष अनुभवास येईल, तेव्हा तुम्ही जगापासून सुटाल.''*

– **दादाश्री**

व्यापारात घरच्यांशी एकमताने राहिले पाहिजे, पण त्याचबरोबर सर्वांनी मिळून हे निश्चित केले पाहिजे की 'आपल्याला ठराविक संपत्ती जमा होईपर्यंतच व्यापार करायचा आहे? अशी मर्यादा निश्चित केली पाहिजे. आयुष्याचे एक्स्टेंशन (वाढ) मिळत असेल तर अन्‌लिमीटेड व्यापार करणे योग्य आहे, नाहीतर त्या इतक्या धावपळीतच जर आयुष्य संपून गेले तर मग आत्म्याचे (काम) कधी करणार?

पैसे मिळविणाऱ्यासाठी खटपट करणाऱ्या, धडपडणाऱ्या लोकांना 'ज्ञानी पुरुष' त्याचे परिणाम दाखवितात की,

*'1978 मध्ये पैसे कमविण्याची खूप घाई केली तर 1998 मध्ये तुमच्याकडे जी संपत्ती येणार होती ती आत्ता 1978 मध्येच येईल आणि उद्दीरणा (भविष्यात फळ देणाऱ्या कर्मांना वेळेआधीच जागे करून, वर्तमानात संपवणे) होईल, मग 1988 मध्ये तुम्ही काय करणार?'*

– **दादाश्री**

लोकसंज्ञेनुसार चालून लोक चुकीचे वागायला शिकतात. लोकांना चलाखी करून पैसे कमावताना पाहिल्यावर स्वतः सुद्धा ते शिकून तसेच करतात. तिथे 'ज्ञानी पुरुष' भय सिग्नल (धोक्याचा कंदिल) दाखवतात की जेवढे 'व्यवस्थित'मध्ये आहे तेवढेच तुला मिळेल, चलाखीमुळे कर्म बांधले जाईल आणि एक पैसाही वाढणार नाही. अज्ञानामुळे लोक किती मोठे नुकसान पत्करतात?

व्यापारात चुकीच्या गोष्टी करणाऱ्यांवर 'ज्ञानी पुरुष' शाब्दिक प्रहार करून समजावतात,

*'पण तुम्ही चुकीचे वागताच का? हे कुठून शिकलात? कोणी काही चांगले शिकवत असेल तर तिथून चांगले शिकून या. हे चुकीचे वागणे कोणाकडून तरी शिकून आला आहात, म्हणून तर चुकीचे वागणे जमत आहे नाहीतर चुकीचे वागणे जमलेच कसे? आता चुकीचे वागणे बंद करा आणि चुकीची सर्व कागदपत्रे जाळून टाका.'* – **दादाश्री**

नुकसान झाले तरी त्याचा परिणाम होऊ नये, यासाठी 'ज्ञानी पुरुष' सुंदर चावी देतात. पाचशे रुपयांचे नुकसान झाले तर अशा वेळी

आपण जी रक्कम नुकसानाच्या वेळेसाठी 'अनामत' ठेवली असेल तिला त्या खात्यात जमा करून घ्यावी. ही काही कायमची खातेवही थोडीच आहे ?

ज्ञान होण्याआधी 'त्यांना' व्यापारात नुकसान झाले होते, म्हणून रात्री झोपही लागली नव्हती. पण हिशोब केला की या नुकसानात कोण-कोण भागीदार आहेत ? तर भागीदार, त्यांची बायको-मुले, स्वत:ची पत्नी हे सर्वच आहेत, आणि चिंता मात्र फक्त आपण स्वत:च्या डोक्यावर घेत आहोत, हे कसे काय ? आणि लगेचच ते चिंतामुक्त झाले. किती कमालीची विचक्षणता ज्ञानींची ! व्यापारातही लोक चोऱ्या करत असत, त्या जाणूनबुजून होऊ देत. ज्याला हिशोब चुकते करायचेच आहेत, त्यांच्यासाठी तर संपत्ती चोर घेऊन जाईल किंवा आणखी कुणी घेऊन जाईल, दोन्ही सारखेच आहे ना ?

## 20. नियमपूर्वक अनीती

व्यावहारिक मार्गाने मोक्षाकडे क्रमाक्रमाने पुढे जाणाऱ्यांना 'ज्ञानी पुरुष' या काळाला अनुरूप असा मार्ग सांगतात, की जो अगदी नवीनच अभिगम (दृष्टीकोन) आहे की,

*'पूर्णपणे नीतीचे पालन कर, ते जमत नसेल तर नियमपूर्वक नीती पाळ आणि तेही जर जमत नसेल आणि अनीती केलीस तर तीही नियमात राहून कर, नियमच तुला पुढे घेऊन जाईल !'* – **दादाश्री**

अनीतीसुद्धा मोक्षाला घेऊन जाईल, पण नियमपूर्वक असेल तर. ज्ञानींच्या या सांगण्याने तर धर्मात अजब क्रांती केली आहे. व्यवहारात नीतीचा आग्रह धरणाऱ्यांचा शेवटी अहंकार विकृत होतो आणि ते मार्गापासून च्युत होतात, तर तिथे नियमपूर्वक केलेली अनीती त्यांना मार्गात पुढे घेऊन जाऊ शकते. नीती-अनीतीचे महत्त्व संपवून नियमाला प्राधान्य देऊन 'ज्ञानी पुरुषां'नी नवा रस्ता दाखविला आहे आणि त्या मार्गाने मोक्षाला पोहोचण्याची गॅरंटी स्वत: भगवंताच्या-वीतरागींच्या प्रतिनिधीच्या रूपात देत आहेत !

अनीतीमध्ये नियमात राहणे शक्यच नाही तिथेही जो नियमात राहू

शकतो, त्याचे मन कसे बाउंड्रीमध्ये राहते. उपाशी राहणे सोपे आहे पण 'तीन घासच खा!' अशा प्रकारे कंट्रोल करणे खूप कठीण आहे. अशा कठीणतेला जो पार करेल त्याच्या शक्ती किती कमालीच्या उमलतील?

नियमपूर्वक अनीतीचे सटीक उदाहरणांद्वारे विशेष स्पष्टीकरण देतात. नियम पाळल्यामुळे त्याचे मन बांधले जाते, एवढेच नव्हे तर नीती पाळल्यामुळे जो कैफ चढत असतो तो, 'मी अनीती करतो आहे' याचे भान राहिल्यामुळे चढत नाही आणि नम्रता येते. आणि मोक्ष मार्गात तर नीतीपेक्षाही नम्रतेची विशेष गरज आहे! नियमपूर्वक अनीतीमध्ये मग घोटाळा होता कामा नये, यासाठी इशाराही दिला आहे. घोटाळा करणाऱ्यांची जबाबदारी दादाश्री घेत नाहीत.

'नीतीचे पालन करता येत नाही' असे म्हणून अनीतीत बुडणाऱ्या लोकांना दादाश्री नियमपूर्वक अनीतीच्या काटकीच्या आधाराने संसार पार करवितात. अशी जबाबदारी कोण घेईल? आणि भगवंताच्या दारात तर नीतीवर प्रेम नाही आणि अनीतीचा द्वेष नाही. तिथे तर अहंकाराची आपत्ति आहे.

कोणतीही गोष्ट नियमपूर्वक केली आणि ती देखील 'ज्ञानी पुरुषां'च्या आज्ञेपूर्वक, तर ती नक्कीच मोक्षाला घेऊन जाईल. ज्ञानींची आज्ञा यात मुख्य भूमिका बजावते, असा खुलासा ज्ञानी करतात.

नीतीचे पालन करणाऱ्याला जेव्हा संयोग घेरतात तेव्हा तो अनीती करू लागतो आणि मग त्यातच अडकतो, तेव्हा नियमपूर्वक अनीतीच्या या माध्यमाद्वारे पुढील मार्गक्रमणा करू शकतो. अनीतीतही 'नो नेगेटिव पॉलिसी' अक्रम मार्गातील हे विज्ञान तर पाहा!!!

## 21. कला, जाणूनबुजून फसले जाण्याची

'ज्ञानी पुरुषां'नी जीवनात एक सूत्र संपूर्ण स्वरूपात आत्मसात केलेले असते, 'जाणूनबुजून फसविले जाणे.' किती वैशिष्ट्यपूर्ण! फसविणाऱ्याची मेहनत वाया जाऊ नये याची काळजी ज्ञानी घेतात. आणि मग फसविणाऱ्याबद्दल मनात कषाय निर्माण होण्याऐवजी स्वत:ची फसवणूक करून घेऊन कषायांपासून मुक्त होण्याचा मार्ग त्यांनी शोधून

काढला. जे जाणूनबुजून फसविले जातात ते मोक्षाला जातात. ब्रेन (मेंदु) असा टॉप डेव्हलप होतो की सुप्रीम कोर्टाच्या जजवरही मात करेल. अजाणतेपणी तर पूर्ण दुनिया फसते आहेच ना? न फसणारे लोक तर आपल्याला मिळतील पण जाणूनबुजून फसणारे लोक कुठे मिळतील?

ज्ञानी पुरुषांनी या जगाला कुठल्या स्वरूपात पाहिले असेल? कोणी पैसे हडप केले तरी ते करेक्टच आहे. 'तुमचे खरे असेल तर कोणी तुमचे नावही घेणार नाही, असे आहे हे जग.' तेव्हा कुठेही घाबरायचे काही कारण नाही. तरी पण माझे नाव कोण घेईल? असे चॅलेंज देण्याची गरज नाही. जग पूर्णपणे न्यायस्वरूप आहे. ज्ञानी पुरुष हा हिशोब करून बसलेले असतात.

सरकारी नियम तोडून आपले पैसे कोणी हडप करील पण निसर्गाचे नियम कोणाला कसे तोडता येतील? निसर्गाचा नियम तर ते पैसे व्याजासकट चुकते करवील. एक एक परमाणूचा हिशोब जिथे करेक्ट आहे तिथे घाबरायचे कशाला? आपण करेक्ट (खरे) असू तर लुटारुंच्या गावातूनही लुटले न जाता आरपार निघून जाऊ. परंतु जर हिशोबच तसा असेल तर लाख प्रोटेक्शन असूनही लुटले जाऊ.

कर्जदारांनी कसा विवेक ठेवावा याचे उपदेश खूप ऐकले आहेत, पण वसूली करणाऱ्यानेही तेवढेच विवेकी असले पाहिजे, असे फक्त 'या' ज्ञानींनीच म्हटले आहे! पैशांच्या किमतीपेक्षा जास्त महत्त्वपूर्ण, मन कमकुवत न होणे हे आहे.

वसूली करणाऱ्यांसाठी ते एक सुंदर किल्ली देतात. कोणाला पैसे देताना आत बटण दाबून टाका की हे पैसे मी काळ्या कपड्यात बांधून समुद्रात टाकत आहे.

वसूली करणारा जर कर्जदाराला शिवीगाळ करत असेल तर, तर त्या शिव्या देण्या-घेण्याच्या व्यवहारातील एक्स्ट्रा आयटम्स आहेत. त्याचा काय हिशोब आहे याचा विचार 'ज्ञानी पुरुषां'शिवाय कोणी केला आहे का?

आपला भाव शुद्ध असेल तर कितीही कर्ज असेल तरी ते फेडता

येईलच, असा निसर्गाचा नियम आहे. भाव मात्र असा असला पाहिजे की मला लवकरात लवकर पैसे परत करायचे आहेत!

## 22. वसूलीची कटकट

'ए. एम. पटेल' यांनी व्यापारात कसा व्यवहार केला होता? जिथून जिथून घेणे होते तिथून तिथून स्वतःहूनच वसुली करणे बंद केले, त्यामुळे परत कोणी मागायला येणारच नाही, आणि या प्रकारे ते या व्यापारातून सुटले. अरे, त्यांनी तर हद्दच केली, पाचशे रुपये वसूल करायला गेले तेव्हा उलट समोरचा म्हणाला, 'मलाच तुमच्याकडून पाचशे रुपये घ्यायचे आहेत.' तेव्हा त्यांनी चला हिशोब पूर्ण झाला, असे म्हणत चुपचाप देऊन टाकले!

## 23. अडथळा आणल्याने अंतराय पडतात

कार्याच्या सफलतेची इच्छा कोण ठेवत नाही? पण त्याचे रहस्य काय आहे? ज्ञानी म्हणतात, 'तुझी विलपॉवर असेल तर ते कार्य सफल होईलच.' आपला भाव आणि दुवा (आशीर्वाद), दोन्हींची गरज आहे. संपूर्ण निरिच्छक पदापर्यंत पोहोचलेल्याची दुवा असेल तर सर्व काही प्राप्त होईल!

अंतराय कसे पडतात? स्वतःच्याच विचारांनी आणलेल्या अडथळ्यामुळे! त्यातून कसे सुटावे? त्याविरुद्ध विचार करून – 'मी हा डोंगर चढू शकत नाही' असा विचार आला तर डोंगर चढताना अंतराय येतीलच, आणि 'का नाही चढता येणार?' म्हटले की अंतराय नक्कीच दूर होतील. कोणाला फायदा होत असेल त्यात अडथळे आणले तर आपल्याला लाभ होण्यात अंतराय येतीलच.

जिथे अंतराय कर्मे नसतात, तिथे पूर्ण ब्रह्मांडाचे वैभव प्रकट होते. स्वतः परमात्माच आहे. असे ज्ञानी पुरुषाला स्पष्ट दिसते पण तुला तसा अनुभव येत नाही. कारण 'मी चंदुलाल आहे'... असे म्हणून तू स्वतःच स्वतःसाठी अंतराय टाकले आहेत. ज्ञानी पुरुषांची भेट झाल्यावर हे अंतराय दूर होतात आणि भगवंताची भेट होते.

**– जय सच्चिदानंद**

# अनुक्रमणिका

## [ 1 ] जागृती, गुंतागुंतीच्या जीवनात...



## [ 2 ] लक्ष्मीचे चिंतवन



## [ 3 ] गुंतागुंतीतही शांती



## [ 4 ] कंटाळा दूर करा



## [ 5 ] चिंतेपासून मुक्ती

## [ 6 ] भय असतानाही निर्भयता



## [ 7 ] कढापा-अजंपा



## [ 8 ] सावध हो जीवा, अंतिम क्षणी!



## [ 9 ] क्लेशरहित स्थिती हिच समाधी आहे

## [ 10 ] फ्रॅक्चर झाल्यापासूनच जोडण्याची सुरुवात



## [ 11 ] पाप-पुण्याची परिभाषा



## [ 12 ] कर्तेपणामुळेच थकवा



## [ 13 ] लक्ष्मीचा भोगवटा



## [ 14 ] प्राकृतिक गुणांची पसंती

## [ 15 ] दु:ख दूर करण्याचे साधन



## [ 16 ] बॉस-नोकरांमधील व्यवहार



## [ 17 ] खिसा कापला गेला? तरीही समाधान!



## [ 18 ] क्रोधाच्या कमकुवतपणासमोर



## [ 19 ] व्यापारातील अडचणी

## [ 20 ] नियमात राहून अनीती



## [ 21 ] कला, जाणूनबुजून फसवून घेण्याची



## [ 22 ] वसुलीचा त्रास



## [ 23 ] अडथळा आणल्यामुळे अंतराय पडतात





# आप्तवाणी

## श्रेणी - 7

## [ 1 ]

## जागृती, गुंतागुंतीच्या जीवनात...

### संसाराच्या साररूपात काय मिळाले?

परवशता वाटत नाही का? हे असे जीवन जगणे तुम्हाला आवडते? परवशता वाटते तेव्हा तुम्ही काय करता? एखाद्या राजाचा मुलगा असेल आणि तो जर जंगलात भरकटला असेल तर तो भीकही मागेल! 'अरे, तू राजाचा मुलगा आहेस तरी पण तू भीक मागतोस?' तर म्हणेल, 'दुसरा काही इलाज नाही ना!' असा आहे हा संसार! हा कसा आवडेल? असा संसार तुम्हाला का आवडतो? हा देहाध्यास आता सुटावा अशी काही भावना होते का तुम्हाला? देहाध्यास सोडून मोक्षाला जायचे आहे, आता या संसारात राहायचे नाही, अशी भावना तर होते ना? पण नंतर मनुष्य परत विसरून जातो!

मार खातो (खूप दु:ख भोगतो) आणि विसरून जातो. परत मार खातो आणि परत विसरून जातो, याला मोह म्हणतात! मार खाल्ला तेव्हा तर ठरवून टाकले होते, पण परत या मोहाने जखडून टाकले, यात या संसारात चोखण्यासारखे काय आहे? ही तर सर्व घाण आहे, उष्टे आहे! या संसाराचे वर्णन जर 'ज्ञानी पुरुषां'कडून ऐकाल तर ऐकताक्षणीच वेडे व्हाल! इथे तर अंधारातच सर्व काही चाललेले असते. तरी पण यात संसाराचा दोष नाही. संसार बिचारा तर चांगला आहे, तुमची समजच चुकीची आहे. त्याला हा संसार काय करेल? तुम्हीच मानून

बसला आहात की 'मीच चंदुभाई आहे', 'मीच ब्राह्मण आहे', असे सर्व चुकीचे मानून बसलात, त्यात संसाराचा काय दोष? संसारात तर हे सगळे (ज्ञानप्राप्त महात्मा) पण राहतातच ना? आणि मी काय संसाराबाहेर निघून गेलो आहे का? मी सुद्धा म्हणतो की 'या शेठचे आम्ही काका आहोत.' पण ज्या तऱ्हेने तुम्ही म्हणता तसे आम्ही म्हणत नाही. आम्ही व्यवहार म्हणून म्हणतो. हे तर व्यवहारात ओळखण्याचे साधन आहे. इतर कोणते साधन नाही. वास्तवात कोणी काका नसतोच. खरोखर जर कोणी काका असता ना, तर आपल्याला कोणी काका बनूच दिले नसते. म्हणजेच वास्तवात काका नसतातच, हे तर व्यवहारात एकमेकाला ओळखण्याचे साधन आहे की हे माझे काका, हे माझे मामा, पण वास्तवात तसे नसते. ह्या सर्व गोष्टी पटतात का तुम्हाला?

अशा प्रकारे मायेचा मार खाऊन खाऊन दम निघून गेला. माया म्हणजे काय? स्वत:च्या स्वरूपाचे अज्ञान म्हणजेच माया. जर हे अज्ञान गेले तर संसार दु:खदायक नाही. संसार कष्टदायी नाही. संसार कोणत्याही प्रकारे बाधक होईल असा नाही. मी सुद्धा व्यवसाय करतो, माझ्यावरही सेल्सटॅक्सचा, इन्कमटॅक्सच्या तलवारी लटकत असतात. कोणी म्हणेल, 'हे तर साधु झाले आहेत आणि आम्ही तर संसारी आहोत.' पण तुम्ही असे वेगळेपण मानू नका. मी पण तुमच्यासारखाच आहे, आणि तरी पण मी या अशा पदावर राहू शकतो, असे मला पाहिल्यावर तुमच्यात पण अशी हिम्मत येईल की हे संसारी असूनही असे राहू शकतात तर आपण का राहू शकणार नाही? याउलट त्या संन्याशांनी तर संसार सोडलेला असतो म्हणून आपल्याला वाटते की, 'बाबा, यांना तर इन्कमटॅक्स नाही, सेल्सटॅक्स नाही, खाण्या-पिण्याची काही अडचण नाही. म्हणून ते करू शकतात, त्यांच्यासारखे आम्हाला जमणार नाही. असा फरक आपल्याला जाणवतो, पण इथे असा फरक नाही. इथे तर मी प्रत्यक्षच उभा आहे ना?

संसारात किती प्रकारची दु:खे आहेत. पण (एकावेळी) एकच प्रकारचे दु:ख येते. सर्व दु:खे एकदम एकाचवेळी येत नाहीत, तर सर्व आळीपाळीने येतात. एक दु:ख भोगल्यानंतर दुसरे येते, मग तिसरे येते.

सतत दु:खे येतच राहतात. सगळे गोंधळलेले असतील तर काय होणार? दु:ख तर भोगावे लागणारच ना? आणि गोंधळात पण टाकणारच ना?

## जंजाळात जखडलेले जीवन

संसाराचा हा जंजाळ सोडून सुटेल असा नाही, तो ज्ञानाने सुटेल असा आहे. केव्हापासून या जंजाळातून सुटण्याची इच्छा होत आहे? तारुण्यात तर यापासून सुटण्याची इच्छा होत नाही, उलट जंजाळ वाढविण्याची इच्छा होते ना?

**प्रश्नकर्ता :** तसे तर म्हातारपणी देखील सुटण्याची इच्छा होत नाही, परंतु जर तुमच्याकडून असे काही प्रयत्न झाले तर मात्र आम्ही सुटू शकू.

**दादाश्री :** हो, बरोबर आहे. म्हातारपणी देखील या जंजाळातून सुटण्याची इच्छा होत नाही, असे आहे.

**प्रश्नकर्ता :** यातून सुटण्याचा काही मार्ग आहे का?

**दादाश्री :** या जंजाळातून सुटण्याचा मार्ग हाच आहे की 'आपण कोण आहोत?' याचे ज्ञान जर 'ज्ञानी पुरुषां'कडून प्राप्त झाले तर तुमची सुटका होईल. जंजाळ कोणालाही आवडत नाही. तुम्हाला आवडते का हे जंजाळ?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** अजिबात नाही? कोणी तुम्हाला फुलांचा हार घातला तर?

**प्रश्नकर्ता :** त्यात जोखीम वाटते.

**दादाश्री :** तरी पण ते आवडतेच ना? जोखीम म्हणता, तर ही सर्व जोखीमच आहे. तरी पण आवडते ना? गोड वाटते ना? खरे तर कोणत्याही प्रकारचे जंजाळ कोणालाच आवडत नाहीत. पण इथे (या जगात) राहण्यापुरती त्याला थोडीफार पसंती हवी असते, उदाहरणार्थ

इथे बसू की तिथे बसू? म्हणजे जिथे पसंत पडेल तिथे बसतो, त्याच्यासारखे आहे हे! या जंजाळातून सुटण्याची इच्छा कधी होते का? जंजाळ आवडतच नाही ना? हे तर जंजाळातच घुसलेले आहेत! जोपर्यंत सुटता येत नाही, तोपर्यंत हे सर्व खाणे-पिणे वगैरे जसे इतर लोक करतात तसेच करत राहावे, परंतु जर सुटता आले, 'ज्ञानी पुरुष' भेटले तर तुम्ही सुटाल. या जंजाळातून सुटलात की परमानंद! मुक्ती!

मनुष्यांना हे क्रोध-मान-माया-लोभ क्षणभरदेखील स्वस्थ बसू देत नाहीत. सतत तडफड, तडफड, तडफड! असे पाहिले आहे का तुम्ही? ही मासोळी तडफडते ना? पाण्याबाहेर काढल्यावर मासोळी जशी तडफडते, तशीच तडफड माणसाची बाहेर न काढताच होते. घरात असले तरी तडफड, ऑफिसमध्ये असले तरी तडफड, दिवसभर तडफड! ही तडफड जर बंद झाली तर किती आनंद होईल? पाहा, आमची तडफड संपली आहे, त्यामुळे कशा कशा गोष्टी निघत आहेत! संपूर्ण जगाची तडफड, तडफड आणि तडफडच होत राहणार. चांगले जेवण जेवतानाही या लोकांची तडफड बंद होत नाही. तर सांगा, हे कसे जगू शकतात, हेच आश्चर्य आहे ना?

## जीवन जगणे शिका

मोठ्या फ्लॅटमध्ये बाथरूम आणि संडास ह्या खोली एवढे मोठे असतात, पण भगवंताचा कोनाडा मात्र एवढासाच असतो. मंदिराएवढे मोठे तर संडास बनवितात! संडासात कोणाचे दर्शन करायचे आहे? इथे तर आपली आपल्यालाच शरम वाटेल! एका शेठने मला सांगितले की हे पाहा, देवासाठी केलेला कोनाडा. नंतर बाथरूम दाखवले आणि मोठे तीन संडास दाखवले. ते मला फ्लॅट दाखवायला घेऊन गेले होते, म्हणाले 'या, या, माझ्या घरी या. चहा घेऊन जा.' म्हणून आम्ही तिथे गेलो होतो. जसे काही स्मशानात बसलो आहोत असे वाटत होते, अजिबात चैन पडत नव्हते.

'माझ्या हिताचे काय आहे' एवढा तरी विचार केला पाहिजे ना? लग्न केले त्यादिवशीचा आनंद आठवणे हितकारी आहे की वैधव्य

आले, त्यादिवशीचा शोक आठवणे हितकारी आहे? लग्न केले त्यादिवशीचा आनंद आठवणे आपल्याला हितकारी आहे. वैधव्याच्या शोकाचे काय करायचे आहे? दोघे विवाह करतात तेव्हा दोघांपैकी एकाला तर वैधव्य येणारच आहे. लग्न करण्याचा हा सौदाच असा केलेला आहे, तर मग रडणे भाकणे कशाला? सौदाच जर असा असेल तर मग रडणे भाकणे करायचे असते का? दोघांपैकी एकाला तर वैधव्य भोगावेच लागणार ना?

## सुगंध पसरविते तेच खरे जीवन

अब्रूदार कोणाला म्हणतात तर ज्याचा सुगंध येतो. हे सर्व तर झाकून ठेवतात. काळाबाजार करतात आणि लपवून ठेवतात. खोटे बोलतात, लुच्चेपणा करतात, हरामखोरी करतात, तरी लपवत राहतात. लोक सध्या भेसळ करत नाहीत का? आणि जर आपण विचारले की भेसळ करावी की नाही? तर म्हणतील, 'करू नये.' अरे, तू भेसळ करून आला आहेस आणि तरी म्हणतोस की भेसळ करू नये? हे कसले ज्ञान? पण यात त्याचा दोष नाही, त्याचे साइंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स बदलले आहेत.

त्यात त्याच्यासमोर बांगड्या ठेवल्या तर तो काय करील? जणू त्याची अब्रूच निघून गेली (असे त्याला वाटते)! आणि घरी पत्नी त्याला सतत खडसावत असते. घरी पत्नी खडसावते की नाही? हा काळ असा नाही का? ती कशी खडसावते हे तुम्हाला माहीत आहे का? 'आज जेवायला मिळणार नाही', असे देखील म्हणते. पण तो बाहेर कोणाला सांगत नाही. आपण विचारले की 'कशी आहे तुमची पत्नी?' तर म्हणेल की 'ही पत्नी तर मी कितीतरी पुण्य केले असेल त्यामुळे मला मिळाली आहे.' का असे म्हणतो? अब्रू झाकण्यासाठी. त्याला वाटते की कोणाला कळले तर माझी अब्रू जाईल. अरे अब्रू आहेच कुठे? कोणाची अब्रू आहे? बाहेर तर कोणी अब्रूदार दिसतच नाही. याला जीवन कसे म्हणता येईल? जीवन किती सुशोभित असले पाहिजे! एक एक व्यक्तीचा सुगंध आला पाहिजे. आसपास अशी कीर्ती पसरलेली असावी की लोक

म्हणतील, इथे हे शेठ राहतात ना, ते किती चांगले आहेत, किती छान बोलतात, त्यांचा व्यवहार किती सुंदर आहे! अशी कीर्ती दिसते का सगळीकडे? लोकांचा असा सुगंध दरवळतो का?

**प्रश्नकर्ता :** कधी कधी काही लोकांचा सुगंध दरवळतो?

**दादाश्री :** काही काही माणसांचा, पण तो किती? आणि त्यांच्या घरी विचारले ना तर दुर्गंधच पसरलेला असतो! बाहेर सुगंध येतो पण त्यांच्या घरी विचारले तर सांगतील 'नाव नका घेऊ त्याचे, बोलूच नका त्याच्याबद्दल.' म्हणजे याला सुगंध म्हणता येणार नाही.

हिंदुस्तानामधील माणसे अशी कशी असू शकतात? तुम्हाला कशी वाटते हिंदुस्तानची डेव्हलपमेंट (विकास)? सर्व डेव्हलपमेंटमध्ये टॉपमोस्ट डेव्हलपमेंट (सर्वोत्तम विकास) आपल्या भारत देशाची आहे. म्हणजे आपण अध्यात्म्यात संपूर्ण डेव्हलप्ड आहोत, पण भौतिक बाबतीत अंडरडेव्हलप्ड आहोत. भौतिकमध्ये आपली संपूर्ण डेव्हलपमेंट झालेली नाही, पण अध्यात्मिक बाबतीत तर आपण पूर्ण डेव्हलप्ड आहोत. मग आपण सुगंधी असलो पाहिजे की नाही?

मुलाला जर तुम्ही सारखे टोचत राहिलात तर तो विरोध करील की नाही? मनुष्य कसा असला पाहिजे? सुगंधी असला पाहिजे. जीवन सुगंधी असले पाहिजे. सुगंधी असेल तर शोभून दिसेल ना? आपण सुगंधी झालो तर सगळे जग बदलेल. पण इथे तर स्वत:मध्येच बरकत (योग्यता, पात्रता) नाही आणि लोकांना सुधारायला निघालेत हे! हा तर एक प्रकारचा व्यापारच म्हणायचा. तरी देखील दारू पिणे, मांसाहार करणे, आणि चुकीच्या मार्गाने जाणे, यापेक्षा तर हे बरे आहे!

आपल्या हिंदुस्तानात एका एका माणसात केवढी जास्त शक्ती आहे! प्रचंड शक्ती आहेत, आत अनंत शक्ती आहे! परंतु जर 'ज्ञानी पुरुष' भेटले तर ते या शक्ती व्यक्त करून देतात. अर्थात शक्ती तर माणसात भरलेली आहेच पण ती अप्रकट असते आणि असेच जीवन जगत जगत म्हातारे होतात आणि अंतिम स्टेशनवर पोहोचतात. असा

हा माणसाचा जन्म, पण बघा ना, काम न होताच वाया जातो! फार बुद्धीशाली माणसाला देखील एक दिवस बुद्धु व्हावे लागेल. म्हणजेच बुद्धीचीही नॉर्मेलिटी असलेली बरी.

## नक्कल करण्यात कसले मोठेपणा

नवीन पँट घालून आरशात पाहत राहतो. 'अरे, आरशात काय पाहतोस?' हा कोणाची नक्कल करतो आहे ते तरी पाहा! अध्यात्मिकवाल्यांची नक्कल केली की भौतिकवाल्यांची? भौतिकवाल्यांची नक्कल करायची असेल तर ते आफ्रिकावाले आहेत, त्यांची का करत नाही? पण हे तर साहेबासारखे दिसण्यासाठी नक्कल करतात. पण तुझ्यात तर काही बरकत (योग्यता, पात्रता)च नाही! कशाला 'साहेब' बनायला जातोस? पण हा तर साहेब बनण्यासाठी असे आरशात पाहतो आणि केसांवर कंगवा फिरवतच राहतो. आता मी ऑलराइट झालो आहे असे मानतो. शिवाय पँट घालून असे मागे हाताने थोपटत राहतो. अरे, कशाला उगाचच थोपटतोस? कोणीही पाहाणारा नाही. सगळे आपापल्या कामात व्यस्त आहेत, आपापल्या चिंतेत पडलेले आहेत. तुला पाहण्यासाठी कोणीही रिकामा बसलेला नाही. सगळे आपापल्या भानगडीत गुंतले आहेत. पण तरी स्वतःला काय समजतो कोण जाणे? मनात मानतो की हे तीनशे रुपये मीटरचे कापड आहे, म्हणून लोक मला किंमत देतील. पण त्याच्याकडे पाहायला कोणीच रिकामा बसलेला नाही ना! पण तरी देखील मनात खूप खुश होतो. घराबाहेर पडायचे झाले तर सारखा पँट बदलत राहतो. 'ए, दुसरी पँट आण!' मग म्हणेल 'ही नाही टेरिलीनची पँट आण!' ही माणसे काय अशी तशी आहेत? अरे, तू स्वतःला काय समजतोस? तुला पाहायला कोणी रिकामा बसलेला नाही. तुझ्यात पाहण्यासारखे आहे तरी काय? तरी पण चांगली पँट घालून काय मानतो कोण जाणे? असे आहे हे जग.

या काळाचे असे आहे की मी एकही माणूस असा पाहिला नाही की जो करेक्ट (बरोबर) बोलत असेल. अर्धे वेडे, हाफ मेंटल लोक आहेत. म्हणून प्रथम तर त्यांचे म्हणणे ऐकूच नका, आधी पारखून घ्या.

आणि जर ऐकलेत ना, तर तुमच्यावर त्याचा परिणाम होईल, म्हणजेच हा अशा अर्ध-वेड्यांचा काळ आहे. आता जरी कोणी आपल्याला सांगितले की 'तुमच्या गोडाऊनला आग लागली आहे.' तर तुम्ही त्याला विचारावे की 'माझ्या गोडाऊनला आग लागली आहे का?' तर म्हणेल की 'मी आत्ताच पाहून आलो ना!' मग आरामात पाणी वगैर पिऊन आपण जावे. चौकशी करावी की खरे काय आहे? तो तर म्हणतो की तुमचेच गोडाऊन जळत आहे. तरी पण आपण म्हणावे 'नाही, जरा चौकशी तर करू दे!' मग तिथे जाऊन पाहिल्यावर कळते की हे तर नगीनभाईचे गोडाऊन जळत आहे. या जगाचा काही ठावठिकाणा नाही! कोणत्याही गोष्टीसाठी यथायोग्य पात्रता असलेला माणूस मी पाहिलाच नाही.

असा विचित्र आहे हा काळ. बिचारी माणसे बिथरलेल्या घोड्यासारखी आहेत. भीती बसली आहे की 'काय होईल, काय होईल?' कोणी बापही तुझा *उपरी* (वरिष्ठ, बॉस, मालक) नाही, मग काय होईल? इतकी हिम्मत देणारा कोणी भेटला तरी हिम्मत येईल ना? मी तर काय म्हटले आहे की तुझा *उपरी* कोणीच नाही. तुझ्यात हस्तक्षेप करणाराही कोणी नाही आणि ही पर्मनन्ट गोष्ट डिसायडेडपूर्वक (ठामपणे) सांगतो आहे. कोणीही *उपरी* नाही, तुम्हीच आहात. तुमच्या ब्लंडर्स आणि तुमच्या मिस्टेक्स, हे दोनच तुमचे *उपरी* आहेत. ब्लंडर्स तर जेव्हा ज्ञानी पुरुष तोडतील तेव्हा तुटतील. त्यानंतर चुकाही निघून जातील. नाही तर ब्लंडर्स अशा सहज निघणाऱ्या नाहीत. कारण स्वतःच अडकून पडला आहे, मग तो त्या कसा काढू शकेल?

## समज हिताहिताची

भगवंत काय सांगतात की माझे सांगणे समजून घ्या, ते समजल्याने तुमचे हित होईल. ज्याला हिताहिताचे भान नाही त्याला मनुष्य म्हणूच शकत नाही ना! ज्या व्यापाऱ्याला नफा-नुकसान समजत नाही त्याला व्यापारी कसे म्हणता येईल? इथे दुकान टाकून बसला असेल पण व्यापारातील नफा-नुकसान समजत नसेल तर काय होईल? दिवाळेच

काढावे लागेल! तसेच हे हिताहिताचे भान म्हणजेच ज्यामुळे या लोकातील हित आणि परलोकातील हित दोन्ही संभाळता येतात. त्याला हिताहिताचे भान म्हणतात. फक्त परलोकातील हित सांभाळले तर एकही सांभाळता येणार नाही. सर्व प्रथम या लोकातील हित सांभाळणे गरजेचे आहे, त्यातच परलोकातील हित समाविष्ट आहे. जो या लोकात हित साधतो, त्याचे परलोकातील हित त्यातच समावलेले असते.

जो स्वत:चे अहितच करत असेल, तो दुसऱ्यांचे हित कसे काय करणार? जे स्वत:चे हित करत असतात ते दुसऱ्यांचे-इतरांचे हित करू शकतात. हे लोक तर तोंडाला एरंडीचे तेल चोपडल्यासारखे (दु:खी, हताश) दिसतात. त्याचे कारण काय? त्यांना विचारले की एरंडीचे तेल चोपडले आहे का? तर म्हणतील नाही, एरंडीचे तेल कुठून चोपडणार? ते तर खूप महाग झाले आहे. त्यांना दिवसभर *अजंपा* (आतल्या आत कुढत राहणे, बेचैन होणे) होत असते की असे करू की तसे करू? असे करू की तसे करू? असे सतत चालू असते! त्यामुळे एरंडीचे तेल चोपडल्याशिवायच चेहऱ्यावर तेल दिसते! अरे, शौचाला जाण्याची देखील ताकद नाही! या जगात कोणी असा जन्मला नाही की ज्याला शौचाला जाण्याची स्वतंत्र शक्ती असेल. अरे, तू हे काय करतो आहेस? कशाला उगीच विचार करत राहतोस? विचार करण्याची काही मर्यादा असते की नाही? औषध घेण्याची मर्यादा असते की नाही? तुम्हाला सांगितले की या औषधाने रोग बरा होईल पण याच्या सात बाटल्या प्याव्या लागतील. परंतु जर तुम्ही सर्व डोस (औषध) एकाच दिवशी पिऊन टाकले तर? डोस तर योग्य प्रमाणातच घ्यायला हवा ना, की सर्व एकाच दिवसात पिऊन टाकायचा? काही जण रात्री बारा वाजेपर्यंत पांघरूण घेऊन योजना आखत असतात. अरे, कशाला योजना आखता? असे केल्याने तर तुम्ही तुमचेच हित बिघडवत आहात. या आधीच बनलेल्या योजनांना का बिघडवता? जी योजना आधीच तयार झालेली आहे, एक्सेप्ट झालेली आहे, मंजूर झाली आहे, त्यात आता तुम्ही काय करू शकणार? कशाला उगाच असे करता? स्वत:चे हित स्वत:च बिघडवता! या सर्व योजना तर आधीच बनलेल्या आहेत, त्यात तुम्ही

नवीन काय बनवणार? आणि हे तर तुम्ही पुढील जन्माच्या योजना आखत आहात!

कोणाच्या डोक्यावर माथेरान (दाट केस असतात) आणि कोणाचे डोके वैराण म्हणजे केसच नसतात, पूर्ण टक्कल असते. माथेरान म्हणजे ज्याचे केस माझ्यासारखे घनदाट आहेत. त्याला वाटते की 'मला टक्कल का पडत नाही' आणि टकल्या मनुष्य केस वाढविण्याची औषधे डोक्यावर लावत असतो, असे आहे हे जग! म्हणजेच आपल्यासाठी तर जे घडले आहे तेच ठीक! टक्कल पडले तर ते ठीक किंवा दाट केस असतील तर तेही ठीक. दुसऱ्यांचे पाहून आपल्याला काय करायचे आहे? पूर्वी एक-दोन जण मला म्हणत असत की 'मला टक्कल का पडत नाही?' मी विचारले, 'तुम्हाला टक्कल कशाला हवी आहे?' तर म्हणे मी अशी म्हण ऐकली आहे की, 'टकल्या क्वचितच निर्धन असतो.' अर्थात जो टकल्या आहे तो क्वचितच निर्धन असतो. म्हणजे ते धनवान होण्यासाठी टकले होतात! आणि टकले केस येण्यासाठी औषधे घेतात. असे घनचक्कर आहे हे जग. स्वत:च्या हिताहिताचे भान नाही. स्वत:चे हिताहिताचे अजिबात भान नाही. सांसारिक हिताहिताचेही भान राहिलेले नाही. सांसारिक हित कशात आहे हेही कळत नाही, तर मग मोक्षाच्या हिताहिताचे भान कसे राहील?

सध्या तर सांसारिक हिताचे भान कशाला म्हणावे? तर ज्याच्यात योग्य प्रमाणात नैतिकता आहे, योग्य प्रमाणात प्रामाणिकपणा आहे, ज्याचा लोभ नॉर्मल आहे, ज्याच्यात कपट नाही, मानही नॉर्मल आहे, त्याला सांसारिक हिताचे भान आहे असे म्हणावे. नाही तर जे ॲबनॉर्मल लोक आहेत त्यांना काय हिताचे भान राहत असेल? जो लोभांध झाला आहे, तो कोणाशी डोके आपटेल, हे काही सांगता येत नाही. ज्याला सांसारिक हिताचे भान असेल त्याला मनुष्य म्हणतात. नाही तर यांचा फोटो काढला तर लोक म्हणतील खरे की हा माणसाचा फोटो आहे, पण आत माणसाचे गुण नाहीत.

आपल्याला या मनुष्य जन्मात कोणते काम करायचे आहे? तर

मोक्षाच्या हेतू पुरतेच, तेवढेच काम पूर्ण करायचे आहे. मोक्ष मिळविण्यासाठी जी साधने मिळाली आहेत, त्या साधनांची आराधना करण्यासाठी हा मनुष्य देह आहे. आपल्या हिंदुस्तानासाठी फक्त एवढेच आहे. बाकी दुसरे लोक तर जे करतात ते करेक्टच (बरोबरच) आहे. त्यात त्यांची काहीच चूक नाही.

लोकांना तर स्वत:च्या संपूर्ण हिताची माहितीच नाही. त्यांना फक्त शारीरिक हिताची, भौतिक हिताची माहिती आहे. पण अध्यात्मिक हिताची त्यांना माहिती नाही. म्हणून भौतिक कार्येच करत राहतात!

डोळे मिटलेले होते तोपर्यंत सरळ असतो. जागा झाल्यावर लगेच आरडाओरडा व कलह सुरू करतो! 'हे सगळे वेडे-वाकडे आहे, असे आहे, तसे आहे, हा चहा किटलीत का आणला नाही?' वगैरे. अरे, सोड ना हे सर्व, चहा घे ना शांतपणे! तरी परत म्हणेल, 'चहा अगोड का आहे?' मग ती किटली डोक्यावर मारली तर काय होईल? जाग आली, डोळे उघडले की लगेच कटकट सुरू करतात. अशी माणसे असतात की नाही? जाग आल्यापासून हेच, 'चहा किटलीत का आणला नाही? चहा कडक नाही!' असे सगळे सुरू होते! अरे, मुकाट्याने पिऊन घे ना, कडक नाही, चांगला नाही, असे न म्हणता! अरे, किती उणीवा काढत रहाशील, मग पत्नी चिडणारच ना की याला सवयच वाईट पडलेली आहे, पण मनातल्या मनातच, उघड तर बोलू शकत नाही. मनात म्हणेल, 'हा मुळातच वाकडा आहे. लग्न करायला आला होता तेव्हापासूनच वाकडा आहे', हे सर्व तिला समजते. पण तोंडावर कसे बोलणार? पण त्याने मर्यादा सोडली तर मग ती पण लाज बाळगणार नाही. म्हणून पत्नी एक दिवशी त्याच्याशी भांडते. कारण तो सकाळी उठल्या उठल्या कलह सुरू करतो ना? खरे तर अस्सल खाण्या-पिण्याच्या गोष्टी आहेत, कधी न मिळतील अशा सर्व वस्तू मिळाल्या आहेत पण या लोकांना त्याचा उपभोग घेता येत नाही. योग्य समजच नष्ट झाली आहे. 'जीवन कसे जगले पाहिजे?' याचे अजिबात भान राहिलेले नाही.



# [ 2 ]
# लक्ष्मीचे चिंतवन

## आपण लक्ष्मी प्राप्तीच्या स्पर्धेत तर नाही ना?

दुनियेचा कायदा असा आहे की हिंदुस्तानात जे बरकत (योग्यता, पात्रता) नसलेले जन्म घेतात त्यांच्याकडे लक्ष्मी वाढत जाते आणि ज्यांच्याकडे बरकत आहे त्यांना पैसे मिळू देत नाही. म्हणजेच इथे नसलेल्यांकडे लक्ष्मी गोळा झाली आहे आणि त्यांना टेबलावर तयार जेवण मिळते. पण जेवायचे कसे हे मात्र त्यांना कळत नाही.

**प्रश्नकर्ता :** ज्यांना प्राप्त झाले आहे, ते अधिक प्राप्त करण्यासाठी आणि ज्यांना प्राप्त झाले नाही, ते प्राप्त करण्यात व्यग्र का राहतात?

**दादाश्री :** काय प्राप्त करण्याचे विचारत आहात?

**प्रश्नकर्ता :** ही आर्थिक बाब आहे, भौतिक बाब आहे. ज्यांना भौतिक सुखे प्राप्त झाली आहेत ते अधिक प्राप्त करण्यात व्यग्र असतात आणि ज्यांना प्राप्त झालेली नाहीत, ते प्राप्त करण्यात व्यग्र असतात, ते का?

**दादाश्री :** लोकांना रेसकोर्समध्ये (स्पर्धेत) उतरायचे आहे. रेसकोर्समध्ये जे घोडे धावतात, त्यातल्या कोणत्या घोड्याला बक्षीस मिळते?

**प्रश्नकर्ता :** पहिल्या घोड्याला.

**दादाश्री :** मग तुमच्या शहरात कोणता घोडा पहिल्या नंबरावर आहे? रेसकोर्समध्ये जो पहिला आला, त्यात कोणाचे नाव आहे? म्हणजे सगळे घोडे धावतात आणि धापा टाकत मरतात पण पहिला नंबर कोणाचाच येत नाही. आणि या दुनियेतही कोणाचा पहिला नंबर आलेला नाही. हे सर्व तर कारण नसताना स्पर्धेत उतरले आहेत. यात तर धापा टाकत टाकत मरायचे! आणि बक्षिस तर एकालाच मिळेल! म्हणून या स्पर्धेत उतरण्यासारखे नाही. आपण आपल्या परीने शांतपणे काम करत राहावे. आपली सर्व कर्तव्ये पार पाडावीत. पण या रेसकोर्समध्ये उतरण्यासारखे नाही. तुम्हाला या रेसकोर्समध्ये उतरायचे आहे?

**प्रश्नकर्ता :** जन्माला आलो आहोत तर रेसकोर्समध्ये उतरावेच लागेल ना?

**दादाश्री :** मग धावा, कोणी अडवले आहे? जेवढे धावता येईल तेवढे धावा! पण आम्ही तुम्हाला सांगतो की कर्तव्ये पूर्ण करा आणि शांतीपूर्वक पूर्ण करा. रात्री अकरा वाजता आपण सगळीकडे तपास करावा की लोक झोपले आहेत की नाही? आणि लक्षात आले की लोक झोपले आहेत तर तुम्ही सुद्धा पांघरूण घेऊन झोपी जा आणि धावणे बंद करा. सगळे जण झोपलेले असतील आणि आपण एकटेच विनाकारण धावाधाव करत राहू, असे कशाला? हे काय आहे? लोभ नावाचा जो गुण आहे, तो आपल्याला सतावत असतो.

## ...तर मग आत्म्याची उपासना केव्हा करणार?

तुम्हाला रात्रंदिवस लक्ष्मीची स्वप्ने पडतात का?

**प्रश्नकर्ता :** स्वप्न पडत नाहीत पण तशी स्वप्न पडावीत अशी इच्छा तर आहे.

**दादाश्री :** मग कोणी अडचणीत असेल आणि तो तुमच्याकडे पाचशे रुपये मागायला आला तर तुमची काय दशा होईल? अरे बाप रे, माझे (पैसे) कमी झालेत तर? असेच वाटते ना? कमी करण्यासाठीच तर हे रुपये आहेत, ते काही सोबत घेऊन जायचे नाहीत. जर सोबत

घेऊन जाता येत असते ना, तर हे वाणी लोक, ते तर खूप अक्कलवान आहेत, ते सोबत घेऊन गेले असते. पण तुमच्या जातीत विचारून पाहा, कोणी घेऊन गेले आहे का? मला वाटते कनवटीत घालून घेऊन जात असतील? जर पैसे असे सोबत नेता येत असते तर आपण पैशाचे ध्यानही करू पण ते सोबत नेता येत नाहीत ना?

**प्रश्नकर्ता :** तर मग माणसाला पैसे गोळा करण्याची प्रबळ इच्छा का होते?

**दादाश्री :** ते तर लोकांचे पाहून तसे करतात. हा असे करतो आणि मी तर करत नाही असे त्याला वाटते. दुसरे असे की त्याला वाटते की पैसा असला म्हणजे सर्व काही आणता येईल, पैशांने सर्व काही मिळते. पण दुसरा नियम त्याला माहीत नसतो की पैसे कशाच्या आधाराने येतात! जर शरीर तंदुरुस्त असेल तर झोप येते, तसेच मन तंदुरुस्त असेल तर लक्ष्मीजी येते.

**प्रश्नकर्ता :** तरी देखील आता मोक्ष कोणालाच नको आहे, फक्त पैसाच हवा आहे.

**दादाश्री :** म्हणूनच भगवंतांनी सांगितले आहे, की हे सर्व प्राण्यांसारखे मरतात. कुत्रे, गाढव हे प्राणी जसे मरतात ना, तसेच हे लोक मरतात, अकाल मृत्यु होतो. हाय पैसा! हाय पैसा! असे करत करत मरतात! पैशांची आठवण येणे यात देखील खूप जोखीम आहे, तर मग पैशांची उपासना करण्यात केवढी मोठी जोखीम असेल? मला काय सांगायचे आहे, ते तुमच्या लक्षात येते का?

**प्रश्नकर्ता :** ते समजले, पण त्यात जोखीम काय आहे ते समजले नाही. त्यामुळे तर लगेच तात्काळ फायदा होतो ना? पैसा असेल तर सर्व काही मिळते ना! थाटमाट, मोटार-बंगला, सर्व काही मिळते ना?

**दादाश्री :** म्हणून काय कोणी पैशाची उपासना करीत असेल?

**प्रश्नकर्ता :** तेच तर करतात ना?

**दादाश्री :** म्हणजे महावीरांची उपासना बंद झाली आणि लक्ष्मीची उपासना सुरू झाली, असेच ना? मनुष्य एकाचीच उपासना करू शकतो, एक तर पैशाची किंवा आत्म्याची. एका व्यक्तीचा एकाच वेळी दोन ठिकाणी उपयोग राहू शकत नाही. दोन ठिकाणी उपयोग कसा राहील? एकाच ठिकाणी राहील. पण एक चांगले आहे की आता मनुष्याला पैसे सोबत घेऊन जाण्याची सूट दिली आहे. ते चांगले आहे ना?

**प्रश्नकर्ता :** पैसे कुठे सोबत घेऊन जातात? सगळे इथेच तर ठेऊन जातात, सोबत काहीच येत नाही.

**दादाश्री :** असे होय? पण सोबत घेऊन जातात ना? नाही, तुम्हाला ती कला अवगत नाही (!) तुम्ही त्या ब्लडप्रेशरवाल्यांना विचारा की ही कला कशी आहे? तुम्हाला ते माहीत नाही.

एक शेठ भेटले होते. ते तसे लखपती होते. माझ्यापेक्षा पंधरा वर्षांनी मोठे, पण माझ्याबरोबर उठणे-बसणे होते. त्यांना एके दिवशी मी म्हटले की, 'शेठ, ही मुले तर सगळी कोट-पँट घालून हिंडतात आणि तुम्ही दोन्ही गुडघे उघडे दिसतील इतके छोटेसे धोतर का नेसता?' ते शेठ जेव्हा जीनालयात दर्शन करण्यासाठी जात असत तेव्हा असे उघड्या अंगाचे दिसत असत, एवढेसे धोतर, जसे काही लंगोट लपेटून चालले आहेत असे वाटत असे. एवढीशी बंडी आणि सफेद टोपी आणि घाई-घाईत दर्शन करण्यासाठी जात असत. मी म्हटले की मला वाटते 'तुम्ही हे सगळे तुमच्या सोबत घेऊन जाणार.' तर म्हणाले 'नाही, घेऊन जाता येत नाही, अंबालालभाई! सोबत घेऊन जाता येणार नाही.' मी म्हटले की, 'तुम्ही तर हुशार लोक, आम्ही पटेल एवढे हुशार नाही पण तुमचा तर हुशार लोकांचा समाज, काही तरी शोधून काढले असेल!' तर म्हणाले, 'नाही, कोणालाच काही घेऊन जाता येत नाही.' नंतर त्यांच्या मुलाला विचारले की, 'तुमचे वडील तर असे म्हणत होते.' तर तो म्हणाला, 'हे चांगलेच आहे की सोबत घेऊन जाता येत नाही. जर घेऊन जाता आले असते ना, तर आमचे वडील आमच्या डोक्यावर तीन लाखाचे कर्ज ठेऊन जातील, असे आहेत. आमचे वडील तर खूप पक्के

आहेत. म्हणून घेऊन जाता येत नाही तेच चांगले आहे. नाही तर वडील तर तीन लाखाचे कर्ज ठेवून आम्हाला भटकायला लावतील, माझ्याकडे घालायला कोट-पँटही शिल्लक राहणार नाही! जर सोबत घेऊन जाता येत असते ना, तर आम्हाला दरिद्री करून टाकतील, असे पक्के आहेत.'

**प्रश्नकर्ता :** कर्ज करूनही घेऊन गेले असते.

**दादाश्री :** कर्ज करूनही पैसे सोबत घेऊन गेले असते. पण तो मुलगा म्हणत आहे ना की, 'घेऊन जाता येत नाही तेच बरे आहे, नाही तर माझे वडील तर तीन लाखाचे कर्ज करून ठेवतील असे आहेत!'

## संतोष, लक्ष्मीमुळे की ज्ञानामुळे?

**प्रश्नकर्ता :** हे लोक पैशाच्या मागे लागले आहेत, तर त्यांना संतोष का वाटत नाही?

**दादाश्री :** आपल्याला कोणी म्हटले की संतोष माना. तर आपण त्यांना म्हणू की भाऊ, तुम्ही तर मानत नाही, मग मला कशाला सांगता? खरे तर संतोष मानता येत नाही. त्यातूनही कोणाच्या सांगण्यावरून मानता येईल असे तर नाहीच. संतोष तर जितके ज्ञान असेल त्या प्रमाणात स्वाभाविक रूपात राहत असतो. संतोष ही करण्याची गोष्ट नाही. तो तर परिणाम आहे. जशी परीक्षा तुम्ही दिली असेल तसा परिणाम येईल. तसेच जितके ज्ञान असेल त्याच्या परिणाम स्वरूपात तितकाच संतोष होईल. संतोष राहावा म्हणूनच तर लोक इतकी सगळी मेहनत करतात! पाहा ना, संडासात देखील दोन कामे करतात. दाढी आणि संडास, दोन्ही करतात! एवढा जास्त लोभ असतो! हे तर सर्व इंडियन पझल (भारतीय कोडे) आहे! हे इंडियन पझल कोणी सोडवू शकत नाही की असे का होते? म्हणून तर इंडियन पझल म्हटले आहे ना!

## ज्याचे प्रमाण निश्चित, त्याचे चिंतन कशाला?

पैसे तर जितके यायचे असतील तितकेच येतील. धर्म केला तरी तितकेच येतील आणि अधर्म केला तरी तितकेच येतील. पण अधर्मात

पडला तर पैशाचा दुरुपयोग होईल. आणि तो दु:खी होईल. आणि धर्मासाठी सदुपयोग केला तर सुखी होईल. शिवाय मोक्षालाही जाता येईल. नाही तरी पैसे तर तेवढेच यायचे असतात.

पैशांचा विचार करणे ही एक वाईट सवय आहे. ती वाईट कशी आहे? एखाद्याला खूप ताप आला तर आपण त्याला वाफ देऊन त्याचा ताप उतरवतो. वाफ दिली की त्याला खूप घाम येतो, म्हणून मग रोजच असे वाफ देऊन घाम काढत राहिलो तर, त्याची काय स्थिती होईल? त्याला वाटते की असे केल्याने एके दिवशी मला खूप फायदा झाला होता, माझे शरीर हलके झाले होते, मग आता हे रोजच करायची सवय लावली पाहिजे. तो रोज वाफ घेऊन घाम काढत राहिला तर काय होईल?

**प्रश्नकर्ता :** शरीरातील सर्व पाणी निघून जाईल.

**दादाश्री :** मग लाकडासारखा होईल. जसे हे कांदे सुकवितात ना? तसेच आहे हे. लक्ष्मीचे चिंतन करणे, हे तसेच आहे. जसा घाम योग्य प्रमाणात येतो, तशीच लक्ष्मी योग्य प्रमाणात येतच राहते. तुम्हाला तुमचे काम करत जायचे आहे. कामात गाफील राहू नका. लक्ष्मी तर येतच राहील. लक्ष्मीचा विचार करू नका की इतकी यावी आणि तितकी यावी, किंवा आली तर चांगले, असाही काही विचार करायचा नाही. कारण यामुळे तर लक्ष्मीजीला फार राग येतो. मला लक्ष्मीजी रोज भेटतात, तेव्हा मी त्यांना विचारतो की आपण का रुसला आहात? तेव्हा लक्ष्मीजी म्हणतात, ''हे लोक तर आता असे झाले आहेत की 'आपण माझ्या इथून जायचे नाही' असे मला म्हणतात.'' मग काय लक्ष्मीजींनी त्यांच्या माहेरी जाऊच नये? लक्ष्मीजींना घरीच अडवून ठेवायचे असते का?

## लक्ष्मी वाढली, तर कषाय कमी झालेत का?

या कलियुगात पैशांचा लोभ ठेऊन स्वत:चा जन्म बिघडवितात आणि मग मनुष्यपणात आर्तध्यान, रौद्रध्यान होत राहतात, म्हणून मनुष्यपण निघून जाते. मोठमोठी राज्ये उपभोगून आले आहेत. हे काही

अगदी भिकारी नव्हते. पण आता मात्र मन भिकाऱ्यासारखे झाले आहे. म्हणून हे पाहिजे, ते पाहिजे असे वाटत राहते. नाही तर ज्याचे मन तृप्त झाले आहे, त्याला काहीही दिले नाही तरी तो राजसी (मोठ्या मनाचा) असतो. पैसा अशी वस्तू आहे की त्यामुळे माणसाची दृष्टी लोभाकडे वळते. लक्ष्मी तर वैर वाढविणारी गोष्ट आहे. तिच्यापासून जितके दूर राहता येईल तितके उत्तम आणि जर खर्च झाली तर चांगल्या कामासाठी खर्च झाली, तर चांगलेच आहे.

**प्रश्नकर्ता :** सध्या तर पैसा स्वस्त झाला आहे.

**दादाश्री :** पैसा स्वस्त झाला आहे. पैसा स्वस्त झाला की मनुष्य स्वस्त होतो. पैसा महाग झाला की मनुष्य महाग होतो. माणसाची किंमत कधीपर्यंत असते? तर पैसा महाग असेपर्यंत. पैसा स्वस्त झाला की मनुष्याची किंमतही स्वस्त होते! मग केस कापून घेणे देखील महाग होते, सगळेच महाग होते.

## लक्ष्मीच्या ध्यानामुळे, अपार जोखीम

लक्ष्मी तर हाताचा मळ आहे आणि मळ तर साहजिकपणे येणारच. तुमचा या वर्षी पाच हजार सातशे पाच रुपये आणि तीन आणे, एवढा हिशोब यायचा असेल तर तेवढा येईल, हिशोबाबाहेर कधीही जाणार नाही. आणि तरी पण हे जे जास्त येताना दिसतात, ते तर जसे बुडबुडे फुटतात तसे फुटून जातील पण हिशोब जेवढा आहे तेवढाच राहील. जर अर्धे पातेले दूध घेतले आणि त्या खाली लाकडे जाळली, पातेले त्यावर ठेवले, तर पातेले दुधाने भरते ना? उकळी आल्यामुळे दूध वर येऊन पूर्ण पातेले भरून जाते, पण ते भरलेले टिकते का? ते वर आलेले दूध टिकत नाही. म्हणजेच जितका हिशोब आहे तेवढीच लक्ष्मी राहील. लक्ष्मी तर आपोआपच येत असते. मी 'ज्ञानी' झालो आहे, माझ्या मनात संसारासंबंधी विचार येतच नाहीत, तरी पण लक्ष्मी येतच आहे ना! तुमच्याकडेही आपोआपच येत असते, पण तुम्हाला काम करणे अनिवार्य आहे. तुमच्यासाठी अनिवार्य काय आहे? तर काम आहे.

लक्ष्मी तर बायप्रॉडक्ट आहे. जसे की आपला हात ठीक राहील किंवा पाय ठीक राहील, यासाठी रात्रंदिवस विचार करावा लागतो का? नाही. का? हाता-पायाची आपल्याला गरज नाही का? आहेच. पण त्यासाठी विचार करावा लागत नाही. तसेच लक्ष्मीसाठी देखील विचार करण्याची गरज नाही. तरी देखील आपला हात दुखत असेल तर तो बरा होण्यासाठी विचार करावा लागतो, त्याचप्रमाणे जर कधी लक्ष्मीसाठी विचार करावा लागला तर तो तेवढ्यापुरताच करायचा, नंतर विचार करायचा नाही, इतर भानगडीत पडायचे नाही. लक्ष्मीचे स्वतंत्रपणे ध्यान केले पाहिजे का? जर एकीकडे लक्ष्मीचे ध्यान केले तर दुसरीकडे दुसरे ध्यान करण्याचे राहते. स्वतंत्र ध्यानात तर, लक्ष्मीच काय पण स्त्रीचे ध्यानही करू नये. स्त्रीचे ध्यान केले तर स्त्रीसारखा होईल. लक्ष्मीचे ध्यान केले तर चंचल होईल. लक्ष्मी चंचल आणि ध्यान करणाराही चंचल. लक्ष्मी तर निरंतर सगळीकडे हिंडत राहते, तसेच तोही हिंडत राहील. लक्ष्मीचे ध्यान तर करूच नये. ते तर सर्वात मोठे रौद्रध्यान आहे. आर्तध्यान नव्हे तर रौद्रध्यान आहे! कारण स्वतःच्या घरी खाणे-पिणे सर्व काही आहे, तरी देखील अजूनही अधिक लक्ष्मीची आशा ठेवतो, म्हणजे दुसऱ्यांना तेवढी कमी पडते. दुसऱ्यांना कमी पडेल असे संतुलन भंग करू नका. नाही तर तुम्ही गुन्हेगार ठराल. सहजच आपोआप येईल तर तुमचा गुन्हा नाही. सहजपणे तर पाच लाख येतील किंवा पन्नास लाख येतील. पण मग आल्यावर लक्ष्मीला रोखून ठेवू नये. लक्ष्मी काय म्हणते? मला रोख नका. जितकी आली आहे तेवढी देऊन टाका.

## केलेली मेहनत केव्हा उपयोगी येते?

**प्रश्नकर्ता :** आम्ही तर व्यापारात इतके गढून गेलो आहोत की लक्ष्मीचा मोह जातच नाही. त्यातच डुबत राहिलो आहोत.

**दादाश्री :** आणि तरी देखील पूर्ण संतोष होतच नाही ना! पंचवीस लाख साठवावे, पन्नास लाख साठवावे, असे होतच राहते ना? असे आहे की, पंचवीस लाख साठवण्याच्या मागे मी ही लागलो असतो,

पण मी हिशोब करून पाहिला की या इथे आयुष्याला एक्सटेन्शन (वाढ) मिळत नाही. प्रत्येक गोष्टीला एक्सटेन्शन मिळते ना? जी मुदत असते ती वाढवून देतात, एक्सटेन्शन करतात, पण आयुष्यात वाढ होत नाही ना! मग आपण का त्रास करून घ्यावा? शंभराऐवजी हजारेक वर्ष जगायचे असेल तर ठीक आहे, केलेली मेहनत कामाला येईल. इथे तर कधी असाल कधी नसाल याचा काही ठिकाणा नाही, आणि हे सर्व तुम्ही करता की कोणी करून घेत आहे? तुम्हाला काय वाटते?

## कमाई-नुकसान, सत्ता कुणाची?

**प्रश्नकर्ता :** सर्व आम्हीच करतो ना? कोणी करून घेत नाही.

**दादाश्री :** नाही, हे कोणीतरी करून घेत असतो आणि तुम्हाला वाटते की मी करतो. कोणाला पैसे देता तेही कोणीतरी करून घेत असतो. आणि देत नसाल तर तेही कोणीतरी करून घेत असतो. बिझनेस करता तोही कोणीतरी करून घेत असतो. नुकसान होते तेही कोणीतरी करवीत असतो आणि फायदा होतो तोही कोणीतरी करवीत असतो. तुम्हाला असे वाटते की 'मी करतो', तो इगोइजम आहे. हे कोण करून घेत आहे? त्याला ओळखावे लागेल ना? आम्ही त्याची ओळख करून देतो. जेव्हा ज्ञान देतो तेव्हा सर्व काही समजावून सांगतो की 'कोण करीत आहे?'

एक स्वसत्ता आहे आणि दुसरी परसत्ता. स्वसत्ता की ज्यामुळे स्वतः परमात्मा बनू शकतो. पण पैसे कमावण्याची सत्ता तुमच्या हातात नसते, ती परसत्ता आहे. मग पैसे कमावणे चांगले की परमात्मा बनणे चांगले? पैसे कोण (मिळवून) देते ते मला माहीत आहे. पैसे कमावण्याची सत्ता जर स्वतःच्या हातात असती ना, तर भांडण-तंटे करून कुठूनही पैसे घेऊन आला असता. पण ती परसत्ता आहे. म्हणून काहीही करा, तरी काही निष्पन्न होत नाही. एका माणसाने मला विचारले, 'लक्ष्मी कोणासारखी आहे?' तर मी उत्तर दिले की 'झोपे सारखी.' काही लोकांना पडल्या पडल्या लगेच झोप लागते आणि काहीना रात्रभर कुस बदलत राहूनही झोप येत नाही, आणि काही लोक

झोप येण्यासाठी गोळ्या घेतात. म्हणजे ही लक्ष्मी तुमच्या सत्तेत नाही, ती परसत्ता आहे. आणि परसत्तेचा त्रास आपण का करून घ्यावा?

## एवढा पैसा! पण मरण सुधारले नाही

रताळे जसे भट्टीत भाजले जाते, तसा मनुष्य जन्मभर भाजला जात असतो.

**प्रश्नकर्ता :** हो, तडफडतच जगत असतो.

**दादाश्री :** जगणार नाही तर काय करणार? कुठे जाणार? जगणे देखील अनिवार्य आहे आणि मरण्याची सत्ता तर कोणाच्याच हाती नाही. मरायला जाल तेव्हा कळेल, पोलीस पकडेल आणि केस करेल. जसे जेलमध्ये असलेल्या माणसाला नाईलाजाने सर्व काही करावे लागते ना, तसेच हे जगणे अनिवार्य आहे, पैसा पण अनिवार्य आहे.

लक्ष्मीसाठी हाय, हाय करायचे असते का? आणि हाय हाय करून कोणी संतुष्ट झाला आहे? या जगात कोणाचा पहिला नंबर आला असे कधी समजले का तुम्हाला? इथे मुंबई म्युनिसिपालिटीमध्ये कोणाचे नाव नोंदविलेले आहे की, हा पहिला आला, हा दुसरा आला, अशी काही नोंद आहे का? इथे तर मनुष्य जन्म घेतो, करोडो रुपये कमावतो आणि मरून जातो. कुत्र्यासारखा मरतो. कुत्र्यासारखे अशासाठी म्हणतो की डॉक्टरांकडे जावे लागते. आधी तर लोक माणसाच्या मृत्यूने मरत असत. ते म्हणत, 'बाबा रे, आता माझी जाण्याची वेळ झाली आहे.' मग घरची मंडळी दिवा लावत असत. आणि आजकाल तर शेवटच्या क्षणी बेशुद्धच झालेले असतात. कुत्रेसुद्धा शेवटच्या क्षणी बेशुद्ध होत नाहीत.

## जेवढे स्मरण, तेवढा वियोग

एक गृहस्थ आले होते. त्यांना बिचाऱ्यांना व्यापारात प्रत्येक महिन्यात नुकसान होत असे. ते पैसे मिळविण्यासाठी हाय हाय करीत होते. मी त्यांना म्हटले की पैशांचा विचार का करीत आहात? पैशांची

आठवणही करू नका. मग तेव्हापासून त्यांना अधिक पैसे मिळू लागले. प्रत्येक महिन्यात तीस हजाराचा फायदा व्हायला लागला. नाही तर याआधी वीस हजाराचे नुकसान होत असे. कारण सतत पैशांचीच आठवण यायची ना! पैशांची आठवण करायची असते का? लक्ष्मीमातेला तर भगवंताची पत्नी म्हणतात. मग त्यांचे नाव कसे घेऊ शकतो?

## लक्ष्मीवंताचा तर सुगंध येतो

जर लक्ष्मी सुगंधासहित असेल तर भगवंताने देखील तिला स्वीकारले आहे. मुंबईत तर एवढे लक्ष्मीवान आहेत पण सुगंध आला आहे कोणाचा?

**प्रश्नकर्ता :** कोणीतरी तर असेलच ना?

**दादाश्री :** 'असेल' असे म्हणणे यात फारच जोखीम आहे. एक तर 'नाही' म्हणा, किंवा 'आहे' असे म्हणा. 'असेल' असे अर्धवट बोलण्यात भयंकर जोखीम आहे. अस्पष्टपणामुळेच हे जग असे आहे. 'जसे आहे तसे' बोला. चौकशी तरी करा आणि म्हणा की, 'बाबा अजूनपर्यंत माझ्या पाहण्यात असा कोणी आला नाही.' आपल्याला बोलण्याचा किती हक्क आहे? तर आयुष्यभरात आजपर्यंत मी खूप फिरलो पण अजूनही असा कोणी मला भेटला नाही. तसे तर सुगंधासहित लक्ष्मी कुठे नसतेच मुळी. आता या काळात असेल तर खूप कमी असेल, क्वचितच कुठे असेल.

**प्रश्नकर्ता :** सुगंधासहित लक्ष्मी 'ती' लक्ष्मी कशी असते?

**दादाश्री :** ती लक्ष्मी आपल्याला अजिबात उपाधी (बाहेरून येणारे दु:ख) स्वरूप होत नाही. घरात शंभर रुपये पडलेले असेल तरी त्याची उपाधी होत नाही. कोणी म्हटले की उद्यापासून साखरेवर कंट्रोल येणार आहे तरी देखील मनात उपाधी वाटत नाही. उपाधी नाही, हाय हाय नाही. वागणूक पण किती सुगंधी, वाणी किती सुगंधी आणि त्याला पैसे कमावण्याचा तर विचारही येत नाही. असे तर त्याचे पुण्यानुबंधी पुण्य असते! ज्याच्याकडे पुण्यानुबंधी पुण्य असलेली लक्ष्मी असते,

त्याला पैसे मिळविण्याचा विचारही येत नाही. इथे तर सर्व पापानुबंधी पापाची लक्ष्मी आहे. याला तर लक्ष्मी म्हणताच येणार नाही! निव्वळ पापाचेच विचार येत असतात. 'कसे गोळा करू, कसे गोळा करू?' हेच पाप आहे. असे म्हणतात की पूर्वी शेठ लोकांकडे जी लक्ष्मी होती, ती कशी असे? तर ती लक्ष्मी गोळा होत असे, गोळा करावी लागत नसे. आणि या लोकांना तर गोळा करावी लागते. ती लक्ष्मी तर सहज भावाने येत राहत. स्वत: मात्र म्हणत असे की 'हे प्रभु! ही राजलक्ष्मी तर मला स्वप्नातही नको आहे.' तरीही ती येतच राहत असे. ते काय म्हणत, की आत्मलक्ष्मी येऊ दे पण ही राजलक्ष्मी तर स्वप्नात देखील नको आहे. पण तरीही ती येतच राहत असे, तेच पुण्यानुबंधी पुण्य. त्यांच्याकडे लक्ष्मी तर ढिगाने येत असे, त्यात काही उणीव नसे. कधी विचारही करत नसत, उलट त्यांना त्याचा कंटाळा यायचा की आता जरा ही कमी आली तर बरे, असे त्यांना वाटत असे. पण तरीही लक्ष्मी येतच असे. आणि लक्ष्मी आली तर काय करावे लागते? तिचा योग्य प्रकारे वापर करावाच लागत असे ना? आणि त्यासाठी बरीच मेहनत करावी लागे. पैसे रस्त्यावर तर नाही ना फेकू शकत? आणि तो वापर अशा प्रकारे केला जात असे की लक्ष्मी जात असे पण पुन्हा वारंवार उगवून परत येत असे.

## हे सर्व समजून घ्यायला तर हवे ना!

सध्या जी आहे, तिला लक्ष्मी म्हणताच येणार नाही. ही तर पापानुबंधी पुण्यवाली लक्ष्मी आहे. म्हणजेच अज्ञान तप केले गेले होते, त्यामुळे पुण्य बांधले गेले होते आणि त्याचे फळ म्हणून लक्ष्मी आली. अशी लक्ष्मी माणसाला वेडे करून टाकते. याला सुख कसे म्हणता येईल? सुख म्हणजे तर पैशांचा विचारही येत नाही, त्याला सुख म्हणतात. आम्हाला तर वर्षातून एखादवेळी विचार येतो की खिशात पैसे आहेत की नाही?

**प्रश्नकर्ता :** ओझे वाटते?

**दादाश्री :** नाही, ओझे तर वाटत नाही, पण आम्हाला तसे

विचारच येत नाहीत ना! कशाला विचार करायचे? पुढे-मागे सर्व काही तयारच असते! जसे खाण्या-पिण्याचे तुमच्या टेबलवर येते की नाही? की तुम्ही सकाळपासून त्याचा विचार करत बसता? जप करता की, 'जेवण तयार होईल की नाही? जेवण मिळेल की नाही?' असे करत राहता का? जेवणासाठी जप करावा लागत नाही ना? की सकाळी उठल्यावर जप करता?

**प्रश्नकर्ता :** काही लोक जप करतही असतील.

**दादाश्री :** दुसऱ्यांचे सोडा, तुम्हाला कधी असे झाले आहे?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** अंघोळीसाठी गरम पाणी मिळेल की नाही, मिळेल की नाही, रात्रभर असा जप करावा लागतो का? तरी पण सकाळी अंघोळीला गरम पाणी मिळते की नाही?

**प्रश्नकर्ता :** मिळते.

**दादाश्री :** असे आहे, की जी नेसेसिटी (आवश्यकता) आहे ती नेसेसिटी आपल्या वेळेत येतेच. तिचे ध्यान करण्याची गरज नाही. म्हणूनच म्हटले आहे ना, की लक्ष्मी तर हाताचा मळ आहे. जसे घाम आल्याशिवाय राहत नाही, तसेच लक्ष्मीही आल्याशिवाय राहत नाही. जसे कुणाला घाम जास्त येतो, तसेच लक्ष्मीही जास्त येते आणि कुणाला कमी घाम येतो, तशी लक्ष्मीही कमी येते. हे सर्व समजून तर घेतले पाहिजे ना?

## दान दिल्याने लक्ष्मी अपार वाढते

कधीही कमी पडत नाही, तिचे नाव लक्ष्मी! खोऱ्याने उपसून उपसून धर्मदान करीत राहिले तरीही कमी पडणार नाही, तिला लक्ष्मी म्हणतात. आणि इथे तर हे लोक वर्षभरातून दोन दिवस दान देतात, त्याला लक्ष्मी म्हणतच नाहीत. एक दानवीर शेठ होते, त्यांचे नाव दानवीर कसे पडले? तर त्यांच्याकडे सात पिढ्यांपासून धन दिलेच जात होते.

खोऱ्याने उपसून उपसूनच देत असत. जो येईल त्याला देत. आज कोणी आले की 'माझ्या मुलीचे लग्न करायचे आहे' तर त्याला दिले. कोणी ब्राह्मण आला, त्याला दिले. कोणाला दोन हजाराची गरज असेल तर त्याला दिले. साधु-संतांसाठी तर तिथे एक जागा बनविली होती. तिथे सर्व साधु-संतांची राहण्याची व्यवस्था, भोजन वगैरे सर्व, म्हणजे दान तर जबरदस्त चालले होते, म्हणून त्यांना दानवीर म्हणत! आम्ही हे सर्व पाहिले आहे. जसजसे एकेकाला देत जात तसतसे धन वाढत जात असे.

धनाचा स्वभाव कसा आहे? जर का चांगल्या जागी दानात गेले तर फारच वाढते. असा धनाचा स्वभाव आहे. आणि जर कोणाचे खिसे कापले तर तुमच्या घरी काहीही उरणार नाही. या सर्व व्यापाऱ्यांना आम्ही एकत्र केले आणि विचारले की बाबांनो, कसे काय चालले तुमचे? बँकेत दोन हजार तर असतील ना? तर म्हणतील, साहेब, वर्षभरात लाख रुपये आले, पण हातात काहीच राहिले नाही! म्हणूनच तर म्हण आहे ना की चोराची आई कोठीत तोंड घालून रडते! कारण कोठीत काहीच नसते, म्हणून रडणारच ना!

लक्ष्मीचा प्रवाह दान आहे आणि जो सच्चा दान देणारा असतो तो स्वभावतःच एक्सपर्ट (हुशार) असतो. माणसाला पाहूनच तो समजून जातो की हा जरा बरोबर वाटत नाही. म्हणून त्याला म्हणतो की हे पाहा मुलीच्या लग्नासाठी तुला रोख पैसे मिळणार नाहीत. तुला काय कपडे-लत्ते लागतील, आणखी काही लागेल ते घेऊन जा. आणि म्हणेल तुझ्या मुलीला येथे घेऊन ये. आणि मग मुलीला कपडे, दागिने वगैरे देतो. नातेवाइकांकडे मिठाई स्वतःच्या घरून पाठवून देतो. त्याचा सर्व व्यवहार पाहतो. पण त्याला बरोबर समजते हा लुच्चा माणूस आहे, हातात रोख रक्कम देण्यालायक नाही. म्हणजे दान देणारेही खूप एक्सपर्ट असतात.

## पुण्याच्या प्रतापाने पैसा

लक्ष्मी तर पुण्यशालींच्या मागेच फिरत असते. आणि मेहनती माणसे लक्ष्मीच्या मागे लागलेले असतात. म्हणून आपण लक्षात घेतले पाहिजे की पुण्य असेल तर लक्ष्मी आपल्या मागे येईल. नाही तर मेहनत

केल्यामुळे तर भाकरी मिळेल, खायला-प्यायला मिळेल आणि एखादी मुलगी असेल तर तिचे लग्न करता येईल. बाकी, पुण्याशिवाय लक्ष्मी मिळत नाही.

खरे सांगायचे तर तू जर पुण्यशाली आहेस तर उगाच कशाला हात-पाय मारतोस? आणि जर तू पुण्यशाली नाहीस तर मग हात-पाय कशाला मारतोस?

पुण्यशाली तर कसा असतो? हे अमलदार देखील ऑफिसातून वैतागून घरी येतात, तेव्हा पत्नी काय म्हणते 'दीड तास उशीरा आलात, कुठे गेला होतात?' बघा, हे असे पुण्यशाली. पुण्यशालीसोबत असे होते का? पुण्यशालीला तर हवेची एखादी उलटी झुळूक देखील लागत नाही. लहानपणापासूनच यांची क्वॉलिटी वेगळीच असते. अपमानाचा योग येतच नाही. जिथे जातील तिथे 'या, या, भाऊ', अशा तऱ्हेने लहानाचे मोठे होतात आणि हे लोक तर जिथे तिथे आपटत असतात. याला काय अर्थ आहे? आणि मग जेव्हा पुण्य संपून जाते, तेव्हा परत जसे होते तसेच! म्हणजे जर तू पुण्यशाली नसशील तर रात्रभर कंबर कसून चालत राहिलास तरी सकाळी पन्नास रुपये पदरी पडतील का? म्हणून उगाच हात-पाय मारू नकोस आणि जे मिळेल ते खा, पी आणि निवांत झोप ना!

**प्रश्नकर्ता :** हा तर प्रारब्धवाद झाला ना?

**दादाश्री :** नाही, प्रारब्धवाद नाही. तू आपल्या परीने काम कर, मेहनत करून भाकरी खा. उगाच इकडे-तिकडे हात-पाय कशाला मारतोस? असे गोळा करू आणि तसे गोळा करू! जर तुला घरात मान नाही, बाहेर मान नाही, तर कशाला उगाच धडपडतोस? आणि जिथे जातील तिथे ज्यांना 'या, या, बसा' म्हणणारे असतात, ते इतके मोठे पुण्य घेऊन आलेले असतात, त्यांची तर गोष्टच वेगळी असते ना?

हे शेठ लोक आयुष्यभरासाठी पंचवीस लाख घेऊन आलेले असतात, ते पंचवीस लाखाचे बावीस लाख करतात, वाढवत नाहीत. वाढतील केव्हा? जर ते सदा धर्मात राहिले तर. परंतु जर त्यात

ढवळाढवळ केली तर सर्व बिघडून जाईल. निसर्गात ढवळाढवळ केली की बिघडणारच. त्याला वाटते की या रेतीतून लक्ष्मी येत आहे. म्हणून तो सतत रेती घोटत राहतो पण काही मिळत नाही. लक्ष्मी तर पुण्याचे फळ आहे, केवळ पुण्याचेच फळ आहे. जर मेहनतीचे फळ असती ना, तर ती सर्व मजुरांच्या हातीच पडली असती. आणि अकलेचे फळ असती ना, तर या लोखंडाच्या व्यापाऱ्यां इतके अक्कलवंत कोणीच नसतात, म्हणून ती सगळी लक्ष्मी त्यांच्याकडेच गेली असती. पण तसे नाही. लक्ष्मी तर पुण्याचे फळ आहे.

## पुण्यशाली कोणाला म्हणावे?

लक्ष्मी माणसाला मजूर बनविते. जर लक्ष्मी गरजेपेक्षा जास्त आली तर मग मनुष्य मजुरासारखा होतो. यांच्यापाशी लक्ष्मी जास्त आहे, पण त्याबरोबरच हे दानेश्वर आहेत, म्हणून ठीक आहे. नाही तर मजूरच म्हणावे लागले असते ना? आणि दिवसभर गाढवासारखा राबत राहतो. त्याला बायकोची पर्वा नसते, मुलांची पर्वा नसते, कसलीही पर्वा नसते, फक्त पैशांचीच पर्वा असते. अशांना लक्ष्मी हळूहळू मजूर बनवून टाकते आणि मग त्यांना तीर्यंच गतीत घेऊन जाते, कारण ते पापानुबंधी पुण्य आहे ना? पुण्यानुबंधी पुण्य असेल तर ठीक आहे. पुण्यानुबंधी पुण्य कोणाला म्हणतात? तर दिवसभरात ज्यांना फक्त अर्धा तासच मेहनत करावी लागते. ते फक्त अर्धा तासच मेहनत करतात आणि सर्व कामे हळूहळू सहजपणे होत राहतात. दानेश्वर आहेत म्हणून वाचले, नाही तर देवाच्या दारी हे देखील मजूर म्हटले गेले असते.

हे जग असे आहे की, यात उपभोगणारेही असतात आणि मेहनत करणारेही असतात. दोन्ही प्रकारचे लोक असतात. मेहनत करणारे असे समजतात की 'हे मी करत आहे.' त्यात त्यांचा अहंकार असतो. याउलट भोगणाऱ्यांच्यात तो अहंकार नसतो, पण त्यांना भोक्तापणाचा रस मिळतो. आणि त्या मेहनत करणाऱ्यांना अहंकाराचा गर्व रस मिळतो!

एक शेठ मला म्हणाले 'या माझ्या मुलांना काही तरी सांगा ना, त्यांना मेहनत करायची नाही, आरामात उपभोगत असतात.' मी म्हटले,

'काही सांगण्यासारखे नाही. ते त्यांच्या वाट्याचे पुण्य उपभोगत आहेत, त्यात आम्ही का हस्तक्षेप करावा?' त्यावर ते मला म्हणाले की 'त्यांना समंजस बनवायला नको का?' मी म्हटले की 'जगात जो उपभोगत आहे त्यालाच समंजस म्हणतात, आणि जे टाकून देतात त्यांना वेडे म्हणतात आणि जे मेहनत करतात त्यांना तर मजूर म्हणतात.' पण जे मेहनत करतात, त्यांना अहंकाराचा रस मिळतो ना! लांब कोट घालून बाहेर जातात तेव्हा लोक 'शेठजी आले, शेठजी आले' म्हणतात इतकेच. आणि भोगणाऱ्याला तर शेठ-बेठची काही पडलेली नसते. आम्ही तर आमच्या वाट्याचे भोगले तेवढे खरे, असे त्यांना वाटते.

## प्रिय वस्तू मोकळी सोडल्याने समाधी अवस्था

समाधी अवस्था केव्हा येते? तर जेव्हा संसारातील अत्यंत प्रिय वस्तू मोकळी सोडण्यात येईल तेव्हा. संसारातील अत्यंत प्रिय वस्तू कोणती? तर लक्ष्मी. मग तिला वाहू द्या. असे म्हटले तर म्हणतात, वाहू दिल्यावर आणखी जास्त यायला लागली. तेव्हा मी म्हटले, 'जास्त आली तर जास्त वाहू द्या.' प्रिय वस्तूला मोकळी सोडली तर समाधी वाटते.

## साठवलेले टिकून राहिले का कोणाचे?

लक्ष्मी तर स्वतःहून येण्यासाठी बद्ध आहे. आपण साठवून ठेवण्याने ती साठत नाही. आज साठवून ठेवली तर पंचवीस वर्षांनी मुलीच्या लग्नासाठी कामाला येईल, म्हटले तर त्याला काही अर्थ नाही, आणि असे कोणी मानत असेल तर त्यात काही तथ्य नाही. यात तर त्यादिवशी जी येईल तीच खरी, सर्व फ्रेश (ताजे) असले पाहिजे. या मुंग्या असतात ना, त्या सकाळी चार वाजता उठतात. आपण चहा घेत असताना एखादा साखरेचा कण खाली पडला तर उचलून घेऊन जातात. 'अरे, तुम्हा मुंग्यांना तर मुली नाहीत.' तरी देखील इथून उचलून जमा करत राहतात. बाकी काही करत नाहीत, अन्नाचे दाणे, साखरेचे दाणे, सगळे जमा करत राहतात. आणि मग भूक लागली की तिथे जाऊन थोडे खाऊन येतात, आणि परत बाहेर येऊन दिवसभर हाच त्यांचा उद्योग. आणि मग खूप जमा झाले की उंदीर भोक पाडून ते सर्व खाऊन टाकतो.

असे आहे हे जग. म्हणून संचय केलात तर कोणी तरी खाऊन टाकणारा भेटेलच. फ्रेश फ्रेश (ताजे ताजे) असतानाच त्याचा उपयोग करा. जसे भाजी साठवून ठेवली तर काय होईल? तसेच लक्ष्मीचा फ्रेश असताना उपयोग करा. लक्ष्मीचा दुरुपयोग करणे हा फार मोठा गुन्हा आहे.

## असे का बरे मानता?

**प्रश्नकर्ता :** लक्ष्मी नसेल तर साधनेही नसतील आणि साधनांसाठी लक्ष्मीची गरज आहे, म्हणून लक्ष्मीच्या ह्या साधनाशिवाय आम्हाला जे ज्ञान मिळवायचे आहे, ते कसे काय मिळेल? म्हणून लक्ष्मी हे ज्ञानाच्या शाळेत जाण्याचे पहिले साधन आहे, असे तुम्हाला वाटत नाही का?

**दादाश्री :** नाही, लक्ष्मी साधन मुळीच नाही, ज्ञानासाठी तर नाहीच नाही, पण इतर कोणत्याही प्रकारे लक्ष्मी साधन मुळीच नाही. या जगात जर अनावश्यक गोष्ट कोणती असेल तर ती लक्ष्मी आहे. आवश्यकता वाटते ती तर भ्रांती आणि गैरसमजूत आहे. आवश्यकता कसली आहे? सर्वात आधी हवेची आवश्यकता आहे. जर हवा नसेल तर तू म्हणशील की, नाही हवेची गरज आहे, कारण हवेशिवाय तर मृत्यू ओढवेल. लक्ष्मी नसल्यामुळे मृत्यू झाला असे पाहण्यात आलेले नाहीत. म्हणजे लक्ष्मी हे आवश्यक साधन आहे असे जे म्हणतात तो तर सारा मॅडनेस (वेडेपणा) आहे. कारण दोन मिल असलेल्यालाही लक्ष्मी हवी आहे, एक मिल असलेल्यालाही लक्ष्मी हवी आहे, मिलच्या सेक्रेटरीला देखील लक्ष्मी हवी आहे, मिलमधील मजुरांना देखील लक्ष्मी हवी आहे, तर मग यात सुखी कोण आहे? हे तर विधवा रडते, विवाहिता रडते आणि सात पती असलेलीही रडतेच, असे झाले. विधवा रडते ते आपण समजू शकतो की तिचा पती मृत झाला आहे, पण विवाहितेला विचारले की 'तू का रडतेस?' तर म्हणेल 'माझा नवरा नालायक आहे' आणि सात पती असलेली तर तोंडच उघडणार नाही! अशा या लक्ष्मीच्या बाबी आहेत. मग कशाला या लक्ष्मीच्या मागे लागला आहात? असे कसे काय अडकलात तुम्ही?

**प्रश्नकर्ता :** ही पुण्याची लक्ष्मी आमच्याकडे येणार आहे की नाही, यासाठी तरी काही सहज पुरुषार्थ असला पाहिजे ना?

**दादाश्री :** पुण्यामुळे येणाऱ्या लक्ष्मीसाठी कसला पुरुषार्थ? त्यासाठी तर सरळ आणि सहज पुरुषार्थ असतो. इथे तर जो सहज आणि सरळ आहे त्याला आपण समज नसल्यामुळे कठीण बनवितो.

**प्रश्नकर्ता :** जर आपल्याला वाटले की हे सहज आणि सरळ नाही, कठीण आहे तर मग ते सोडून द्यायचे? आपल्याला जर असे वाटत असेल की आपले पुण्य इतके अधिक नाही की लक्ष्मी सरळ मार्गाने येईल, तर मग काय आम्ही सहज राहिले पाहिजे?

**दादाश्री :** नाही, नाही. धीर धरल्याने सर्व काही आपोआप सरळच होत जाते. पण त्याला धीर धरवत नाही आणि धावाधाव करून सारे बिघडवून टाकतो.

**प्रश्नकर्ता :** धीर धरवत नाही ना, 'असे करू, तसे करू' असेच होत राहते!

**दादाश्री :** हो, असे करू, तसे करू, यामुळे सगळा गोंधळ होतो. ट्रेन पकडायची असेल तरी याला धीर नसतो, तेव्हा तो निवांत चहा पितो का? नाही, त्याला तर 'गाडी आता येईल, आता येईल', असेच वाटत राहते. त्याला म्हटले, 'भाऊ जरा इथे या, मला थोडे बोलायचे आहे.' तरी पण तो ऐकत नाही. तसेच हा अधीरपणे 'असे करू, तसे करू.' म्हणत असतो. आणि त्यामुळे मग त्याला क्लेश व थकवाच वाटतो.

**प्रश्नकर्ता :** असे आहे की, व्यापारात आपल्या डोक्यावर स्वाभाविकपणे काही तलवारी लटकत असतात, जसे की इन्कमटॅक्स भरायचा आहे, सेल्सटॅक्स भरायचा आहे, पगार वाढ करायची आहे वगैरे. आणि याच्या दबावाखाली तो मिथ्या प्रयत्न करत राहतो की असे करू, तसे करू! त्याला पेमेंट करायचे आहे, तर त्यासाठी मार्ग तर शोधावा लागेल ना!

**दादाश्री :** तरीही काही होत नाही, व्यर्थ प्रयत्न करणारा तेच करत राहतो.

**प्रश्नकर्ता :** तर मग जसे आपण म्हणता तसा धीर धरला तर काय आपोआप व्यवस्था होईल?

**दादाश्री :** धीर धरल्यानेच सर्व होते. शांतीने, धीरानेच सर्व येईल, ते घरबसल्याच बोलावतील. असे नाही की आपल्याला बाजारात शोधावे लागेल. नाही तर मेहनत करून थकलात बुद्धीचा वापर करून थकलात तरीही आज चार आणे देखील मिळणार नाहीत. आणि याला पकडून ठेवणारा तू एकटाच आहेस का? नाही, संपूर्ण जग लक्ष्मीच्या मागे लागले आहे!

## राजलक्ष्मी नव्हे, तर आत्मलक्ष्मीच असावी

हा सर्व डिस्चार्ज आहे, जे होऊन गेले आहे, त्याला आता तू काय करणार? ही जी तुला ऑर्डर मिळते ती पुण्यामुळे मिळते, आणि ऑर्डर मिळत नसेल तर तसे पापाचा उदय झाल्यामुळे होते. आता त्यात परत कावेबाजी करतात, जे मिळणारच आहे त्यात कावेबाजी करतात, ट्रिक (चलाखी) करतात. ट्रिक करतात की नाही? भगवंतांना काय ट्रिक येत होती? भगवंतांनी तर काय म्हटले, 'ही राजलक्ष्मी मला स्वप्नातही नको आहे.' कारण राज्यासारखी संपत्ती आणि इतर सर्व संपत्तीचे मालक बनले तर मोक्षाला कसे जाणार? म्हणून ती संपत्ती तर स्वप्नातही नको.

**प्रश्नकर्ता :** मोक्षाला का जाऊ देणार नाही?

**दादाश्री :** मोक्षाला कशी जाऊ देणार? हे चक्रवर्ती राजे सगळे चक्रवर्तीराज्य सोडून निघून जातात तेव्हा मोक्षाला जाऊ शकतात, नाही तर चित्त त्यातच गुंतलेले असते. त्या काळात तर अक्रम विज्ञान नव्हतेच ना? क्रमिक मार्ग होता. हे तर अक्रम विज्ञान आहे, म्हणून आरामात ज्ञान सेट करून झोपून जाता आणि सारी रात्र आत समाधी राहते.

**प्रश्नकर्ता :** आपण असे म्हटले होते की, चांगल्या खानदानामध्ये

जन्म झाला असेल तर सर्व काही सोबत घेऊनच आलेला असतो, त्यामुळे फार जास्त डोकेफोड करायची गरज राहत नाही, असे आहे ना?

**दादाश्री :** हो, सर्व काही घेऊनच आलेला असतो, पण ते व्यवहार चालविण्यापुरतेच, स्वत:चे सर्व ठीक चालेल इतकेच. करोडपती मात्र क्वचितच कोणी बनतो.

**प्रश्नकर्ता :** चक्रवर्ती राजेसुद्धा शेवटी मोक्षाला जाणेच जास्त महत्त्वाचे मानत असत ना? महत्त्वपूर्ण तर मोक्षच आहे. चक्रवर्ती होण्यातही सुख नाही ना?

**दादाश्री :** महत्त्वपूर्ण तर मोक्षच आहे, असे त्यांना वाटत नव्हते, पण चक्रवर्ती पद त्यांना इतके टोचत असे की आता कुठे पळून जाऊ? असे त्यांना वाटत असे, म्हणून मोक्ष आठवत असे! केवढा पुण्यशाली असेल तेव्हा तो चक्रवर्ती बनतो, पण भाव तर मोक्षाला जाण्याचाच असतो. तरी पण पुण्य तर भोगावेच लागेल ना?

**प्रश्नकर्ता :** इतक्या सगळ्या जन्मांमध्ये हे सर्व उपभोग घेतले, राजा बनले, तरी पण इच्छा शिल्लक राहतातच, त्याचे काय कारण असेल?

**दादाश्री :** उपभोगलेले कधी दिसते का? हे तर फक्त तसे दिसते एवढेच. जेव्हा समोर दिसत असतात तेव्हा भोगता येत नाहीत. आपल्याला पावागढ कधीपर्यंत चांगला वाटतो? तर आपण ठरविले की अमुक दिवशी पावागढला जायचे, तेव्हापासून पावागढचे खूप आकर्षण वाटते. पण एकदा पावागढला गेलो, आणि पाहिले की ते आकर्षण निघून जाते.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ आम्हाला अजून याची टेस्ट (स्वाद) चाखायला मिळाली नाही? ही लक्ष्मी भोगण्याची किंवा विषय भोगण्याची टेस्ट अजून पूर्ण झालेली नाही, म्हणून त्यांचे विचार येतात?

**दादाश्री :** असे आहे, मागील जन्म श्रीमंताचा मिळाला असेल, श्रीमंती म्हणजे, पत्नी, लक्ष्मी हे सर्व तयारच असते, तेव्हा मनाला उबग

येते आणि वाटते की यापेक्षा तर कमी उपाधी असली आणि साधे जीवन असले तर बरे! म्हणून मग विचार पण तसेच येतात आणि परत जेव्हा गरीबीत जन्म होतो, तेव्हा लक्ष्मी आणि विषय याची आठवण येत राहते, असा माल भरलेला असतो.

## कशा कशा अटकणी माणसांमध्ये

कोणाला विषयाची *अटकण* (जी बंधनरूप होते आणि पुढे जाऊ देत नाही) पडलेली असते, कोणाला मान मिळविण्याची *अटकण* पडलेली असते, अशा वेगवेगळ्या *अटकणी* पडलेल्या असतात. कोणाला 'कुठून पैसे कमावू, कुठून पैसे कमावू' अशी *अटकण* पडलेली असते. म्हणजे पैशांची अशी काही *अटकण* पडलेली असते की, सकाळी उठल्यापासून पैशांचेच ध्यान करीत राहतो! ही देखील एक मोठी *अटकण* आहे.

**प्रश्नकर्ता :** पण पैशांशिवाय तर चालतच नाही ना?

**दादाश्री :** चालत नाही, पण पैसे कोणत्या कारणामुळे येतात हे लोकांना समजत नाही आणि सतत पैशांच्या मागे धावत असतात. पैसा तर घामासारखा येतो. जसे कोणाला जास्त घाम येतो आणि कोणाला कमी घाम येतो, आणि जसे घाम आल्याशिवाय राहत नाही, तसेच हा पैसा देखील लोकांकडे येतोच!

मला तर सुरुवातीपासून पैशांची *अटकण* नव्हती. बावीस वर्षाचा असल्यासापून मी व्यापार करीत होतो. तरी देखील माझ्या घरी येणाऱ्यांना माझ्या व्यापाराबद्दल काहीच माहिती नव्हती. उलट मीच त्यांना विचारीत असे की आपण काही अडचणीत आहात का?

## कमी किंवा भरपूर नसणे हेच उत्तम

एकदा आमच्या गावी सत्संगासाठी बोलावले होते, तर तिथे आम्ही सत्संग करत होतो. गावातील एक भाऊ, चुलत भाऊ होते, ते वाकडे बोलत असत. ते म्हणाले की, 'तुम्ही खूप मोठी रक्कम दाबून बसला

आहात, त्यामुळे आता आरामात सत्संग होईलच ना!' मी ओळखले की हे चुलते असल्यामुळे असे बोलत आहेत, त्यांना सहन होत नव्हते ना! मग मी त्यांना म्हटले की 'मी काय दाबून बसलो आहे हे तुम्हाला कसे समजले? बँकेत किती आहेत हे तुम्हाला कसे समजले?' तर म्हणाले 'अरे, पैसे दाबून ठेवल्याशिवाय असा आरामात सत्संग होईलच कसा?' मी म्हटले, 'बँकेत जाऊन माहीत करून घ्या.'

मला कधीही काही कमी पडले नाही आणि फार जास्तही झाले नाही. लाख रुपये येण्याआधी काही न काही मोठे कारण येत असे आणि रुपये खर्च होऊन जात. त्यामुळे जास्ती तर कधी होतच नसे आणि कधी कमीही पडत नसे, पण काही दाबून ठेवले नाही. कारण आमच्याकडे चुकीच्या मार्गाने धन आले तर दाबून ठेवणार ना? असे चुकीचे धन येतच नाही तर दाबून काय ठेवणार? आणि असे आम्हाला नकोच आहे. आम्हाला तर कमी पडणार नाही आणि जास्तही होणार नाही हेच खूप झाले. भरपूर असेल तर त्याचा फार त्रास होतो, मग बँकेत ठेवा वगैरे सगळा त्रास. शिवाय मेहुणा येऊन म्हणेल 'तुमच्याजवळ तर खूप पैसे आहेत, तर दहा-वीस हजार मला द्या.' मग मामाचा मुलगा येईल, मग जावई म्हणेल 'मला लाखेक रुपये द्या.' भरपूर असेल तर असे म्हणतीलच ना? पण भरपूर नसलेच तर? पैसे जास्त झाले की लोकांमध्ये कलह होतो.

लोक मला येऊन सांगतात की 'पाहा ना, आमचे जावई आले आहेत, ते लाख रुपये मागत आहेत. जावई तर त्यासाठीच आले आहेत, सर्वांना देत राहिलो तर माझ्याकडे काय उरेल?' त्यांचे म्हणणेही बरोबर आहे, सर्वांना देत राहिले तर त्यांच्याजवळ काहीच उरणार नाही ना? म्हणजे लक्ष्मी जास्त झाली म्हणून घ्यायला आलेत ना! जावई त्यांच्याशी भांडतो, शिव्या देतो. मग शेवटी म्हणतील 'माझ्याकडे जास्त पैसे नाहीत. घ्या, हे वीस हजार घेऊन जा, आणि परत येऊ नका.' अरे, द्यायचे होते तर भांडण करून कशाला दिले, त्याऐवजी समजावून द्यायचे होते ना! नाही तर एकदा खोटे बोलून टाक की 'हे सगळे म्हणतात की

माझ्याकडे दहा लाख आले आहेत, पण मलाच माहीत आहे की किती आहेत, कसे-बसे दीड लाख आले आहेत.' असे काही तरी खोटे बोलून जावयाला समजाविले पाहिजे, म्हणजे मग वाद होणार नाही, भांडणही होणार नाही, पण त्यांना ते जमत नाही ना! आणि शिवाय तो जावई तर लाख घेण्यासाठी मागेच लागतो, वीस हजार घेत नाही. म्हणजे पैसे जास्त झाले की भावाबरोबर भांडतो, मेहुण्याशी भांडतो, जावयाशी भांडतो. पैसे जास्त झाले की त्याचे सर्वांशी भांडण होते आणि पैसे नसतात तेव्हा सर्वजण एकत्र बसून खातात, पितात आणि मजा करतात. असे आहे या पैशांची कामगिरी! म्हणजेच जास्त पैसे झाले तरीही उपाधीच आहे, पण कमी पडले नाहीत, म्हणजे खूप झाले.

या शरीरातही जेव्हा काही कमी पडते तेव्हा मनुष्य कमजोर होतो आणि जास्त झाले तर सूज येते. सूज आली की त्याला वाटते की मी आता जाडा झालो. अरे, ही तर सूज आली आहे! म्हणजे जास्तीचे नसणे हे उत्तम आहे, त्यासारखे कोणते पुण्यानुबंधी पुण्य नाही. जमा झाले की मोजण्याची कटकट होते ना! दहा हजार असतील तर एक-एक रुपया करत दहा हजार मोजायला गेले तर किती वेळ लागेल? आणि त्यात एक-दोन रुपयाची चूक झाली की पुन्हा मोजत बसतो! व्यवस्थित मोजल्यावरच झोपतो. एक व्यक्ती मला म्हणाली, 'तुम्ही काय करता?' मी त्याला म्हटले 'ही तर दहा हजाराची गोष्ट आहे, पण शंभाराचे सुटे दुकानातून घ्यायचे असतील तर दुकानदाराने शंभर मोजून दिले की मी खिशात ठेऊन देतो.' दुकानदार कधी म्हणाला की 'साहेब, मोजून घ्या' तर मी म्हणतो 'तुमच्यावर माझा पूर्ण विश्वास आहे.' जर कदाचित नव्याण्णव असतील तरी, एक रुपया तर मोजण्याच्या मेहनतीचाच जाईल, ते मोजण्यात तेवढा वेळ तर जाईलच ना! म्हणून भले एक रुपया कमी असेल पण कटकट तर नाही ना! म्हणून मी कधीच पैसे मोजत नाही. शंभराच्या शंभर नोटा असतील तर त्या मोजता मोजता दहा मिनिटे निघून जातील. मग जीभेला असा अंगठा लावत राहतात! असे करण्यापेक्षा तर दोन रुपये कमी असले तरी चालेल. आणि त्यातून जर एक-दोन रुपये कमी असतील ना, तर तो शंभर

रुपयांची रोजदारी देणाऱ्यांशी भांडेल की 'हे तुम्ही शंभर रुपये दिले पण हे पुरे नाहीत. यात दोन कमी आहेत.' मग तो म्हणेल, 'तुम्ही परत मोजा, उगाच कटकट करू नका, जास्त डोकेफोड करू नका, नाही तर द्या माझे पैसे परत.' पण तो परत देत नाही आणि पुन्हा मोजायला सुरुवात करतो! अरे, घेताना कलह, कोणाला दिले तरी कलह, स्मशानात जातानाही कलह! जन्म झाल्यापासून कलह, कलह आणि कलह! येताना 'ऊँवा, ऊँवा' करतो आणि जाताना 'डॉक्टर मला वाचवा, वाचवा' असे करतो. तू कलहाशिवाय कधी राहिला आहेस का? तुझा एक दिवसही आनंदात गेला नाही! तरी पण स्वत: परमात्मा आहे. त्याने जरी कलह केला तरी पण आपल्याला तर दर्शन घ्यावेच लागेल ना! असे हे जग आहे. म्हणून कमी पडणार नाही आणि जास्तही होणार नाही, तेच सर्वात उत्तम.

एक ताई म्हणत होती की, 'या वर्षी इतका जास्त पाऊस पडत आहे, तर पुढल्या वर्षी काय होईल? मग कमी पडेल!' लोक पैसे कमी पडतात त्यावेळी आशा करतात की या वर्षी दोन-तीन लाख आले तर बरे होईल. अहो! या नंतर येणाऱ्या काळात तर दुष्काळ पडेल! म्हणून आशा करू नका. लक्ष्मीचा पाऊस एकदमच पडला, आता तर पाच वर्षे दुष्काळ पडेल. त्याऐवजी लक्ष्मी हप्त्या-हप्त्याने येत आहे ना, तर हप्त्या-हप्त्याने येऊ देणेच ठीक आहे, नाही तर सर्व धन एकदम आले तर खर्च होऊन जाईल. म्हणून हे जे हप्ते ठेवले आहेत तेच बरोबर आहेत. आपल्याला तर समोरच्याला संतोष होईल असे करायचे आहे. 'व्यवस्थित शक्ती' जितकी लक्ष्मी पाठवेल तेवढी स्वीकारावी. कमी आली आणि दिवाळीत दोन-तीनशे कमी पडले तर पुढच्या दिवाळीत जास्त पाऊस पडेल, म्हणून त्याची काळजी करू नका.

## नोटा राहिल्या, मोजणारे गेले!

या लौकिक सुखाऐवजी अलौकिक सुख असायला हवे की ज्यामुळे आपल्याला तृप्ती होईल. ही लौकिक सुखे तर उलट *अजंपा* वाढवतात. ज्या दिवशी पन्नास हजाराची कमाई होते, तेव्हा मोजता

मोजताच डोके फिरायची पाळी येते. डोके इतके सैरभैर होऊन जाते की खाणे-पिणेही आवडत नाही. कारण माझ्याकडेही पैसे येत असत, म्हणून मी हे सर्व पाहिले आहे की डोके कसे फिरून जाते त्यावेळी! यापैकी काहीही माझ्या अनुभवाच्या बाहेर नाही ना? मी तर या समुद्रातून पोहून बाहेर आलेलो आहे, म्हणून मला कल्पना आहे की तुम्हाला काय होत असेल? जास्त पैसे आले की जास्त व्याकूळता होते, डोके डल होते, काहीच आठवत नाही, बेचैनीच बेचैनी राहते. हे लोक नोटा मोजत राहतात, पण त्या नोटा सगळ्या इथल्या इथेच राहिल्या आणि मोजणारे मात्र निघून गेले! नोटा म्हणतात 'तुला समजून घ्यायचे तर घे, आम्ही इथेच राहू आणि तू निघून जाशील!' म्हणूनच आपण जरा सावध राहिले पाहिजे ना! दुसरे काही नाही, पण आपण पैशांशी वैर बांधायचे नाही. पैशांना आपण म्हणावे 'या बाबा' कारण त्यांची गरज आहे. सगळ्यांचीच गरज तर आहे ना? पण लोक त्यातच तन्मयाकार राहतात! म्हणून तर मोजणारे गेले आणि पैसे राहिले. तरी देखील मोजावे तर लागतेच. गत्यंतरच नाही ना! एखादाच असा कोणी शेठ असेल जो मुनीमला सांगेल, 'बाबा, मला जेवताना त्रास देऊ नका, तुम्ही सावकाश पैसे मोजून तिजोरीत ठेवा आणि तिजोरीतून काढून घ्या.' म्हणजे त्यात लक्ष घालणार नाही असा क्वचितच कोणी शेठ असेल. हिंदुस्तानात असे दोन-पाच शेठ असतील, जे निर्लेप राहतात! ते माझ्यासारखे! मी कधीही पैसे मोजत नाही! पैसे मोजण्याची ही काय कटकट आहे! या लक्ष्मीला आज वीस वीस वर्षे मी हात लावलेला नाही, म्हणूनच इतका आनंद असतो ना?

जोपर्यंत व्यवहार आहे तोपर्यंत लक्ष्मीची गरज आहे, त्याला काही मनाई नाही, पण त्यात तन्मयाकार होता कामा नये. तन्मयाकार तर नारायणातच व्हा. फक्त लक्ष्मीच्या मागे लागलात तर नारायण चिडतील. लक्ष्मीनारायणाचे तर मंदिर आहे ना! लक्ष्मी काय अशी-तशी वस्तू आहे?

तुम्हाला ही गोष्ट आवडली का?



[ 3 ]

# गुंतागुंतीतही शांती

## गुंतागुंतीत जीवन, किती कठीण?

काही तरी विचारा ना! कधीपर्यंत या गुंतागुंतीत अडकून राहाल?

**प्रश्नकर्ता :** आता तरी काही गुंतागुंत शिल्लक नाही.

**दादाश्री :** तसे तर तुम्हाला वाटते. नाही तर जेवणाच्या वेळी टेबलावर मतभेद झाले की कटकट होतेच. प्रत्येक गोष्टीत गुंतागुंतच आहे, शब्दा-शब्दात गुंतागुंत आहे. गुंतागुंत वाटत नाही म्हणजे तेवढा बेभानपणा आहे. नाही तर एक क्षणही सहन होणार नाही असा हा संसार आहे. आम्हाला तर हा संसार एक क्षणासाठीही सहन होत नव्हता. रात्री झोपच लागायची नाही, इतके अपार दु:ख होत असे!

जवळपासच्या सर्वांना विचारले की, 'हे सुखी आहेत की दु:खी?' तर सर्व म्हणतील की 'हे तर खूप सुखी आहेत.' पण मला स्वत:ला खूप दु:ख वाटत असे, कारण मी अज्ञानतेत होतो. तसे प्रत्येक बाबतीत भान आले होते, पण अज्ञानता होती. म्हणजे अशी दोन्ही प्रकारची दशा, मग काय होणार? उजेडात एखाद्याला दिसले की घरात साप घुसला आहे, तर त्याची काय दशा होईल? ज्याने पाहिले नाही तो झोपेल पण ज्याने पाहिले आहे तो? त्याला तर झोप येणारच नाही. म्हणजे लोक या संसारात कसे जगत आहेत तेच आश्चर्य आहे!

घरी गेले की बायको दटावते, व्यापारात पार्टनर दटावतात,

इन्कमटॅक्स ऑफिसर दटावतात, नोकरीत साहेब दटावतात. जिकडे तिकडे सर्व झिडकारतात तरी लाज वाटत नाही की 'जळो, सर्वच झिडकारतात तर मग मी कशासाठी जगतो आहे? पण आता जाणार तरी कुठे? मग उद्धट होऊन जातो.

## ज्ञानी सोडवतात गुंतागुंत

इथे तुम्ही सर्व प्रकारचे प्रश्न विचारू शकता. तुम्हाला गुंता निर्माण होत नाही का? होतो ना? तर मग इथे तुम्ही ते सर्व खुलासे विचारू शकता. जेणेकरून मग कसलाही गुंता निर्माण होणारच नाही. असे आयुष्य झाले तर किती चांगले! अजिबात गुंता नसलेले आयुष्य तर किती चांगले म्हणावे!

**प्रश्नकर्ता :** गुंता तर प्रत्येकाच्या आयुष्यात असतोच ना?

**दादाश्री :** नाही, नाही. आमच्या इथे दहा हजार लोकांच्या आयुष्यात गुंता निर्माण होत नाही. आम्हाला गेल्या बावीस वर्षांपासून एकही गुंता निर्माण झालेला नाही.

**प्रश्नकर्ता :** माणसाच्या आयुष्यात काही ना काही तरी गुंता निर्माण होतच असतो ना?

**दादाश्री :** नाही, गुंता होत असेल तर त्याला मनुष्य म्हणताच कसे येईल? गुंता असलेल्या मनुष्याला मनुष्य म्हणायचेच कसे?

**प्रश्नकर्ता :** गुंतागुंतीतही मन स्वस्थ राखून सुखी राहणे, हे शक्य आहे, परंतु गुंता तर निर्माण होतोच ना?

**दादाश्री :** गुंता होत नसेल तर त्याला मनुष्य म्हणता येईल. हिंदुस्तानातील मनुष्य आहे तरी अजून गुंतागुतीतच जगत आहे?

**प्रश्नकर्ता :** गुंतागुत होते पण त्यातून आम्हाला मार्ग मिळतो.

**दादाश्री :** असे आहे, हे वर्ल्ड इटसेल्फच पझल आहे (हे जग स्वत:च एक कोडे आहे). ज्यांना हे पझल सॉल्व होत नाही ते या

पझलमध्येच डिसॉल्व झालेले आहेत. आम्ही या पझलला सॉल्व करतो मग तो डिसॉल्व होत नाही. हे पझल सॉल्व करण्याची तुमची इच्छा आहे का?

पूर्वी कधी वाचले नसेल, जाणले नसेल, असे हे अपूर्व विज्ञान आहे. म्हणून एका तासात सर्व पझल सोडवून देते, मग पुन्हा कधी पझल उभेच राहत नाही, तासाभरात असा इलाज करून टाकते की मग भय वाटत नाही आणि संसार चालू राहतो.

## गुंता कोण सोडवेल?

कधीपर्यंत या गुंतागुंतीत अडकून राहायचे? जिथे पाहाल तिथे गुंतेच निर्माण होत असतात की नाही?

**प्रश्नकर्ता :** दहा वर्षांपासून यावरचा इलाजच शोधतो आहे, तो शोधत, शोधतच दादांच्याजवळ आलो आहे.

**दादाश्री :** इथे आला आहात तर तुम्हाला काही उपाय सापडेल आणि ही सर्व गुंतागुंत निघून जाईल. जगाला गुंतागुंती आवडत नाहीत. त्यात आपण ज्याच्याकडे जाऊ ते उलट गुंता आणखीनच वाढवतात. पण त्यात त्यांचा दोष नाही. आपल्याला वाटते की इथे आपला गुंता सुटेल पण उलट तिथेच गुंता अधिक वाढतो. म्हणजे जर गुंता सुटला तर आपल्याला शांती मिळेल. नाही तर शांती कशी मिळेल? पैशांमुळे काही शांती मिळत नाही. पत्नीमुळे जर शांती मिळत असती तर चक्रवर्तींकडे तेराशे-तेराशे राण्या होत्या, पण शेवटी तर त्यांनाही उबग आला आणि त्यांनी ज्ञानींकडे धाव घेतली. म्हणजेच लक्ष्मीपासून किंवा पत्नीपासून शांती मिळत नाही. असे असूनही हे जग असत्यही नाही. जग हे रिलेटिव्ह सत्य आहे आणि आत्मा रियल सत्य आहे. जर रिअलमध्ये आलो तर गुंता सुटेल, अन्यथा गुंता सुटणार नाही, गुंता उभाच राहील. आणि त्या गुंतागुंतीत काहीही भले होऊ शकत नाही. गुंत्यांमुळे उपभोगही घेता येत नाही ना? कसे घेणार? कारण डोक्यावर तलवार लटकत असते.

**प्रश्नकर्ता :** भीती वाटत राहते.

**दादाश्री :** हे जग भयग्रस्त अवस्थेतच सर्व उपभोगत आहे, त्यापेक्षा उपभोग न घेतलेले बरे.

## यात परवशता वाटत नाही का?

इतर सर्व योनींमधील जीव परवश आहेत, आणि हा मनुष्य जन्म परवश आणि स्ववश दोन्ही आहे. जोपर्यंत या मनुष्यांमध्ये अज्ञानता असते तोपर्यंत परवशता आणि ज्ञान झाल्यावर स्ववश, म्हणजे स्वत:च्या आधीन, स्वत:ला वश असतो. इतर सर्व योनींमध्ये परवशताच असते. परवशता म्हणजे, तुम्हाला संयोगांच्या आधीन राहायला लागते का कधी? हे सर्व लोक संयोगांच्या आधीनच आहेत. जेवणाचे ताट मिळते तेही संयोगांच्या आधीन आणि अंघोळीला पाणी मिळते तेही संयोगांच्या आधीन, हे सर्व व्यवहार संयोगांच्या आधीनच आहेत.

आतापर्यंत गुंतागुंतीतच होतात, निव्वळ गुंतागुंत! आणि मग दळलेलेच परत परत दळले तर काय होईल? इथे तर तीच ती खोली, तीच खाट, तोच पलंग आणि तीच ती उशी. मग लाज नाही का वाटत? मला तर फार कंटाळवाणे वाटत असे, तीच खोली, आणि तोच पलंग पाहून! रोज रोज नवे नको का? रोज रोज नवीन मिळत नसेल तर आपण 'आपल्या घरी' गेलेलेच बरे. आपल्या घरी सर्व प्रकारचे वैभव आहे. 'आपले घर' म्हणजे काय ते समजले का तुम्हाला? जर इथे संसार दशेत रोज नवे नवे मिळत नसेल, व्हरायटी मिळत नसेल तर 'आपल्या घरी' का जाऊ नये? मला तर रोज तीच उशी आणि तोच तो पलंग, पाहून कंटाळा येत असे. तेच ताट आणि तोच पाट आणि सर्व तेच तेच, ते दिवस खिचडी आणि एक दिवस भात! अरे, इतक्या वेगवेगळ्या प्रकारचे जेवण असते पण इथे तर रोज तेच तेच. आणि 'आपल्या घरी' तर अपार सुख आहे आणि अपार सामग्री आहे. ते सर्व सामान तिथेच ठेऊन इथे आलो तर इथली रोज तीच तीच खोली कशी आवडेल? शिवाय संडासाला सुद्धा दुर्गंध येत असतो. रोज वेगवेगळे मिळत असेल आणि आनंद वाटत असेल तर आम्ही मानू की मोक्षाला

जायची काय गरज आहे? पण इथे तर सात महाल असतील आणि वेगवेगळ्या प्रकारच्या खोल्या आणि तऱ्हेतऱ्हेचे पलंग असतील तरी देखील शेवटी आत चैन पडत नाही, तर कसे चालेल? मग जेव्हा तिरडी निघते तेव्हा हे सर्व फ्रॅक्चर होऊन जाईल. हे लोक तिरडी काढल्याशिवाय राहतच नाहीत ना!

म्हणून जर अनेक व्हरायटीज मिळत नसतील तर आपण आपल्या घरी गेलेलेच बरे. आपल्या घरी तर अपार सुख आहे! पण ज्ञानी भेटले तर ते आपल्याला आपल्या घरी घेऊन जातील, अन्यथा घरापर्यंत कोणी पोहोचलाच नाही. ज्ञानी पुरुष स्वत: पोहोचले आहेत. म्हणून ते आपल्याला घेऊन जाऊ शकतात.

पाहा ना, तुमच्यासाठी रविवार आनंदाचा दिवस आहे की दु:खाचा?

**प्रश्नकर्ता :** काम करावे लागले तर दु:खाचा दिवस वाटतो.

**दादाश्री :** नाही, पण रविवारचा दिवस दु:खाचा दिवस आहे की आनंदाचा?

**प्रश्नकर्ता :** तसा तर आनंदाचा दिवस आहे, कारण बाहेर हिंडायला-फिरायला मिळते, त्यामुळे आनंद होतो.

**दादाश्री :** म्हणजे तुम्हाला मुक्त जीवन हवे आहे? मुक्त जीवन म्हणजे जिथे आपल्याला आवडेल, जिथे अनुकूल वाटेल तिथे जाता-येता येईल, असे आवडते ना? आता काही मुलांचे मुक्त जीवन असते. आपण विचारले 'काय रे बाबा?' तर म्हणेल 'बिलकुल बेकार आहे.' तर त्याला मुक्त जीवन म्हणताच येणार नाही ना! पण सहा दिवस मेहनत करून पैसे कमावून एक दिवस मुक्त जीवन ठेवले, तर मात्र मजा येईल! म्हणजेच मुक्ती आवडते, परवशता आवडत नाही. जगात ही सर्व परवशता आहे असे तुम्हाला वाटत नाही का?

**प्रश्नकर्ता :** परवशता तर निभावून घ्यावी लागते ना?

**दादाश्री :** मग कधीपर्यंत निभावून घेत राहणार? पत्नीबरोबर

निभावून घेणे, त्यात तर समजा दोघांमधील एकाचा मृत्यू झाला तर सुटता येते. पण ही परवशता कधीपर्यंत चालवून घ्याल? तुम्ही तुमच्या दवाखान्यात रोज जाता ते राजीखुशीने जाता की परवशतेमुळे जाता?

**प्रश्नकर्ता :** राजीखुशीने.

**दादाश्री :** कधी परवशपणे जावे लागते का? कोणाचे लग्न असेल तर तिथे नाइलाजाने जावे लागते का? तिथे लग्नात तुम्ही म्हणता की 'माझे सर्व पेशंट तिथे बसलेले आहेत, माझी वाट पाहत आहेत? मला तिथे जावेच लागेल!' असा तुमचा नाइलाज होतो का?

**प्रश्नकर्ता :** असे सुरुवातीला होत असे, पण आता होत नाही.

**दादाश्री :** म्हणजे ही सर्व परवशता आहे. संपूर्ण जग परवशपणेच काम करीत आहे. कोणीच स्ववशपणे काम करू शकत नाही. सगळे परवशतेनेच काम करीत आहेत, कारण डिस्चार्ज आहे. मग ते राजीखुशीने करा किंवा नाइलाजाने करा, पण केल्याशिवाय गत्यंतरच नाही, आणि ते सर्व अनिवार्य आहे. तुम्हाला थोडेफार तरी अनिवार्यपणे करावे लागत आहे का?

**प्रश्नकर्ता :** ड्यूटी तर करावीच लागणार ना?

**दादाश्री :** हो, म्हणजे अनिवार्य आहे ना? गुंतागुंत नसेल तर समजून जा की आपण सुटलो आहोत. मग कोणी शिव्या दिल्या तरी देखील गोंधळ निर्माण होणार नाही, किंवा हा खिसा कापला गेला तरी गोंधळ निर्माण होणार नाही, कुणी मारले तरी गोंधळ निर्माण होणार नाही, आपल्याला इजा होणार नाही आणि अन्इफेक्टिव राहता येईल (त्याचा परिणाम होणार नाही). हा तर निव्वळ इफेक्ट, इफेक्ट आणि इफेक्टच आहे. रात्री साडे दहा वाजता म्हटले की, 'काका आता झोपा.' आणि काका चादर ओढून झोपले आणि मग त्यांना विचार आला की अरे, आज तर वहीखात्यात खतावणी करायची राहूनच गेली, आणि मुदत तर आता संपली आहे, मग रात्री किती वेळ जागा राहील?

**प्रश्नकर्ता :** रात्रभर.

**दादाश्री :** पण मग काय होणार? ही सारी परवशता आहे, अगतिकता आहे! पोलिस खडसावतो तेव्हा त्याला अगतिकता जाणवते, किंवा लुटाऱ्यांच्या तावडीत सापडतो, गाडी थांबवून लुटारू आत घुसतात तेव्हा अगतिकपणा वाटतो, असे घडते की नाही? तर हा परवशपणा कधीपर्यंत सहन होईल?

## जगातील ही गुंतागुंत कधी संपेल?

या जगात कोणाचेही म्हणणे चुकीचे नसते, पण आपापले व्ह्यू पॉइंट (दृष्टिकोन) असतात. आम्हाला कोणाची चूक दिसतच नाही पण जेव्हा गुंतागुंत संपते तेव्हा समजावे की आता हे करेक्ट (बरोबर) आहे. पण तोपर्यंत कोणालाही करेक्ट म्हणत नाही. गुंतागुंत कायमची सुटते तेव्हा करेक्ट म्हणतो, नाहीतर तोपर्यंत करेक्ट म्हणता येणार नाही. तरी देखील कोणाचेच चुकीचे नसते, कारण तो त्याचा व्ह्यू पॉइंट आहे, आणि जेव्हा तीनशे साठ व्ह्यू पॉइंटस् पुरे होतील तेव्हा गुंता सुटतो, अन्यथा गुंता सुटतच नाही. तप करा, जप करा, ध्यान करा, योग करा, पण हे 'करा, करा' म्हणणारे लोक तर गोंधळवून टाकतात.

**प्रश्नकर्ता :** ह्या गुंतागुंतीतून कसे बाहेर पडता येईल?

**दादाश्री :** इथे आलात तर तुमची गुंतागुंत सोडवून देऊ. दोन-तीन दिवसांसाठी आलात तर गुंतागुंतीतून बाहेर काढू शकतो. हे डॉक्टरसुद्धा ऑपरेशन करण्याआधी थोडा वेळ घेतात, आधी दोन दिवस जुलाबाचे काही औषध देतात. पोट साफ झाल्यावर ऑपरेशन करतात, तसेच आमच्या इथेही साफ केल्यानंतर ऑपरेशन होईल, मग गुंतागुत सुटेल. मग आम्ही सांगितल्याप्रमाणे वागलात तर परत गुंता होणार नाही. तसे तर जग गुंतागुंतीनेच भरलेले आहे. मग भले कितीही शास्त्रांचा अभ्यास करा, काहीही करा, तरी गुंते सुटत नाहीत.

गुंतागुंतीचा अंत केव्हा येतो? रिलेटिव्ह आणि रिअल या दोनच गोष्टी या जगात आहेत. ऑल दीज रिलेटिव्हज् आर टेम्पररी

ॲडजस्टमेंटस् आणि रिअल इज दि पर्मनन्ट. (या सर्व रिलेटिव्हस् तात्पुरत्या तडजोडी आहेत आणि रिअल शाश्वत आहे.) आता पर्मनन्टचा भाग किती आणि टेम्पररीचा भाग किती, यात लाइन ऑफ डिमार्केशन (भेदरेखा) टाकली की मग गुंता होणार नाही, अन्यथा बंद होणार नाही. सर्व चोवीस तीर्थंकरांनी ती लाइन ऑफ डिमार्केशन टाकली होती. कुन्दकुन्दाचार्यांनी ही लाइन ऑफ डिमार्केशन टाकली होती. आता आपल्याकडे ही डिमार्केशन लाइन टाकून देतात आणि त्यामुळे लगेच त्याचे सर्व ठीक होते. रिलेटिव्ह आणि रिअल या दोन्हींच्या गुंतागुंतीमध्ये लाइन ऑफ डिमार्केशन टाकून देतो की हा भाग तुझा आणि हा परक्याचा. आता परक्याच्या भागाला 'माझा' भाग मानू नकोस, असे त्याला समजावले की त्याचे निराकरण होते. इथे तर परक्याचा माल घेऊन बसला आहे म्हणूनच वाद-विवाद होतात, भांडणे होतच राहतात. गुंतागुंत म्हटल्यावर भांडणे होतच राहतील आणि स्वतःची एकही चूक दिसत नाही. तसे तर पूर्णपणे चुकांनी भरलेलाच आहे, तरी पण स्वतःची चूक का दिसत नाही? कारण स्वतःच वकील, स्वतःच जज आणि स्वतःच आरोपी, मग स्वतः गुन्हेगार ठरणारच नाही ना? आणि दुसऱ्यांचे सर्व गुन्हे उघड करील. परंतु रिलेटिव्ह आणि रिअलचे ज्ञान झाल्यानंतर मात्र स्वतःच्याच चुका दिसतील. पाहाल तिथे स्वतःच्याच चुका दिसतील आणि खरे तर स्वतःच्याच चुका आहेत. स्वतःच्या चुकांमुळे हे जग उभे राहिले आहे, इतर कुणाच्या चुकीमुळे हे जग उभे राहिले नाही. जेव्हा स्वतःच्या चुका निघून जातील तेव्हा तो सरळ सिद्ध गतीतच जाईल!

## ...मग परतंत्रता येतच नाही!

**प्रश्नकर्ता :** एकदा गुंतागुंतीतून बाहेर पडलेले लोक परत गुंतागुंतीत अडकू शकतात का?

**दादाश्री :** नाही अडकत. तरी जर त्याची स्वतःची तशी इच्छा असेल आणि अडकायचे असेल, तर अडकेल. स्वतःची इच्छा असली तरी ती एका मर्यादेपर्यंतच. नंतर तो स्वतःच त्या मार्गाला वळतो,

स्वतंत्रतेत जातो. त्यानंतर मात्र परतंत्र व्हायचे असले तरी पण होऊ शकणार नाही. अशी स्थिती उत्पन्न होते.

## अन्यथा, गुंतागुंतीत अडकलेले जीवन!

मनुष्य जन्मातील एका मिनिटाचेही मूल्य करता येणार नाही इतके जास्त आहे. ही हिंदुस्तानातील माणसांची गोष्ट आहे. आम्ही या हिंदुस्तानातील लोकांना इतर लोकांपासून वेगळे मानतो याचे कारण या लोकांच्या बिलीफमध्ये (मान्यतेमध्ये) पुनर्जन्म आलेला आहे. हिंदुस्तानाबाहेरील लोकांच्या बिलीफमध्ये पुनर्जन्म आलेला नाही. म्हणून हिंदुस्तानातील माणसांच्या एका मिनिटाला देखील खूप मूल्य आहे. पण ते तर असेच व्यतीत होऊन जाते, संपूर्ण दिवस भानाशिवायच, बेभान अवस्थेतच व्यतीत होतो. तुमचा एकादा क्षण वाया गेला होता का?

**प्रश्नकर्ता :** खूप सारे वाया गेले आहेत.

**दादाश्री :** असे? मग किती क्षण उपयोगी पडले? कशात उपयोगी पडले?

गुंतागुंतीत माणूस दिवसभर गोंधळत राहतो. साधू-संन्यासी सगळेच गोंधळत राहतात. मोठा राजा असेल किंवा वकील असेल तरी तो गोंधळतो. ज्याच्याकडे मालमत्ता कमी असेल तो कमी गोंधळतो आणि जास्त मालमत्ता असेल तो जास्त गोंधळतो. अर्थात हा संसार म्हणजे गुंतागुंतच आहे. मग या गुंतागुंतीतून बाहेर कसे पडायचे? या बाबतीत तुम्ही प्रश्न विचारून उत्तर मिळविले पाहिजे आणि यातून बाहेर पडण्याचे उपाय शोधले पाहिजेत. जे कोणी या गुंतागुंतीतून बाहेर पडले आहेत ते आपल्याला यातून बाहेर काढतील, पण कोणीही या गुंतागुंतीतून बाहेर निघालेलाच नाही. उलट तेच तर आपल्याला गुंतागुंतीत टाकतात ना! तुम्हाला कधी गुंतागुंतीतून बाहेर पडण्याची इच्छा होते का? पैशांचा बिछाना बनवूनही झोप येत नाही आणि त्यापासून काही सुख मिळत नाही. कितीही पैसे असले तरी पण दुःखच! शिवाय ते पैसे ठेवायला जावे लागते, मग ते सांभाळण्याचे दुःख आणि खर्च होते वेळीही दुःख, खर्च करतानाही दुःख होते, कमावताना देखील दुःख होते! म्हणजे इथे

दु:ख आणि दु:खच आहे. जन्म घेतला तेव्हा एका बाजूचे नातेवाईक होते, आई-वडील आणि जेव्हा लग्न केले तेव्हा सासु-सासरे, आजे सासू, मावस सासू हे सर्व आले. ही गुंतागुंत काय कमी होती, की आणखी वाढवली?

## जगाचे स्वरूपच गुंतागुंतीचे

म्हणजे ही गुंतागुंत आहे, तर त्याबद्दल काही प्रश्न विचारून यातून बाहेर पडण्याचा मार्ग शोधून काढला पाहिजे. असे काही विचारा की तुमच्या मनातील सर्व गुंते सुटतील. नाही तर हे जग तर निव्वळ गुंतागुंतीनेच भरलेले आहे. त्याला आम्ही काय म्हटले आहे? तर 'द वर्ल्ड इज द पझल इटसेल्फ.' (जग स्वत:च एक कोडे आहे.) हे इट सेल्फ पझल झाले आहे. गॉड हॅस नॉट पझल्ड धिस वर्ल्ड ॲट ऑल. देवाने जर हे पझल निर्माण केले असते ना, तर या लोकांनी त्याला पकडून आणले असते आणि विचारले असते की उगाचच का लोकांना त्रास देतोस? आणि म्हटले असते की ही काय तुझ्या बापाची मिळकत आहे? लोकांचे वाईट का करतोस? पण ही कोणाच्या बापाची मिळकत नाही. ही तर प्रत्येकाची स्वत:चीच मिळकत आहे, आणि ज्यांना *'पोतापणा'* (मी आहे आणि माझे आहे असे आरोपण, माझेपणा) वाटतो त्या सगळ्यांची मिळकत आहे, पण या मिळकतीचा उपभोग घेता येत नाही.

## मग संसाराच्या सार-रूपात काय मिळाले?

संसाराचे सार काढले आहे का? व्यापाराचे सार (ताळेबंद, बॅलन्स शीट) तर दरवर्षी काढता, पण संसाराचे सार काढले आहे की 'कुठल्या खात्यात फायदा आहे आणि कुठल्यात तोटा?' असे तुम्ही काढले नाही का? असे आहे की सर्व प्रथम हे सार काढले पाहिजे की बाबा रे, सारखी सारखी या संसाराची आराधना करत आहोत, तर ते बरोबर आहे की चुकीचे आहे? यात फायदा आहे की नुकसान? असे सार काढायला नको का? मी तर अनंत जन्मांपासून या संसाराचे सार काढत आलो होतो!

कृपाळूदेवांना कुणीतरी विचारले की साहेब तुम्हाला संसाराचा वीट आला आहे का? तेव्हा ते काय म्हणाले? की 'संसाराचा वीट तर... फार काळापासून आला आहे.' ते कशासाठी संसाराला विटले असतील? कारण त्यांनी सार काढून पाहिले होते. पण तुम्ही तसे सार काढले नाही. म्हणून तर जास्त वीट येत नाही ना! मग आता सार काढून घ्या. कुठवर असे अंधाराचे राज्य चालवाल? आणि हे काही अंधाराचे राज्य नाही, हे तर वीतरागींचे मत आहे! आज भगवंताचे दर्शन करून आलात तर काय ते तुमच्या घरी येऊन मदत करतील! ते तर म्हणतात 'तुझा हिशोब तुझ्याबरोबर. जितका वेळ माझी आठवण ठेवशील तितका वेळ तर तुला शांती लाभेल, याची गॅरेंटी मी देतो, पण मला विसरलास तर मार खाशील.'



# [ 4 ]
# कंटाळा दूर करा

## कंटाळारहित जीवन शक्य आहे का?

**दादाश्री :** कधी तरी कंटाळा येतो का?

**प्रश्नकर्ता :** कंटाळा (वीट) तर येतोच ना! जी गोष्ट अप्रिय असते, त्याचा कंटाळा येतो.

**दादाश्री :** त्याने तर नावड उत्पन्न होते. या जगात कोणतीही गोष्ट प्रिय करण्यासारखी नाही तसेच अप्रिय करण्यासारखीही नाही. आपल्या चुकांमुळे ती प्रिय-अप्रिय वाटत असते. तुमचा मुलगा आता तुम्हाला प्रिय वाटतो. लहानपणापासून आतापर्यंत तो तुम्हाला प्रियच वाटत आहे पण एखाद्या दिवशी तो तुमच्याशी उद्धटपणे बोलला तर? अप्रिय वाटेल ना? तर इथे तो बदललेला नाही, तुम्ही बदलले आहात. तो उद्धटपणे बोलतो, त्यात तो बदललेला नाही, ती तर त्याची प्रकृती आहे, तुम्हीच बदललेले आहात. जो आधी तुम्हाला प्रिय वाटत होता तो आता अप्रिय का वाटतो? तुमचीच काही तरी चूक आहे! तुमच्या इगोइझमवर घाव पडतो. तुम्हाला समजले ना? स्वत:ची पत्नी देखील अप्रिय वाटू लागते, सगळेच अप्रिय वाटू लागते. शेवटी स्वत:चा प्रिय-अतिप्रिय देह, तो देखील अप्रिय वाटू लागतो.

**प्रश्नकर्ता :** अप्रिय वाटणे, ही आमची चूक आहे का?

**दादाश्री :** हो. कारण ते प्रिय वाटत असते म्हणूनच अप्रिय होत असते. प्रिय-अप्रिय हे द्वंद असताच कामा नये. सर्व काही नॉर्मल ठेवणे चांगले. नाहीतर कोणी मान दिला की तो प्रिय वाटतो आणि अपमान केला की तो अप्रिय वाटू लागतो. अप्रिय वाटला की द्वेष निर्माण होतो. द्वेष निर्माण झाला की कर्म बांधले जाते. कर्म बांधले गेले की पुढला जन्म घ्यावा लागतो. म्हणजे अशा या सर्व कठीण गोष्टी आहेत.

**प्रश्नकर्ता :** प्रिय-अप्रिय, आवड-नावड हे सर्व कशाच्या आधारावर उभे आहे?

**दादाश्री :** हे सर्व अज्ञानानामुळे उभे आहे. या सर्वांचा मूळ आधार अज्ञान आहे आणि अज्ञान देखील कशावर तरी आधारित आहे. अज्ञानाला आधार देणारा कोणी हवा की नको?

**प्रश्नकर्ता :** अज्ञानाला आधार देणारा कोण आहे?

**दादाश्री :** तो स्वतःच, तोच अहंकार आहे. अहंकारामुळेच स्वतः अज्ञानाला आधार देतो की 'नाही, बरोबरच आहे, करेक्ट आहे.' आता जेव्हा आम्ही तो अहंकार काढून टाकतो, तेव्हा अज्ञान निराधार होऊन गळून पडते. नाही तर अहंकारच रोज, दिवसभर अज्ञानाला आधार देत राहतो.

कंटाळा या शब्दाचे पृथक्करण केले आहे का की, कंटाळा हा शब्द कसा बनला असेल? जर इथे असे काटे पसरलेले असतील आणि त्या काट्यांवर अंथरूण अंथरले तर शांती वाटेल का? मग कंटाळा येईल. काट्यांचे अंथरूण, त्याचेच नाव कंटाळा. तुम्हाला अशा अंथरूणावर झोपायला आवडेल का? पसंत पडेल?

**प्रश्नकर्ता :** असे कोणाला आवडेल?

**दादाश्री :** आवडत नसेल तर त्यावर उपाय शोधून काढावा लागेल. तू शोधला आहेस का उपाय? काय उपाय शोधला आहे?

**प्रश्नकर्ता :** तो तर आपोआपच निघतो.

**दादाश्री :** तर आता पुन्हा कधीही, सहा महिन्यानंतरही कंटाळा येणार नाही, हे निश्चित झाले आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही, पण ते तर त्याची संगत, मित्रमंडळ यावर अवलंबून असते.

**दादाश्री :** हो, पण संगत कशावर अवलंबून आहे? आज कसली संगत मिळेल, हे कशावर अवलंबून आहे? आज मी तुला भेटणार आहे, ही संगत मिळणार आहे, हे कशावर अवलंबून आहे?

**प्रश्नकर्ता :** हे तर जीवन चक्र आहे!

**दादाश्री :** हो, पण हे चक्र कोण फिरवितो? का फिरवितो? एखाद्याला अशा जागी आणून का बसवितो आणि एखाद्याला खिसा कापला जाईल अशा ठिकाणी का बसवितो?

**प्रश्नकर्ता :** हे सर्व नैसर्गिक आहे का?

**दादाश्री :** हो, नैसर्गिक. त्याला इंग्रजीत काय म्हणतात? 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स' (वैज्ञानिक सांयोगिक पुरावे) म्हणतात, तेच या सर्व जगाला चालविते.

आता जर तुला कंटाळा येणार नाही असे काही औषध मिळाले तर तुला बरे वाटेल ना? आयुष्यभर कंटाळा येणार नाही, चिंता वाटणार नाही, त्रास होणार नाही, तर खूप चांगलेच म्हणायचे ना?

**प्रश्नकर्ता :** पण असे होणारच नाही ना, इंपॉसिबल (अशक्य) गोष्ट आहे.

**दादाश्री :** असे आहे ना की हा जो 'इंपॉसिबल' शब्द आहे, तो देखील 'पॉसिबल' (शक्य) शब्दातूनच निर्माण झाला आहे. म्हणजेच 'इंपॉसिबल' शब्दाचे जन्मस्थान 'पॉसिबल' हा शब्द आहे. म्हणजे सर्व काही शक्य आहे. आता 'या' सर्वांना काही चिंता नाही. 'या' सर्वांना सांगितले आहे की एकही चिंता झाली तर माझ्यावर खटला भरा.

**प्रश्नकर्ता :** कंटाळारहित जीवन असेल आणि जीवनात सुखच मिळत असेल तर माणूस धुंद होणार ना?

**दादाश्री :** नाही. असे आहे की, हे जे सांसारिक सुख आहे ते कल्पित सुख आहे, या सुखामुळेच मनुष्य शेफारत जातो. परंतु जेव्हा स्वत:चे खरे सुख, शाश्वत सुख मिळते तेव्हा त्याला तृप्ती होते, म्हणून तो शेफारत नाही. कल्पित सुखामुळेच मनुष्य धुंद होतो. तुझे म्हणणे खरे आहे, ते कल्पित सुख जर आपल्याला कायमचे मिळाले तर मग मनुष्य शेफारुन जाईल. वेडा होऊन जाईल. कारण ते कल्पित सुख आहे आणि जर कल्पित सुख वाढले तर मनुष्य धुंद होतो. म्हणूनच त्यावर कंट्रोल ठेवण्याची गरज आहेच. थोडावेळ मार खावा लागतो आणि परत थोडावेळ सुख मिळते! हा मार आणि सुख दोन्ही कल्पित आहेत. आणि आत्म्याचे सुख, हे तर शाश्वत सुख आहे, कायम स्वरूपी सुख आहे. हे सुख एकदा आले की मग जात नाही. हे सुख तर जेव्हा स्वत:ला स्वत:च्या स्वरूपाचे ज्ञान होते, स्वत:चे सेल्फ रिअलायझेशन होते, तेव्हा उत्पन्न होते.

हे घड्याळ चालू आहे की नाही, असे तुम्ही रिअलाइज करून (तपास करून) आणले होते की असेच आणले?

**प्रश्नकर्ता :** रिअलाइज करून आणले.

**दादाश्री :** हो, तर हे सर्व रिअलाइज करून आणले आहे पण स्वत: स्वत:लाच रिअलाइज केले नाही, लोक बायकोसुद्धा रिअलाइज करूनच आणतात ना? मग स्वत:, स्वत:ला रिअलाइज करा ना! ते करायला नको का?



# [ 5 ]
# चिंतेपासून मुक्ती

## जगात चिंतेवर काय औषध आहे?

**दादाश्री :** तुम्हाला कधी चिंता वाटली आहे का?

**प्रश्नकर्ता :** हो, वाटली आहे ना.

**दादाश्री :** (चिंतेला) नीट ओळखता का?

**प्रश्नकर्ता :** चिंतेत आणि फक्त चिंतेतच बुडलेलो आहे.

**दादाश्री :** चिंतेतच असाल तर मग पाहण्यासारखे राहिलेच काय? नेहमी चिंताच असते ना?

**प्रश्नकर्ता :** पण चिंता तर सर्वांनाच वाटते ना?

**दादाश्री :** तर मग चिंतेशी घरोब्याचे संबंध असतील ना? वेळोवेळी यावे-जावे, वेळोवेळी यावे-जावे, असा संबंध आहे ना?

**प्रश्नकर्ता :** नाही, पण मला चिंता नकोच आहे ना!

**दादाश्री :** असे तर सगळेच म्हणतात की मला चिंता नकोच आहे, पण चिंता कोणालाच सोडत नाही ना! ती तर रात्री अकरा वाजताही येऊन उभी राहते आणि मग दिवसभर चिंता वाटत राहते की, 'असे होईल आणि तसे होईल.' त्यानंतर मग तोंडावर एरंडाचे तेल चोपडल्यासारखी अवस्था होणार नाही का?

**प्रश्नकर्ता :** हो. होईल ना?

**दादाश्री :** तर मग त्याचे निराकरण तर करावे लागेल ना? या राँग बिलीफस्ना कधीपर्यंत कवटाळून बसाल? खरे तर जर तुम्ही वरीज्ची (चिंतेची) चव घेतली असेल ना, तरच या जगाची खरी चव कळेल, अन्यथा या जगाची चव कळत नाही. फक्त वरीज्, वरीज्, वरीज्! जसे रताळे भट्टीत भाजतात, तसेच हे जग भाजले जात आहे. जसे मासे तेलात तळले जातात, तशीच तडफड, तडफड होत आहे. याला जीवन कसे म्हणता येईल? जेव्हा चिंता वाटते तेव्हा कोणते औषध चोपडता?

**प्रश्नकर्ता :** शांतपणे निद्राधीन झालो तर चिंतामुक्त होता येईल.

**दादाश्री :** निद्राधीन? पण झोप येईल का अशा वेळी?

**प्रश्नकर्ता :** तशी तर थकून भागून झोप येते.

**दादाश्री :** हो, मन थकले की झोप येते. खरे आहे तुमचे, चुकीचे नाही बोललात तुम्ही. पण चिंता पसंत नाही ना? मग तिला पाठवते कोण?

**प्रश्नकर्ता :** देव.

**दादाश्री :** असे होय? देवाला बिचाऱ्याला आई-वडील नाहीत, म्हणून लोक त्यांच्याबद्दल बरे-वाईट बोलतात. कोणाच्या मुलाबद्दल आपण काही बरे-वाईट बोललो तर त्याचे आई-वडील आपल्याशी भांडतील ना? पण देवाचे तर आई-वडील नाहीत, म्हणून सगळे देवालाच नावे ठेवतात की देवाने माझ्याशी असे केले, तसे केले! देवाने सर्वांना चिंतेत का ठेवले असतील?

**प्रश्नकर्ता :** कर्मांची फळे भोगण्यासाठी.

**दादाश्री :** आपण जी कर्मे केली असतील त्यांची फळे आपल्यालाच भोगायची आहेत. हे खरे आहे ना? तर मग यात मध्ये देवाची गरजच काय?

## जिथे चिंता, तिथे अनुभूती कशी असेल?

**प्रश्नकर्ता :** चिंतेपासून दूर होण्यासाठी देवाकडून आशीर्वाद मागतो की, 'मी यातून कधी सुटेन', म्हणून 'देवा, देवा' असे आम्ही म्हणतो. त्या माध्यमाद्वारे आम्ही पुढे जाऊ इच्छितो. तरी पण अजून मला माझ्या आतील भगवंताची अनुभूती होत नाही.

**दादाश्री :** अनुभूती कशी होईल? चिंता असताना अनुभूती होणार नाहीच ना! चिंता आणि अनुभूती, दोन्ही एकत्र असू शकत नाहीत. चिंता मिटली की अनुभूती होते.

**प्रश्नकर्ता :** चिंता कशी मिटेल?

**दादाश्री :** इथे सत्संगात राहिल्याने. कधी सत्संगात आला आहात का?

**प्रश्नकर्ता :** दुसऱ्या ठिकाणी सत्संगाला जातो, पण इथे मात्र एक-दोन वेळाच आलो आहे.

**दादाश्री :** सत्संगाला जाऊनही जर चिंता बंद होत नसेल तर तो सत्संग सोडून दिला पाहिजे. सत्संगामुळे चिंता बंद झालीच पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** तिथे बसतो तेवढा वेळ शांती वाटते.

**दादाश्री :** नाही, तिला शांती म्हणत नाहीत. त्यात शांती नाही. अशी शांती तर आपल्याला गप्पा ऐकल्यावरही मिळते. खरी शांती तर कायम टिकून राहिली पाहिजे, जाता कामाच नये. म्हणूनच जिथे चिंता वाटेल, अशा सत्संगात जावेच कशाला? सत्संगवाल्यांना सांगावे 'साहेब, आम्हाला अजूनही चिंता होत आहे, म्हणून आम्ही आता इथे येणार नाही, किंवा मग तुम्ही असा काही इलाज करा की ज्यामुळे आम्हाला चिंता वाटणार नाही.'

**प्रश्नकर्ता :** मी ऑफिसमध्ये गेलो किंवा घरी आलो, तरी पण कुठेच मन लागत नाही.

**दादाश्री :** ऑफिसला तर तुम्ही नोकरीसाठी जाता, आणि पगार तर हवा असतो ना! घर-गृहस्थी चालवायची आहे, म्हणून घर सोडायचे नाही, नोकरीसुद्धा सोडायची नाही. पण जिथे चिंता मिटत नाही तो सत्संग मात्र सोडला पाहिजे. दुसरा नवीन सत्संग शोधा, तिसरा शोधा. सत्संग अनेक प्रकारचे असतात, पण सत्संगामुळे चिंता मिटली पाहिजे. तुम्ही दुसऱ्या कुठल्याही सत्संगात गेला नाहीत का?

**प्रश्नकर्ता :** पण आम्हाला असे सांगण्यात येत आहे की, परमेश्वर तुमच्या आतच आहे, तुम्हाला शांती आतूनच मिळेल, बाहेर भटकणे बंद करा.

**दादाश्री :** हो, ते बरोबर आहे.

**प्रश्नकर्ता :** पण आत जो परमेश्वर विराजमान आहे, त्याचा थोडा देखील अनुभव येत नाही.

**दादाश्री :** चिंतेत असताना अनुभव येत नाही. चिंता असेल तर जो अनुभव आला असेल तोही निघून जाईल. चिंता हा तर एक प्रकारचा अहंकारच आहे. भगवंत म्हणतात की, 'तू अहंकार करतोस? तर मग माझ्यापासून दूर हो!' ज्याला 'मी हे चालवतो', असा अहंकार आहे तोच चिंता करतो ना? ज्याचा भगवंतावर अजिबात विश्वास नाही तोच चिंता करतो ना?

**प्रश्नकर्ता :** भगवंतावर तर विश्वास आहे.

**दादाश्री :** विश्वास असेल तर असे करणारच नाही ना! तो तर भगवंताच्या विश्वासावर सर्व काही सोडून पांघरूण घेऊन निवांत झोपून जाईल. अशी चिंता करत कोण बसणार? म्हणून भगवंतावर विश्वास ठेवा. भगवंत तुमचे थोडेफार तरी चालवत असेल की नाही? पोटात जेवण टाकल्यानंतर तुम्ही चिंता करता का? पाचक रस पडले की नाही, पित्त पडले की नाही, अशी चिंता करता का? 'याचे रक्त बनेल की नाही, याचे संडास बनेल की नाही?' अशी चिंता करता का? म्हणजे हे आतलेच बरेच काही चालवायचे आहे. बाहेर कुठे काय चालवायचे

आहे, की तुम्ही त्याची चिंता करता? मग परमेश्वराला वाईट वाटणारच ना! अहंकार केला की चिंता होणार. चिंता करणाऱ्यांना अहंकारी म्हणतात. एक आठवडाभर सर्व काही भगवंतावर सोडून चिंता करणे बंद करा. मग इथे एखाद्या दिवशी तुम्हाला भगवंताचा साक्षात्कार घडवून देऊ, त्यानंतर चिंता कायमची मिटेल.

## चिंता गेली, की समाधी

चिंता झाली नाही तर खरोखरच गुंता सुटला. चिंता नाही वरीज् नाहीत आणि उपाधीमध्येही समता राहिली तर समजा खरेच गुंता सुटला.

**प्रश्नकर्ता :** अशी समाधी स्थिती आणायची म्हटली तरी येत नाही.

**दादाश्री :** ती काय अशी आणून येत नाही. जेव्हा 'ज्ञानी पुरुष' गुंता सोडवून देतात, सर्व काही शुद्ध करून देतात, तेव्हाच निरंतर समाधी राहते.

**प्रश्नकर्ता :** गुंता सुटणारच नाही हे देखील 'व्यवस्थित'च नाही का?

**दादाश्री :** तुमचा गुंता सुटत नाही हे पण 'व्यवस्थित' आहे आणि सुटतो हे देखील 'व्यवस्थित'च आहे. म्हणूनच मी म्हणतो ना, की मी तर निमित्त आहे, मी काही याचा कर्ता नाही.

चिंता निघून जाणे, यालाच समाधी म्हणतात. त्यामुळे मग कामही पूर्वीपेक्षा जास्त होईल, कारण गुंतागुंत होतच नाही ना! ऑफिसात जाऊन बसले की काम सुरू. घराचे विचार येत नाहीत, बाहेरचे विचार येत नाहीत, दुसरे कुठले विचार येत नाहीत आणि संपूर्ण एकाग्रता राहते.

ज्याची सांसारिक कामे बिघडत असतील त्याने धर्म प्राप्त केला आहे असे म्हणता येणार नाही. सांसारिक कामात सुधारणा व्हायला पाहिजे, संसार सुधारला पाहिजे. आसपासच्या लोकांनीही म्हणायला हवे की, 'नाही बाबा! हे खूप चांगले आहेत.' या उलट भक्त तर खूप बावळट असतात, त्यांचा तर संसारही बिघडतो आणि धर्मही बिघडतो, सगळेच बिघडते. आणि यांना तर ज्ञानी म्हणतात, ते व्यवहारात एक्झॅक्ट

असतात. या ज्ञानाने तर लोकांचे (मोक्षाचे) कामच होऊन जाईल, नाहीतर अशांतीमुळे तर पाप कर्मेच बांधली जातात. माणूस जेव्हा अशांत होतो तेव्हा त्याला समोरची माणसे चांगली असली तरी वाईट दिसतात, परंतु जर आत शांती असेल तर समोरचा वाईट असला तरी चांगला वाटतो.

## ...अवेळी चिंता

हे तर सायन्स आहे, अक्रम विज्ञान तर क्वचितच कधी बाहेर येते. अक्रम म्हणजे ज्यात क्रम वगैरे नाही. हा मुख्य मार्ग नाही, ही तर पायवाट आहे. मुख्य मार्ग तर चालूच आहे ना! तो मार्ग आता मूळ स्टेजमध्ये नाही, आता अपसेट झाला आहे. सर्व धर्म अपसेट झालेले आहेत. धर्म जेव्हा मूळ स्थितीत होता तेव्हा तर जैनांची, वैष्णवांची सर्वांची घरे चिंता विरहित होती. हल्ली तर मुलगी तीन वर्षाची झाली की म्हणतात, 'अहो, मला या मुलीचे लग्न करायचे आहे.' 'अरे, मुलीचे लग्न ती वीस वर्षाची झाली की होईल, मग आतापासूनच चिंता का करतोस? सतरा वर्षाआधीच लग्नाची चिंता करतोस तर मग मरण्याची चिंता का करत नाहीस?' तर म्हणेल 'नाही, मरणाची आठवण तर काढूच नका.' तेव्हा मी विचारले 'मरणाची आठवण करण्यात काय हरकत आहे? तू मरणार नाहीस का?' तर म्हणतो 'जर मरणाची आठवण केली तर आजचे सुख नाहीसे होईल. आजची आमची सगळी मजा निघून जाईल.' अरे, मग मुलीच्या लग्नाची आठवण आज का करतोस? त्याने पण तुझी मजा निघून जाईल ना? आणि मुलगी आपल्या लग्नाचे सर्व काही घेऊनच आली आहे. आई-वडील तर यात केवळ निमित्त असतात. मुलगी आपल्या लग्नासाठीची सर्व साधने घेऊनच आलेली असते. बँक बॅलेन्स, पैसे वगैरे सर्व घेऊन आलेली असते, कमी किंवा अधिक, जितका खर्च होणार असेल ते सर्व एक्झॅक्टली (निश्चित रूपाने) घेऊनच आलेली असते. फक्त एवढेच की हे सर्व काही बापावर सोपविलेले असते! त्यामुळे काळजी करण्यासारखे हे जग नाही. एक्झॅक्टली पाहायला गेलो तर हे जग अजिबात काळजी करण्यासारखे नाहीच, कधी नव्हतेच, आणि असणारही नाही.

मुलगी आपला हिशोब घेऊनच आलेली असते. मुलीची काळजी तुम्ही करू नका. तुम्ही मुलीचे पालक आहात, मुलगी स्वत:साठी मुलगाही घेऊनच आलेली आहे. आपल्याला कोणाला सांगावे लागत नाही की तिच्यासाठी मुलगा जन्माला घाला. आमच्या मुलीसाठी मुलगा जन्माला घाला, असे सांगावे लागते का? अर्थात सर्व सामान तयार घेऊनच आलेली असते. पण बाप म्हणतो 'ही पंचवीस वर्षाची झाली, अजून तिचे लग्न जुळत नाही. असे आहे, तसे आहे.' अशी दिवसभर बडबड करत राहतो. अरे, तिथे मुलगा सत्तावीस वर्षाचा झाला आहे, पण त्याच्याशी तुझी भेट झाली नाही, मग उगाच का बोंबलतोस? झोप ना चुपचाप! मुलगी स्वत:चे टाइमिंग वगैरे सर्व व्यवस्था करून आली आहे.

काही लोक तर मुलगी तीन वर्षाची होताच चिंता करायला लागतात की 'आमच्या जातीत तर खूप खर्च करावा लागतो, मग कसे करणार?' अशी तक्रार करत राहतात. हे लोक तर फक्त इगोइझम (अहंकार) करीत असतात. मुलीच्या लग्नाची कशाला काळजी करता? तिच्या लग्नाची वेळ आली की लग्न होईल. संडास संडासच्या वेळी होईल, भूक भुकेच्या वेळी लागेल, झोप झोपेच्या वेळी येईल. तुम्ही कशाला प्रत्येक गोष्टीची काळजी करता? झोप आपली वेळ घेऊन आली आहे, संडास आपली वेळ घेऊन आले आहे, मग कशाला काळजी करता? झोपेची वेळ झाली की आपोआप डोळे मिटू लागतील. झोपेतून उठणेही आपली वेळ घेऊन आले आहे. त्याचप्रमाणे मुलगीही आपल्या लग्नाची वेळ घेऊन आलेली असते. ती आधी वर जाणार की आपण आधी वर जाऊ याचा काय भरवसा?

## परसत्ता हातात घेतली की चिंता होईल

तुमचे कसे काय आहे? कधी उपाधी वाटते का? चिंता वाटते का?

**प्रश्नकर्ता :** आमच्या मोठ्या मुलीचे लग्न जुळत नाही ना, त्यामुळे काळजी वाटते!

**दादाश्री :** महावीर भगवंतांना काय आपल्या मुलीचे लग्न करायचे

नव्हते? तीही मोठी झाली होती ना? पण भगवंत का चिंतित होत नसत? जर तुमच्या हातात असेल तर त्रास करून घ्या ना, पण ही गोष्ट तुमच्या हातात आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** नाही? मग कशाला त्रास करून घेता? मग काय ही गोष्ट या शेठजींच्या हातात आहे? या ताईंच्या हातात आहे?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** मग कोणाच्या हातात आहे हे जाणून घेतल्याशिवायच दु:खी होत राहणे, हे कशासारखे आहे, तर समजा आपण दहा जण एका घोडागाडीत बसलो आहोत, मोठी दोन घोड्यांची गाडी आहे. तिला चालविणारा चालवीत आहे आणि जर आपण आत बसून ओरडत राहिलो की 'ए असे चालव, ए तसे चालव' तर काय होईल? अहो, जो चालवत आहे त्याला पाहत राहा ना! 'चालविणारा कोण आहे' एवढे जाणून घेतले तर आपल्याला चिंता वाटणार नाही. तसेच 'हे जग कोण चालवितो' हे जर आपण जाणून घेतले तर आपल्याला चिंता वाटणार नाही. तुम्ही रात्रंदिवस चिंता करत आहात? कधीपर्यंत कराल? याचा अंत कधी येईल? हे मला सांगा.

ही मुलगी तर आपले सर्व घेऊनच आली आहे, तुम्हीही तुमचे सर्व काही घेऊनच आले होते ना? हे शेठजी तुम्हाला भेटलेच ना? जर तुम्हाला हे शेठजी भेटले तर या मुलीला का कोणी भेटणार नाही? तुम्ही थोडा तरी धीर धरा ना. वीतराग मार्गात आहात आणि धीर धरला नाही तर त्यामुळे आर्तध्यान होईल, रौद्रध्यान होईल.

**प्रश्नकर्ता :** तसे नाही पण स्वाभाविक काळजी तर वाटेलच ना?

**दादाश्री :** त्या स्वाभाविक काळजीलाच आर्तध्यान आणि रौद्रध्यान म्हणतात, तुम्ही आत आत्म्याला दु:ख पोहोचवले. इतर कोणाला दु:ख देत नाही ते ठीक आहे, पण हे तर आत्म्याला दु:ख दिले.

ह्याचा चालणविणारा कोण असेल? ताई तुम्ही तर जाणत असाल ना? हे शेठजी जाणत असतील? दुसरा कोणी चालविणारा असेल की तुम्हीच चालविता?

**प्रश्नकर्ता :** कोणी नाही.

**दादाश्री :** कोणाशिवाय हे कसे चालेल? कोणी तरी संचालक असेलच ना? संचालकाशिवाय तर चालणारच नाही ना? असे आहे की जेव्हा ताप येतो, तेव्हा मनात येते की मला ताप आला पण '(तापाला) कोणी पाठविले' ते शोधत नाही. त्यामुळे मनात येते की आता ताप नाही गेला तर काय करू? अरे बाबा! ताप आला आहे, पाठविणाऱ्याने पाठविला आहे आणि तो परत बोलवूनही घेईल, आपल्याला काळजी करण्यासारखे आहेच काय? आपण बोलाविले नाही, पाठविणाऱ्याने पाठविला आहे, तर परत बोलवून ही घेईल, ही सर्व नैसर्गिक रचना आहे. जर आपल्याला विचार करायचा असेल तर जेवणाआधीच विचार केला पाहिजे, या डाळीमुळे मला वायु होईल का? पण जेवणानंतर असा विचार केला की 'आता मला काय होईल? काय होईल?' याला काय अर्थ आहे?

चिंता केल्याने तर अंतराय कर्म बांधले जाते आणि त्यामुळे कार्याला विलंब होतो. तुम्हाला कोणी सांगितले की अमुक ठिकाणी मुलगा आहे, तर तुम्ही प्रयत्न करावा. परंतु भगवंतांनी चिंता करण्याची मनाई केली आहे. चिंता केल्याने तर आणखी अधिक अंतराय पडतो. आणि वीतराग भगवंत काय म्हणतात, 'बाबा, तुम्ही चिंता करता तर तुम्ही काय मालक आहात का? तुम्हीच जग चालवता का?' खरे पाहिले तर स्वत:ला शौचाला जाण्याची देखील स्वतंत्र शक्ती नाही, ते बंद झाले तर डॉक्टरला बोलवावे लागते. मात्र तोपर्यंत ती शक्ती स्वत:ची आहे असेच आपल्याला वाटत राहते. पण ती शक्ती आपली नाही. ती शक्ती कोणाच्या आधीन आहे, हे सर्व जाणून घ्यायला नको का?

असे आहे की, आपल्याकडे तर मुलगी सात वर्षाची झाली की वाटते की 'ही आता मोठी झाली, ही आता मोठी झाली!' लग्न तर विसाव्या वर्षी होणार असते पण आत्तापासूनच चिंता करायला लागतात!

मुलीच्या लग्नाची चिंता केव्हापासून सुरू करायला हवी, असे एखाद्या शास्त्रात लिहिले आहे का? विसाव्या वर्षी लग्न करायचे असेल तर आपण कधीपासून चिंता सुरू करायला हवी? दोन-तीन वर्षाची असेल तेव्हापासून?

**प्रश्नकर्ता :** मुलगी चौदा-पंधरा वर्षाची झाली की आई-वडील विचार करतातच ना?

**दादाश्री :** नाही. तरी अजून पाच वर्षे शिल्लक आहेत ना! त्या पाच वर्षात चिंता करणारा मरेल की ज्याची चिंता करता ती मरेल याचा काय भरवसा? अजून पाच वर्षे बाकी आहेत तर त्याआधीच चिंता कशी करू शकतो?

**प्रश्नकर्ता :** जर असे असेल तर लोक पैसे कमावायला जाणारच नाहीत, आणि चिंताही करणार नाहीत.

**दादाश्री :** नाही. कमावायला जातात, तेही त्यांच्या हातात नसतेच ना! ते सगळे भोवरे आहेत, ते सगळे निसर्ग फिरवेल तसे फिरतात आणि अहंकार करतात की, 'मी कमावण्यासाठी गेलो होतो!' म्हणजे उगाचच चिंता करत राहतात! आणि तेसुद्धा इतरांचे बघून बघून की, या भाऊंना बघा, यांना मुलीच्या लग्नाची किती काळजी आहे, आणि मी तर काळजीच करत नाही! आणि मग काळजी करत करत टरबुजासारखा होऊन जातो. आणि नंतर जेव्हा मुलीच्या लग्नाची वेळ येते तेव्हा हातात चार आणेही नसतात. काळजी करणारा पैसे आणणार तरी कुठून? लक्ष्मीचा स्वभाव कसा आहे? की जो आनंदी आहे त्याच्याकडे लक्ष्मी मुक्काम करते, आणि काळजी करणाऱ्यांकडे मुक्काम करत नाही. जो आनंदी असतो, जो भगवंताचे स्मरण करतो, त्याच्याकडे लक्ष्मी जाते. पण हे तर मुलीची काळजी आतापासूनच करीत आहेत.

आपण चिंता केव्हा केली पाहिजे? तर जेव्हा आजूबाजूचे लोक विचारायला लागतील की 'मुलीसाठी काही केले का?' तेव्हा आपण समजावे की आता चिंता करण्याची वेळ आली आहे, आणि तेव्हापासून

मग तिच्यासाठी प्रयत्न सुरू करावे. इथे तर आजूबाजूचे कोणी काही बोलत नाहीत तरी त्याआधीच, पंधरा वर्षाआधीच चिंता करू लागतात! मग बायकोलाही म्हणतात, 'आपली मुलगी आता मोठी झाली आहे आणि तिचे लग्न करायचे आहे, हे तुझ्या लक्षात राहील ना?' अरे, तू बायकोलाही चिंता करायला का लावतोस?

आपले लोक तर असे आहेत की एकाद्या वर्षी दुष्काळ पडला की दुसऱ्या वर्षी 'काय होईल, आता काय होईल, आता काय होईल' असे म्हणत राहतात. आणि भाद्रपद महिन्यापासूनच चिंता करायला लागतात. अहो, असे का करता? ज्या दिवशी तुमच्याकडचे खाण्या-पिण्याचे पदार्थ संपून जातील आणि काही व्यवस्था होत नसेल तर चिंता करा ना!

**प्रश्नकर्ता :** ह्या वर्षी पाऊस कमी पडला तेव्हापासून लोकांची बोंबाबोंब सुरू झाली की या वर्षी तांदूळ मिळणार नाहीत!

**दादाश्री :** अरे, जे बोंबाबोंब करत नाहीत, त्यांना हे लोक मूर्ख म्हणतील की याला काही समजत नाही आणि जे बोंबाबोंब करतात त्यांना जागृत म्हणतात! लोक हे असे आहेत.

## चिंता मिटवतो तोच मोक्षमार्ग

संसारात असेल आणि चिंतेतच राहिला, चिंता मिटली नाही तर कोण जाणे किती जन्म घ्यावे लागतील? कारण चिंतेमुळेच पुढल्या जन्माचे बंधन होते.

**प्रश्नकर्ता :** पण चिंता तर वाटणारच ना, कारण आता महागाई किती वाढली आहे?

**दादाश्री :** स्वस्त करणे काय तुमच्या हातात आहे?

**प्रश्नकर्ता :** आमच्या हातात कसे असेल?

**दादाश्री :** तर मग तुम्हाला त्याची चिंता करण्याचे काही कारणच नाही.

**प्रश्नकर्ता :** चिंता बंद करण्यासाठी काय करायला हवे?

**दादाश्री :** त्यासाठी तर 'ज्ञानी पुरुषां'जवळ येऊन त्यांची कृपा प्राप्त करावी, मग चिंता बंद होईल आणि संसार चालत राहील. तुमच्या घरची लहान मुलेसुद्धा चिंता करतात की तुम्ही एकटेच चिंता करता?

**प्रश्नकर्ता :** सगळेच करतात.

**दादाश्री :** लहान मुलेही चिंता करतात?

**प्रश्नकर्ता :** लहान मुलांना कसली चिंता? मुलांना तर चिंता नसतेच ना!

**दादाश्री :** म्हणजे तुमचे वय वाढले, म्हणून तुम्ही चिंता करता, असेच ना?

**प्रश्नकर्ता :** जबाबदारी आहे म्हणून चिंता वाटते ना?

**दादाश्री :** तुमच्यावर काय जबाबदारी आहे? तुम्ही जबाबदार असाल तर मुले कधी आजारी पडणारच नाही ना!

**प्रश्नकर्ता :** घरात जी वडीलधारी माणसे असतात त्यांना तर चिंता वाटेलच ना?

**दादाश्री :** चिंता अज्ञानामुळे होते. मजूर चिंता करत नाहीत, पण शेठ लोक चिंता करतात. एकही मजूर चिंता करत नाही, कारण मजूर उच्च गतीला जाणार आहेत आणि शेठ नीच गतीला जाणार आहेत. चिंतेमुळे नीच गती मिळते, म्हणून चिंता करू नये. चिंतेमुळे काही वाढते का?

**प्रश्नकर्ता :** वाढत तर नाही.

**दादाश्री :** वाढत नाही? मग तो चुकीचा व्यापार कोण करील? जर चिंतेमुळे वाढ होत असेल तर करा. तुम्हाला चिंता करण्याचा शौक आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही, शांती हवी आहे.

**दादाश्री :** चिंतेला तर अग्नी म्हटले आहे. असे होईल आणि तसे होईल! चिंता हा तर अहंकार आहे. कधी काळी जैन बनण्याची संधी प्राप्त होते आणि त्यावेळी जर चिंतेत राहिलात तर माणूसपणाही निघून जाईल. म्हणजे हा किती मोठा धोका आहे? तुम्हाला जर शांती हवी असेल तर चिंता कायमची बंद करून देतो.

जेव्हापासून चिंता बंद होते तेव्हापासूनच वीतराग भगवंतांचा मोक्षमार्ग म्हटला जातो! वीतराग भगवंतांचे जो दर्शन घेतो त्याची चिंता बंद होते, पण यांना दर्शन घेताही येत नाही.

**प्रश्नकर्ता :** आपल्यासमोर तर आम्ही बालक आहोत.

**दादाश्री :** हो, म्हणूनच मी म्हणतो की दर्शन करताही येत नाही. दर्शन कसे करावे हे तर 'ज्ञानी पुरुष' शिकवतात की अशा प्रकारे दर्शन करा, तेव्हा कुठे काम होते. या चिंतेत तर अग्नि पेटत असतो. रताळे पाहिले आहे का? भट्टीत ठेवल्यावर रताळी जशी भाजली जातात तसेच चिंतेमुळे होते.

इतकी चांगली भाजी वगैरे आणतो, आणून खातो आणि चिंता करत बसतो, स्वत:च्या पैशांने आणलेले कपडे घालून चिंता करतो. तुम्हाला तर अपार चिंता आहे, त्यामुळे कधी क्लेश-भांडणही होते ना?

**प्रश्नकर्ता :** जरी खूप आनंदात असलो तरी एखादा शब्द असा निघून जातो की त्यामुळे क्लेश निर्माण होतो!

**दादाश्री :** त्यावेळी तुम्ही दरवाजा बंद करून क्लेश (भांडण) करता ना?

**प्रश्नकर्ता :** क्लेश करताना दरवाजा तर बंद करत नाही.

**दादाश्री :** म्हणजे दरवाजा उघडा ठेवून करता? तर मग सगळ्यांना कळत असेल!

क्लेश-भांडण जर महिन्यातून एखाद्यावेळी होत असेल तर ठीक आहे, पण रोज रोज क्लेश होता कामा नये. आपल्याला आवडत नाही

तरी पण असे घडतेच ना? मग क्लेश कोण करवीत असेल? जे तुम्हाला आवडत नाहीत, तेच शब्द बोलले जातात. या सगळ्यांचे कारण अज्ञान आहे. अज्ञान गेले की शांती वाटेल. तुम्हाला अज्ञान घालवायचे आहे का? चिंता जाईल आणि क्लेश बंद होतील, असे तुम्हाला करायचे आहे?

## चिंता करण्याऐवजी, धर्माकडे वळवा

**प्रश्नकर्ता :** घरातले जे मुख्य लोक असतात, त्यांना जी चिंता असते, ती कशी दूर करावी?

**दादाश्री :** कृष्ण भगवंताने काय सांगितले आहे की 'जीव तू शीदने शोचना करे, कृष्णने करवुं होय ते करे.' (जीवा, तू कशाला काळजी करतोस, श्रीकृष्णाला जे करायचे असेल ते करू दे) असे वाचनात आले आहे का?

**प्रश्नकर्ता :** मी असे मानतो की माणसाने श्रम तर केलेच पाहिजेत, देखभाल तर केलीच पाहिजे.

**दादाश्री :** श्रम तर खूप करा. श्रम तर तुम्ही पाच वाजता उठल्यापासून करत राहा, पण चिंता-वरीज करण्याची काय गरज आहे?

**प्रश्नकर्ता :** घरात चाळीस जण आहेत ना, म्हणून चिंता तर होणारच ना?

**दादाश्री :** नाही, पण हे सर्व काय तुम्ही चालवता? श्रीकृष्ण काय सांगतो की मला चालवू द्या ना! तुम्ही कशाला उठाठेव करता?

**प्रश्नकर्ता :** असे आहे, घरात मलाच सर्व मेहनत करावी लागते, मुले काहीच करत नाहीत. आपण मुलांना श्रम करायला शिकवले तर ते नीट वागतील, पण ते कसलेही श्रम करत नाहीत. काही काम करत नाहीत. काहीही सांगितले तर त्याच्या उलटच करतात.

**दादाश्री :** त्याचे असे आहे, तुम्हाला वाटते की या जन्मीच्या मुलांची चिंता तुम्ही केली पाहिजे पण गेल्या जन्मीच्या मुलांसाठी तुम्ही काय केले? प्रत्येक जन्मात मुलांना मागे सोडूनच आलो आहे.जो जन्म

मिळाला त्या प्रत्येक जन्मात मुलांना मागे सोडून आला आहे, तेसुद्धा लहान-लहान, एवढी-एवढी, भरकटतील अशी मुले सोडून आला आहे. तिथून येण्याची बिलकुल इच्छा नव्हती तरीही तिथून आला आणि विसरून गेला आणि परत या जन्मात दुसरी मुले! मग मुलांसाठी का कटकट करता? त्यांना धर्माच्या मार्गाकडे वळवा ना, तर ती चांगली होतील.

## परक्या जंजाळाची चिंता कुठपर्यंत?

एका शहरात माझ्या ओळखीचे एक गृहस्थ होते, त्यांच्या घरी मी थांबलो होतो. ते मला म्हणाले, 'माझ्या मेहुण्यांची तब्येत आता फारच बिघडली आहे. जरा सिरीयस आहेत. म्हणून मला तर दिवसभर चैनच पडत नाही. परवाच मी त्यांच्या तब्येतीची विचारपूस करून आलो आहे.' म्हणजे ते गृहस्थ अशी चिंता-वरीज करत होते. त्यांचे म्हणणे ऐकून मलाही चिंता वाटू लागली, कारण त्यांची बहीण तरुण होती आणि त्यावेळी मला 'ज्ञान' झाले नव्हते. रात्रीचे अकरा वाजले आणि गप्पा मारता मारता ते भाऊ तर घोरायला लागले! आणि त्यांच्या मेहुण्याच्या चिंतेत मला मात्र रात्रभर झोप आली नाही! हे जग असे आहे का? त्यांच्या मेहुण्यासाठी मी जागा आहे, मी व्यथित होत आहे आणि हे घोरत पडले आहेत! मग मी स्वतः स्वतःलाच सांगितले 'मी असा मूर्ख का बनलो? ज्याचा मेहुणा आजारी होता तो झोपी गेला आणि मी फक्त ऐकले तरी माझ्यावर परिणाम झाला! म्हणजे आपणच मूर्ख ठरलो. तेव्हापासून मी जगाला ओळखू लागलो की जग काय आहे? मग मला समजले हे जग म्हणजे सावळा गोंधळ आहे.

आपल्याला कर्मबंधन होणार नाही अशा प्रकारे आपण वागावे. या जगापासून दूर राहावे. कर्मे बांधली गेली होती म्हणून तर हे लोक भेटले आहेत. आपल्या घरी कोण एकत्र आले आहेत? ज्यांच्याबरोबर कर्मबंधनाचे हिशोब बांधले गेले आहेत, तेच सर्व एकत्र जमले आहेत, आणि ते सर्व आपल्याला बांधून मारतात सुद्धा! आपण ठाम ठरवले असेल की मला याच्याशी बोलायचे नाही, तरी देखील समोरचा तोंडात बोट घालून बोलायला लावेल. अरे, असे तोंडात बोट घालून का

बोलायला लावतोस? याला म्हणतात वैर, सर्व पूर्व जन्मीचे वैर! तुम्ही असे वैर कुठे पाहिले आहे का?

**प्रश्नकर्ता :** सर्व ठिकाणी हेच तर दिसते ना!

**दादाश्री :** म्हणूनच मी सांगतो ना की तिथून बाजूला व्हा. आणि माझ्याकडे या. हे जे मी प्राप्त केले आहे ते मी तुम्हाला देईन, तुमचे (मोक्षाचे) काम होईल आणि तुमची सुटका होईल. अन्यथा सुटका होणार नाही.

आम्ही कोणाचा दोष काढत नाही. पण नोंद करतो की पाहा ही दुनिया कशी आहे? ही दुनिया मी सर्व बाजूंनी पाहिली आहे, खूप प्रकारे पाहिली आहे. काही लोक तर सतत व्यापाराची चिंता करत राहतात, ते लोक चिंता का करतात? त्यांच्या मनात असे असते की 'मीच चालवत आहे', म्हणून त्यांना चिंता होते. 'हे चालविणारा कोण आहे?' असे साधे, कुठल्याही प्रकारचे अवलंबन ते घेत नाहीत. भले तू ज्ञान जाणत नाहीस, पण दुसरे कुठले तरी अवलंबन घे, कारण तू हे चालवत नाहीस असा थोडाफार अनुभव तर तुला आलेलाच आहे. चिंता हा सर्वात मोठा इगोइजम (अहंकार) आहे.

ही छोटीशी गोष्ट तुम्हाला सांगतो, ही सूक्ष्म गोष्ट तुम्हाला सांगतो की 'या जगात कोणीही मनुष्य असा जन्माला आलेला नाही की ज्याला शौचाला जाण्याची देखील स्वतंत्र शक्ती असेल!' तर मग हे लोक इगोइजम करतात, याला काय अर्थ आहे? ही तर दुसरीच शक्ती काम करत आहे. ती शक्ती आपली शक्ती नाही, ती परशक्ती आहे आणि स्वशक्तीला तर ओळखतच नाही, अर्थात स्वत: देखील परशक्तीच्या आधीन आहे, आणि फक्त आधीनच नाही तर पराधीनही आहे, पूर्ण जन्मच पराधीन आहे.

जे तुमच्या सत्तेत नाही, त्याची कल्पनाही करू नका. मागील जन्मात दोन-तीन छोट्या मुली होत्या, मुले होती, त्या सर्वांना एवढे लहान-लहान असताना सोडून आलात, तर त्या सर्वांची चिंता करता का तुम्ही? का? आणि असे मरते वेळी तर खूप चिंता वाटते ना की ह्या

छोट्या मुलीचे काय होईल? मग इथे परत नवीन जन्म घेतो, तेव्हा मागच्या जन्मीची काहीच चिंता होत नाही ना? पत्र-बित्र काहीच नाही! म्हणजेच ही सर्व परसत्ता आहे, यात हात घालूच नका. जे काही घडत आहे, ते 'व्यवस्थित'मध्ये असेल तर असू दे, नसेल तर नसू दे.

## चिंता ओढवून घेणे हा मानवी स्वभाव

चिंतेमुळे तर कामाचे नुकसान होते. तुझ्या या चिंतेमुळे काम शंभर टक्क्यांऐवजी सत्तर टक्केच होते. चिंता कामात ऑबस्ट्रक्ट (अडथळा) निर्माण करते. जर चिंता नसेल तर खूप सुंदर परिणाम येईल.

हे जग चिंता करण्यासारखे नाहीच. या जगात चिंता करणे म्हणजे बेस्ट फूलिशनेस (सर्वोत्तम मूर्खता ) आहे. चिंता करण्यासाठी हे जग नाहीच, हे इटसेल्फ क्रिएशन (स्वयं निर्मित) आहे. भगवंताने हे क्रिएशन (निर्माण) केलेले नाही. म्हणून चिंता करण्यासाठी हे क्रिएशन नाही. फक्त ही माणसेच चिंता करतात, अन्य कुठलाही जीव चिंता करीत नाही. अन्य चौर्यांशी लाख योनी आहेत, पण त्यातील कोणीही चिंता-वरीज करीत नाही. हे मनुष्य नामक जीवच अतिशहाणे आहेत, तेच दिवसभर चिंतेत त्रस्त होत असतात!

भगवंतांनी काय सांगितले आहे की 'जे प्राप्त आहे ते भोगा, अप्राप्ताची चिंता करू नका.' म्हणजे काय की जे प्राप्त आहे ते भोगा ना! आता कुणाचे तीन खोल्यांचे घर असेल आणि जर सरकारने काहीतरी करून तीनही खोल्या घेऊन टाकल्या तर मग तो काय म्हणेल, 'साहेब, एक खोली दिलीत तरी खूप झाले.' अरे, तू तर म्हणत होतास ना की तुला चार खोल्या हव्यात? मग आता एक खोलीच 'चालेल' असे का म्हणतोस? पण हे सर्व असेच आहे, माणसाचा स्वभाव असाच आहे.

पंचवीस वर्षांचा असतानाच मी हा शोध लावला होता की मनुष्याचा स्वभाव असाच आहे. म्हणून सर्व लोक ज्या रस्त्याने जातात ना, त्या रस्त्याने मी कधीच जात नसे. मी शॉर्टकट शोधून काढत असे. हे लोक तर असे आहेत की पुढे चार मेंढरे चालत असतील तर त्यांच्या मागे सगळी झुंड

जाईल. रस्ता किती वेडा-वाकडा आहे, याचा काही विचार करत नाहीत. हे तर सरकारने नियम केले आहेत म्हणून सरळ रस्ते बनविले आहेत. शिकल्या सवरलेल्या लोकांनी सरळ रस्ते बनविले, नाही तर पूर्वी तर एक मैल जाण्यासाठी तीन मैल उलटे जावे लागत होते, असे रस्ते होते.

उपभोग घेण्याची पद्धत अशी नसावी की ज्यामुळे समोरच्याला त्रास होईल. समोरच्याला सुख लाभेल असे काही करा, आपल्या संपर्कात येणाऱ्यांना, ओळखीच्या लोकांना, सर्वांना सुख लाभेल, आपल्या ग्राहकांना सुख लाभेल, असे काहीतरी करा. आधी शेजाऱ्यांचे भले केले पाहिजे.

या जगात एकीकडे असे म्हणतात की 'चिंतासे चतुराई घटे, घटे रूप, गुण, ज्ञान.' आणि दुसरीकडे असेही म्हणतात की 'जो चिंता करत नाही त्याला गाढव म्हणतात.' म्हणजे जग दोन्ही बाजूने मारत असते, त्यांना म्हणायचे असते की कम टु द नॉर्मल, आता काळजी आणि चिंता यात खूप फरक आहे. काळजी म्हणजे जागृती आणि चिंता म्हणजे जीव जाळणे.

## चिंतेचे रूट कॉज? इगोइजम

जीव जाळणारी चिंता तर काही कामाचीच नाही! ती शरीराचे नुकसान करते आणि जी वस्तू आपल्याला मिळणार असते त्यातही अडथळे आणते. चिंतेमुळेच असे संयोग निर्माण होतात. हित कशात आहे, अहित कशात आहे याचा विचार करावा, पण ही चिंता म्हणजे काय? तर त्याला इगोइजम (अहंकार) म्हटले आहे. असा इगोइजम असता कामा नये. 'मी कोणी (विशेष) आहे आणि मीच सर्व चालवतो' अशाने त्याला चिंता निर्माण होते. तसेच 'मी असेन तरच या केसचा निकाल लागेल' यामुळे चिंता निर्माण होते. म्हणूनच इगोइजमचे ऑपरेशन करून टाकावे त्यानंतर जे हिताहिताचे विचार उरतील, त्यांना हरकत नाही. ते विचार आत रक्त जाळत नाहीत, आणि ही चिंता तर रक्त जाळते, मन जाळते. जेव्हा चिंता होत असते ना, त्यावेळी मुलगा काही सांगायला आला तर त्याच्यावरही राग काढतात, म्हणजे चिंता सर्व प्रकारे नुकसान करते. हा अहंकार तर असा आहे की पैसा असो वा नसो, परंतु जर कोणी म्हटले की 'या चंदुभाईंनी माझे सर्व काही बिघडवून

टाकले.' तर मग लगेच अपार चिंता आणि अपार उपाधी वाटते! आणि हे जग तर असे आहे की आपण बिघडविले नसेल तरी पण असे म्हणणारच ना?

**प्रश्नकर्ता :** चिंता ही अहंकाराची निशाणी आहे, हे जरा समजावून सांगावे अशी विनंती आहे.

**दादाश्री :** चिंता, ही अहंकाराची निशाणी आहे असे का म्हणतात, कारण त्याला असेच वाटते की, 'मीच हे सर्व चालवीत आहे' आणि त्यामुळे त्याला चिंता वाटते. हे सर्व चालविणारा 'मीच आहे' असे वाटत असल्यामुळे 'या मुलीचे काय होईल? या मुलाचे काय होईल? काम पूर्ण झाले नाही तर काय होईल?' म्हणजेच तो चिंता स्वत:च्या डोक्यावर घेतो. तो स्वत:लाच कर्ता मानतो की 'मीच मालक आहे आणि मीच करतो' पण तो स्वत: कर्ता नाही आणि उगाचच चिंता ओढवून घेतो.

कर्ता कोण आहे? हे संयोग कर्ता आहेत. हे सगळे संयोग, सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स एकत्र आल्यावर कार्य होत असते. म्हणजेच आपल्या हातात सत्ता नाही, आपण संयोगांना पाहत राहायचे की संयोग कसे आहेत! संयोग एकत्र आले की कार्य होऊनच जाते. जर कोणी मार्च महिन्यात पावसाची अपेक्षा करेल तर ते चुकीचे ठरेल आणि जूनची पंधरा तारीख झाली की ते संयोग एकत्र होतील, काळाचा संयोग तर जुळला पण ढगांचा संयोग जुळला नसेल तर ढगांशिवाय पाऊस कसा पडेल? पण ढग जमले, काळ आला, मग विजा कडकडल्या, अन्य सर्व एविडेन्स गोळा झाले की मग पाऊस पडणारच. म्हणजे संयोग एकत्र आले पाहिजेत. मनुष्य संयोगांच्या आधीन आहे, पण तो असे मानतो की 'मी काहीतरी करतो' पण तो कर्ता आहे तेही संयोगांच्या आधीन आहे. एक संयोग जरी कमी पडला तरी ते कार्य त्याच्याकडून होऊ शकणार नाही.

एक व्यक्ती आहे, ती सामायिक करते आणि दुसऱ्यांना सांगते की 'मी रोज चार सामायिक करतो, पण हा तर एकच सामायिक करतो.' यावरून आपल्याला समजते की या व्यक्तीला सामायिक करण्याचा

इगोइजम आहे, म्हणून दुसऱ्यांचे दोष काढत आहे, 'तो एकच सामायिक करतो आणि मी चार करतो.' मग दोन-चार दिवसांनी परत आपण त्याच्याकडे गेलो आणि विचारले की 'भाऊ आज तुम्ही सामायिक का करत नाहीत?' तर म्हणेल, 'पाय आखडून गेले आहेत.' मग आपण विचारले की 'अहो! पाय सामायिक करत होते की तुम्ही करत होतात? जर पाय सामायिक करत असतील तर तुम्ही म्हणालात ते चुकीचे होते.' म्हणजेच यात तर पाय चांगले असले पाहिजेत, मन ठिकाणावर असले पाहिजे, बुद्धी ठिकाणावर असली पाहिजे, म्हणजे जेव्हा सर्व संयोग ठीक असतील तेव्हा सामायिक होईल, आणि अहंकारही ठिकाणावर असला पाहिजे. जर त्यावेळी अहंकार ठिकाणावर नसला तरी कार्य होणार नाही. म्हणजेच हे सर्व एकत्र असतील तर कार्य होईल.

## चिंतेचे परिणाम काय होतात?

या संसारात बाय प्रॉडक्टचा अहंकार असतोच आणि तो सहज अहंकार आहे, त्याने संसार सहजपणे चालेल असे आहे. पण इथे तर अहंकाराचा कारखानाच काढला आहे आणि अहंकाराचा खूप विस्तार केला, इतका विस्तार केला की त्यामुळे अपार चिंता उत्पन्न झाली! अहंकाराचाच विस्तार करीत राहिले. सहज अहंकाराने, नॉर्मल अहंकाराने संसार चालू शकतो, पण इथे तर अहंकाराचा विस्तार करून मग काका या वयात म्हणतात, 'मला चिंता वाटते.' ह्या चिंतेचा परिणाम काय? तर पुढे जनावर गती मिळेल, म्हणून सावध व्हा, आता तरी सावध व्हायला हवे. मनुष्य योनीत आहात तोवर सावध व्हा, नाही तर जर चिंता असेल तर मात्र जनावर गती मिळेल.

चिंता, हा तर प्युअर इगोइजम (केवळ अहंकार) आहे. कुठलेही जनावर चिंता करीत नाही आणि या माणसांना मात्र चिंता? ओहोहो! अनंत जनावरे आहेत, कोणालाही चिंता नाही आणि फक्त ही माणसेच अशी मूर्ख आहेत की दिवसभर चिंतेत होरपळत राहतात.

**प्रश्नकर्ता :** जनावरांपेक्षाही खाली गेलेले आहेत ना हे?

**दादाश्री :** जनावरे तर खूप चांगली आहेत. जनावरांना भगवंतांनी

आश्रित म्हटले आहे. या जगात जर कोणी निराश्रित असेल तर फक्त ही माणसेच आहेत. आणि त्यातूनही फक्त हिंदुस्तानातील माणसेच शंभर टक्के निराश्रित आहेत, मग यांना दु:ख असणारच ना? कारण त्यांना कोणताच आसरा नाही! कमाई झाली की म्हणेल 'मी कमावले.' आणि नुकसान झाले तर म्हणेल 'देवाने नुकसान केले', एवढेच नाही तर देवाला नावे ठेवील. देवाचे गुणगान करणे तर सोडा उलट नावे ठेवायला तयार! एकुलता एक मुलगा मृत्यू पावला तर म्हणेल, 'देवाने मारला' आणि मुलगा जन्माला आला तर पेढे वाटत म्हणेल की, 'माझ्या घरी मुलगा जन्मला आहे, दोन मण पेढे वाटीन!' हा इगोइजमच आहे ना? जर देवाची भक्ती करायची असेल तर देवाचे गुणगान चांगल्या प्रकारे केले पाहिजे की नाही?

## स्वत: स्वत:ला ओळखा

हे सर्व फक्त समजून घ्यायचे आहे, तुम्ही पण परमात्मा आहात. भगवंतच आहात, मग कशाला वरीज् करायच्या? चिंता का करता? एक क्षणभरही चिंता करण्यायोग्य हे जग नाही. आता ती सेफसाइड राहू शकणार नाही. कारण जी नॅचरल सेफसाइड होती तिच्यात तुम्ही गुंतागुंत निर्माण केली. आता पळून जाऊन काय करणार आहात? पळपुटी वृत्ती असता कामा नये. समस्या आल्या तर त्यांचा सामना करा.

**प्रश्नकर्ता :** जर आम्ही सामना केला, त्यांना थांबविण्याचा प्रयत्न केला किंवा प्रतिकार केला तर अहंकार वाढतो.

**दादाश्री :** चिंता करण्यापेक्षा सामना करणे चांगले. चिंतेच्या अहंकारापेक्षा सामना करण्याचा अहंकार छोटा आहे. भगवंताने सांगितले आहे की, 'जिथे सामना करावा लागेल तिथे सामना करा, पण चिंता करू नका.' जो चिंता करतो त्याला दोन शिक्षा! रात्री सगळे म्हणतात, 'अकरा वाजले, आता तुम्ही झोपा.' थंडीचे दिवस आहेत आणि तुम्ही मच्छरदाणीत शिरलात. अकरा वाजले आहेत, घरातील सर्वजण झोपले आहेत. मच्छरदाणीत शिरल्यावर तुम्हाला आठवते की, एका माणसाचे तीन हजाराचे बिल बाकी आहे आणि त्याची मुदत संपली आहे. 'आज

सही करून घेतली असती तर मुदत वाढवून घेता आली असती पण सही तर झाली नाही! मग रात्रभर तेच विचार चालू राहतात, तर काय रात्री सही होईल? नाही ना? मग आरामात झोपलो तर काय बिघडेल?

भगवंत म्हणतात चिंता करणाऱ्याला दोन शिक्षा आहेत आणि चिंता न करणाऱ्याला एक शिक्षा आहे. अठरा वर्षाचा तरूण, एकुलता एक मुलगा मृत्यू पावला त्याच्यामागे जेवढी चिंता करतात, जितके दुःखी होतात, डोके फोडतात, असे सर्व जे करतात, त्यांना दोन शिक्षा आहेत. आणि असे केले नाही तर एकच शिक्षा आहे. मुलगा मृत्यू पावला इतकीच शिक्षा आहे. आणि डोके फोडून घेतले ही अतिरिक्त शिक्षा आहे. आम्ही ह्या दोन शिक्षेत कधीच पडत नाही. म्हणूनच मी या लोकांना सांगितले आहे की 'पाच हजारांचा खिसा कापला गेला तर 'व्यवस्थित' असे म्हणून पुढे चालावे आणि आरामात घरी जावे.'

ही एक शिक्षा तर तुमचा स्वतःचाच हिशोब आहे, म्हणून घाबरण्याचे काही कारणच नाही. म्हणूनच मी 'व्यवस्थित' म्हटले आहे, एक्झॅक्ट 'व्यवस्थित' आहे. म्हणूनच जे घडले आहे तेच खरे, तेच करेक्ट असेच म्हणावे.

## व्यथा वेगळी, चिंता वेगळी

**प्रश्नकर्ता :** चिंता, हा अहंकार आहे, तर मग जो व्यथित आहे त्याने चिंता केली तर त्यात अहंकार नसेलही आणि फक्त व्यथाच असेल तर?

**दादाश्री :** व्यथा वेगळी आहे. व्यथा ही वेगळी गोष्ट आहे आणि चिंता ही वेगळी गोष्ट आहे. चिंता म्हणजे भविष्याची सर्व योजना करत असतो, आणि व्यथित होणे, असे तर त्याला काही ऑबस्ट्रक्शन (अडथळा) आले आहे, म्हणून व्यथित झाला आहे. व्यथित केव्हा होतो? तर त्याला काही अडथळा येतो तेव्हा. म्हणजे व्यथित होण्यास काही हरकत नाही, व्यथित तर मोठे मोठे संत पुरुषही होतात.

**प्रश्नकर्ता :** तर चिंतेसोबत अहंकार कसा येतो?

**दादाश्री :** मी नसलो तर चालणार नाही, असे त्याला वाटते. 'हे मीच करतो, मी केले नाही तर होणार नाही. आता हे होईल? सकाळी काय होईल?' अशी चिंता करत राहतो.

## कुठेही भरवसा वाटत नाही?

आपल्या हिंदुस्तानातील लोक तर इतकी जास्त चिंता करणारे आहेत की हे सूर्यनारायणांनी जर एका दिवसाची सुट्टी घेतली आणि म्हणाले की 'मी परत कधी सुट्टी घेणार नाही', तर दुसऱ्या दिवशी लोक शंका करतील की उद्या सूर्यनारायण येतील की नाही, सकाळ होईल की नाही, म्हणजे निसर्गावरही भरवसा नाही. स्वत:वर देखील भरवसा नाही, भगवंतावरही भरवसा नाही. कशावरच भरवसा नाही. स्वत:च्या बायकोवरही भरवसा नाही! अहमदाबादच्या एका शेठच्या बायकोला यात्रेला जाण्यासाठी वीस हजार रुपये हवे होते, तर सात वर्षे तो आपल्या बायकोला सांगत राहिला की 'आता सोय होणार नाही, आता सोय होणार नाही.' तुम्हाला समजले ना हे? स्वत: स्वत:शीही कपट करतात, हे लोक कुठे कपट करीत नाहीत? म्हणूनच कबीर साहेबांनी अगदी खरे सांगितले की,

'मैं जानुं हरि दूर है, हरि हृदय मांही,
आडी त्राटी कपट की, तासे दिसत नाही.'

आत स्वत: कपटाचा पडदा ठेवला आहे, असे असूनही भगवंत जवळच दिसायला लागले, तो पडदा तर आहे पण तरी जाळीतून थोडे दिसायला लागले म्हणून मनात लाज वाटायला लागली की भगवंत पाहतील म्हणून पडद्याला डांबर लावून घेतले, दरवर्षी दोनदा डांबर लावून घेतले. अर्थात हा पडदा जाणुनबूजुन स्वत:च उभा केला आहे.

## यांना कशाची किंमत?

काल एक वृद्ध काका आले होते, ते माझ्या पायावर पडून खूप रडले! मी विचारले 'आपल्याला काय दु:ख आहे?' तर म्हणाले 'माझे दाग-दागिने चोरीला गेलेत, सापडतच नाहीत, आता परत कधी मिळतील?' तेव्हा मी त्यांना म्हटले, 'ते दाग-दागिने तुम्ही सोबत घेऊन

जाणार होते का?' तर म्हणाले 'नाही, सोबत तर नेता येत नाहीत, पण माझे जे दागिने चोरीला गेलेत, ते परत कधी मिळतील?' मी म्हटले 'तुम्ही गेल्यानंतर मिळतील!' दागिने चोरीला गेले त्यासाठी इतकी हाय, हाय, हाय! अरे, जे गेले त्याची चिंता करायचीच नसते. कदाचित कोणी पुढची चिंता, भविष्याची चिंता करत असेल तर आपण समजू शकतो की बुद्धीवंत मनुष्याला चिंता तर होणारच. पण जे गेले त्याची पण चिंता? आपल्या देशात अशी चिंता करतात. क्षणभरापूर्वी जे घडले त्याची चिंता कशासाठी? ज्यावर उपाय नाही, त्याची चिंता कशासाठी? कोणताही बुद्धीवंताला समजते की आता यावर काही उपाय नाही, आणि म्हणूनच त्याची चिंता करायची नसते.

ते काका रडत होते पण मी दोन मिनिटातच त्यांचे समाधान केले. मग मात्र 'दादा भगवानना असीम जय जयकार हो' बोलू लागले! आज सकाळी पण ते मला रणछोडजींच्या मंदिरात भेटले, तेव्हा लगेच मोठ्याने म्हणाले 'दादा भगवान!' मी म्हटले, 'हो, हे तेच.' मग म्हणाले 'मी रात्रभर आपलेच नाव घेत होतो!' म्हणजे त्यांना असे वळवले की ते वळतात. लगेच वळतात.

**प्रश्नकर्ता :** आपण त्यांना काय सांगितले?

**दादाश्री :** मी सांगितले, 'ते दागिने परत मिळतील असे नाही, पण हो, दुसऱ्या मार्गाने दागिने मिळतील.'

**प्रश्नकर्ता :** आपण भेटलात म्हणजे फार मोठा दागिनाच मिळाला ना!

**दादाश्री :** हो, हे तर आश्चर्यच आहे! पण त्यांना ते कसे समजेल? त्यांना तर त्या दागिन्यांसमोर याची किंमतच नाही ना! अहो, त्यांना जर चहा प्यायचा असेल आणि आम्ही म्हटले की, 'मी आहे ना! मग तुम्हाला चहाची काय गरज आहे?' तर ते म्हणतील 'आपण असा वा नसा, पण मला चहाशिवाय चैनच पडत नाही!' यांना किंमत कशाची? तर ज्याची इच्छा आहे त्याची.



# [ 6 ]
# भय असतानाही निर्भयता

## वाणी कठोर, पण रोग दूर करणारी

असे जीवन काय कामाचे? जीवन तर, जीवन असावे की नाही? संपूर्ण ब्रह्मांडाने विरोध केला तरी तुम्हाला भीती वाटणार नाही, असे असायला नको का? तुमच्याकडे सर्व सामान आहे. जेवढे सामान माझ्याकडे आहे, तेवढे सर्व सामान तुमच्याकडेही आहे, पण तुम्हाला कोणी ते दाखवले नाही. म्हणून तो सगळा माल आत तसाच्या तसा आवरणात पडून राहिला आहे. माझ्यासारखा कोणी ज्ञानी भेटला तर तो पुन्हा अनावृत्त करून देईल, म्हणेल 'घे, तू तुझे खा. मी तर निमित्त आहे!' स्वत:चे 'सामान' भोगत असेल तरी ठीक आहे, पण हा तर दुसऱ्यांकडे अपेक्षा करतो की ह्याने काही दिले तर बरे! अरे, तो देखील लोकांकडून काही अपेक्षा करत आहे, तो तुला काय देईल? आणि तुला असा कोणी नामदार दिसला आहे का की ज्याच्याकडून काही अपेक्षा करता येईल? आणि सारखे सारखे मागितले तर लाजे-काजेस्तव पाच लाख देईलही. पण तेव्हा त्याला आत मानाची भीक (हाव) असते, कीर्तीची भीक असते, नावाची लालच असते! माझे म्हणणे सौम्य नाही ना वाटत? जरा कठोरच वाटते ना?

**प्रश्नकर्ता :** सौम्य तर काही कामाचेच नसते.

**दादाश्री :** माझे म्हणणे जरा कठोर आहे, पण आत जुलाब

करवून सर्व रोग दूर करते. आत सगळा रोगच भरलेला आहे! आणि मग कुठल्या संत पुरुषाकडे गेलात तर ते सांगतील, 'या भाऊ, या शेठ, या, या.' ते मस्का मारत राहतात. अरे, त्याला कशाला मस्का मारताय्? परत उलट्या मार्गाला लावताय्! अरे, तुम्ही जर त्याला सरळ मार्ग दाखवला तर तो पुढचा काही मार्ग शोधून काढेल? पण हे तर मस्काच मारत राहतात. तुम्हाला मस्का आवडतो की नाही?

**प्रश्नकर्ता :** नाही आवडत.

**दादाश्री :** असे होय! पण लोक तर मस्का मारतातच ना की, 'भाचा आला! ये, ये!' अरे, त्यामुळे काही आपले दिवस बदलणार आहेत का? शुक्रवार जात नाही आणि शनिवार येत नाही, एवरी डे फ्रायडे! जेव्हा जाल तेव्हा फ्रायडेच. आणि शनिवार येतच नाही. आपला शुक्रवार (फायदा) तर झाला पाहिजे ना?!

## कोशिश-प्रयत्न, पंगु अवलंबन

म्हणजे 'आपण कोण आहोत?' ते जाणावे तर लागेल की नाही?

**प्रश्नकर्ता :** जाणावे लागेल.

**दादाश्री :** तुम्ही जाणता का?

**प्रश्नकर्ता :** मी ते जाणण्याचा प्रयत्न करत आहे.

**दादाश्री :** परत प्रयत्न? प्रयत्नाने तर शौचालाही होत नाही, प्रयत्न तर होऊन जातो, आपोआपच होऊन जातो, त्याचेच नाव प्रयत्न!

ही दोन चुकीची वाक्ये संसारात घुसली आहेत. म्हणेल की मी प्रयत्न करत आहे, नाही तर म्हणेल मी कोशीश करत आहे. अरे, कसली कोशीश करत आहेस? जे आपोआपच होत आहे त्यात करायचे काय असते? इथून साप जात असेल आणि त्याने ते पाहिले नसेल, पण अचानक त्याची नजर त्याच्यावर पडली की तो लगेच उडी मारून दूर पळेल ना? अशी उडी मारेल की सापाचा स्पर्शही होणार नाही, त्यावेळी प्रयत्न करत नाही ना? प्रयत्न करणेही विसरून जातो ना? त्यावेळी

आपली शक्ती काम करत नाही, अहंकारही काम करत नाही. त्यावेळी कुठलीतरी दुसरीच शक्ती काम करत असते! आणि जर स्वत:च करत असेल तर तो सापावरच पडेल, घाबरून नेमका सापावरच पडेल!

## घाबरण्याची भीती आता तरी टाळा

'फॅक्ट' (यथार्थता, वास्तविकता) जाणून घ्यायला नको का? या लौकिक गोष्टी कधीपर्यंत जाणत राहाल? अलौकिक जाणून घेतल्याशिवाय सुटका होणार नाही, भीती जाणार नाही! समजा तुम्ही आदल्या दिवशी भुताची गोष्ट ऐकली आहे किंवा पुस्तकात वाचली आहे, मग रात्री एकट्याने झोपायची वेळ आली असेल आणि शेजारच्या खोलीतून पेला खडखडण्याचा आवाज आला, जरी तो उंदराने खडखडवला असेल, तरी तेव्हा आत काय होते? 'भूत घुसले.' म्हणजे तेव्हा आतही भूत घुसते. रात्री बारा वाजल्यापासून भूत घुसले तर सकाळी सात वाजता स्वयंपाकघरात जाऊन बघेपर्यंत भीती आणि धास्ती!

इथे ऐकतो की बडोद्यावर बॉम्ब पडणार आहे, त्या अगोदरच आत धास्ती, धास्ती, धास्ती वाटत राहते. अरे, सांगणारा काय त्रिकाळज्ञानी आहे का? आणि तो बॉम्ब आपल्याला स्पर्श करणार अशी त्याची लायकी आहे का? असे आहे की आपल्या प्रतापामुळे तो बॉम्ब एक हजार मैल दूर जाऊन पडतो! आपल्या प्रतापामुळे बॉम्ब पण कंपावतो! पण हा तर चिमण्यांसारखा तडफडत राहतो! आणि जर हिशोब असेल तर निसर्गाच्या पुढे काहीही चालणार नाही. हिशोब तर चुकवावा लागेल ना? देह धारण केला आहे तेव्हापासून सगळे हिशोब चुकते करावेच लागतील ना?

## निसर्ग सतत सहाय्य करत असतो, मग भीती कशाला?

चारी बाजूला शांती असेल, भीती वाटत नसेल, तर मग काही भानगडच नाही ना? मग काही प्रश्नच नाही ना! आणि तुम्ही तर निसर्गाचे गेस्ट (पाहुणे) आहात, पण तुम्ही गेस्ट बनून काय करता? तुम्ही तुमच्या गेस्टरूममध्ये बसून राहत नाही, तर स्वयंपाक घरात जाऊन

आमटी ढवळायला जाता. पाहुण्याने स्वयंपाक घरात जाणे योग्य आहे का? फक्त तुम्हीच नाही, तर सर्व जग हेच करत असते. पाहुणा असून पाहुणा असण्याचे भानच नाही.

जर तुम्ही गेस्टसारखे राहिलात तर तुम्हाला भीती नाही, काहीच नाही, पण तुम्हाला गेस्ट बनता आले नाही. तुम्ही जिथे बसता तिथे तुम्हाला हवा-पाणी मिळते ना? की नाही? आणि आजपर्यंत खायला-प्यायला मिळाले आहे की नाही, कपडे लत्ते मिळाले नाहीत का? सर्व काही मिळाले आहे. पण फक्त भीतीमुळे क्रोध-मान-माया-लोभ यामुळे पुढचा जन्म बांधला आहे, खरे तर, या जगात भयासारखे काही नाहीच. या वर्ल्डमध्येही भयासारखे काहीच नाही. कारण निसर्गाच्या पाहुण्याला कसले भय? एखाद्या राजाचा पाहुणा असेल त्याला भय नसते, मग तुम्ही सर्व तर निसर्गाचे पाहुणे आहात. तर तुम्हाला कसली भीती? तुमच्या गरजेच्या सर्व वस्तू निसर्ग तुम्हाला सप्लाय करत असतो, किती सुंदर अवस्थेत तुम्हाला ठेवतो, तरी पण किती भीती वाटते!

हे मन उगाचच घाबरवत असते. अरे, आपला मृत्यू देखील दाखवतो, की 'मेलो तर काय होईल?' त्याला म्हणावे, 'अशी भीती का दाखवीत आहेस? लोकांचे तेरावे केले आहे ना? तसेच तुझेही तेरावे करीन', मग तो गप्प बसेल. या लोकांनी तर असे काही पाहिलेच नाही ना, म्हणून पहिल्यावर ते घाबरतात!

## घाबरण्याऐवजी स्वच्छ राहा

'लोकांना काय वाटेल?' अशी भीती वाटत राहते. तर अशा भीतीला खोली भाड्याने देण्यापेक्षा ती खोली स्वच्छ करीत राहणे हे चांगले आहे. भीतीला तर भाड्याने खोली देऊच नये. 'लोकांना काय वाटेल?' या भीतीला भाड्याने खोली का द्यावी? दिली की मग ती सोबत राहून सतत घाबरवत राहील, त्यापेक्षा तिला खोली भाड्याने देऊच नये. आपण आपली खोली स्वच्छ ठेवायची आहे.

जगावर टीका करणारा विचार आला तर त्या विचाराला शुद्ध

करून टाका, धुवून स्वच्छ करून टाका! लोक खोली धुतात ना? त्याला काय म्हणतात? पुसून घेणे म्हणतात ना? तसेच आपणही धुवून पुसून घेतले पाहिजे. सकाळी एकदा पुसून घ्यावे, दुपारी एकदा पुसून घ्यावे आणि रात्री झोपण्यापूर्वी एकदा स्वच्छ धुवून पुसून घ्यावे. आणि एरवी कधी फार वाईट विचार आले की लगेच धुवून पुसून घ्यावे. वाईट विचार तर येतीलच, कारण तसा माल भरलेला आहे, त्यामुळे येतीलच, पण आपल्याला धुवून पुसून स्वच्छ केले पाहिजे. म्हणजेच भीतीला खोली भाड्याने द्यायची नाही. शेवटी त्याचे नाव काय? तर भय! त्या दाढी नसलेल्या माणसाला रूम भाड्यांनी का बरे द्यायची?

उधळलेला घोडा असेल आणि कोणी त्याच्या पायाजवळ फटाका फोडला तर त्याची काय अवस्था होईल? अरे, गाडी देखील उलथून टाकेल. अशी या लोकांची दशा झाली आहे. म्हणूनच 'ज्ञानी पुरुष' म्हणतात ना की 'बाबा रे, तुम्ही असे नका म्हणू की साहेब मी करून घेईन.' पण तुम्ही असे म्हणा की 'साहेब, तुम्हीच करून द्या.' कारण मी जाणतो की हे तुमच्याकडून होणार नाही, कारण तुम्ही भित्रे आहात. रात्री पोस्टमन येऊन म्हणाला 'तार आहे' हे ऐकताच 'काय झाले असेल? काय असेल?' असे वाटते. अरे, त्यात काय व्हायचे आहे मोठे? पण 'तार आहे' असे ऐकताच दचकून घाबरून जातो! यात तर कधीतरी इन्कमटॅक्सचे पत्रही येऊ शकते की 'अहो, तुम्ही तुमचा रिफंड का घेऊन जात नाही?' असे पत्र पण येऊ शकते ना? पण लोक तर इन्कमटॅक्सचे पत्र पाहताच घाबरून जातात.

## ...त्यात पोस्टमनचा काय गुन्हा?

इथे तर कितीतरी प्रकारच्या चिंता, उपाधी, भीती, भीती आणि भीती आहे! चेहेरे असे (दु:खी, निराश) दिसतात की जसे काही एरंडेल तेल प्यायले आहे. 'इन्कमटॅक्सचे पत्र आहे' म्हटल्यावर इन्कमटॅक्सवाल्या व्यक्तीला पाहिल्याबरोबरच घाबरून जातो की 'आता हा कुठून आला?' तो असेच समजतो की इन्कमटॅक्सवाला आला आहे म्हणजे काही तरी भानगड घेऊनच आला असणार! पण जेव्हा पत्र उघडून पाहतो तर आत

रिफंड आलेला असतो! कारण नसताना असे कितीतरी आर्तध्यान आणि रौद्रध्यान करत राहतो. आणि मग स्वत:च बंधनात अडकतो! 'व्यवस्थित'मध्ये जे असेल ते येईल, पण त्यासाठी ध्यान का बिघडवतोस!

जो पत्र घेऊन येतो, तो सुद्धा वीतराग आहे. हा पोस्टमन जो पत्र घेऊन येतो तो विवाहाची निमंत्रण पत्रिका असेल तरी देऊन जातो आणि निधनाचे पत्र असेल तरी देऊन जातो, वीतराग आहे बिचारा! तो तर नोकरी करीत असतो, त्याला काय देणेघेणे? पण लोक त्यालाही शिव्या देतात. सर्व काही स्वत:च्याच जबाबदारीवरच करत असतात ना?

## पण एवढे भय कशासाठी?

मला स्वत:लाच असे वाटत असे की असे उधळलेल्या घोड्यासारखे का वाटत आहे! कोणाजवळ काही मालमत्ता नाही, तरीही उधळलेल्या घोड्यासारखी स्थिती होते की, 'असे होईल आणि तसे होईल, इन्कमटॅक्सवाला येईल आणि अमका येईल.' तो काय करणार आहे येऊन? उगाचच का घाबरता? ही भिंत पडली तर काय होईल? जर पडणार असेल आणि बोट एवढे चिरडले जाणार असेल, तर चिरडले जाईल. पूर्ण हातच चिरडला जाणार असेल तर पूर्ण हात चिरडला जाईल. आपण जाणत राहायचे की 'काय चिरडले गेले आणि किती चिरडले गेले!' आणखी काय करायचे? जेवढे चिरडले जाणार तेवढे आपल्याला समजेल. जेवढा हिशोब असेल तितकीच भिंत चिरडील, नाही तर भिंतीचे एवढे सामर्थ्यच नाही की ती आपल्याला स्पर्श करू शकेल! हे पडेल, अमके पडेल, हा स्लॅब पडेल, काहीही पडलेले नाही.

मी सुद्धा घाबरत असे. पण मग मी शोधून काढले की काहीही पडलेले नाही, विनाकारण मी घाबरत असे. मग मी अंबालाल भाईंना म्हटले, आतील भगवंताला नाही, तर या अंबालाल भाईंना म्हटले की 'कधी काहीही पडले नाही, मग उगाच का घाबरत राहता? आतापर्यंत घाबरलात तर काही पडले आहे का?' तर म्हणे, 'नाही, काही पडले तर नाही.' मग मी म्हटले, 'मग उगाचच का घाबरत राहता? काहीही पडणार नाही, तुम्ही स्वत:च भगवंत आहात, मग विनाकारण 'हाय, हाय! असे

होईल, तसे होईल' असे कशाला करता? तुम्हाला मुलगे नाहीत, मुलीही नाहीत, मग कशाला इतकी हाय, हाय करता? जर मुले असती तर तुमची काय दशा झाली असती? मुले नाहीत तरी इतकी हाय, हाय करता! तुम्हाला पैसेही नकोत, तुम्हाला घर नको, तुम्हाला मोटर-गाडीही नको आहे, मग कशाला इतके घाबरता की इन्कमटॅक्सवाला येईल आणि हा यईल? पडली तर ही भिंतच पडेल ना? आणखी काय होणार आहे? तेव्हा आता असे बोलू नका की, 'हे पडणार आहे.' अजिबात घाबरण्याची गरज नाही.

## 'करेक्ट'ला कसली भीती?

वीतराग झालात की भीती जाईल, नाही तर जगात भीती वाटतच राहते. सर्वांनाच भीती वाटते. समजा एखाद्याने काही नवीन सायंटिफिक शोध लावला आहे आणि रात्री आपल्या बाजूच्या खोलीत ते यंत्र ठेवून सर्व बंदोबस्त करून आला, आणि त्या यंत्रातून रात्री विचित्र आवाज यायला लागले तर आपल्याला वाटेल की भूत आले, आणि मग रात्रभर झोपच येणार नाही. एवढी भीती आणि धास्ती वाटत राहते. तर हे सर्व कुठवर चालणार?

रात्री अंधारात जात असाल आणि समोरून कोणी येत असेल तर मनात येते की हा आपल्याला लुटणार. तुमच्या मनात असे विचार येत नाहीत ना?

**प्रश्नकर्ता :** अजून तर मजल खूप दूर आहे.

**दादाश्री :** दूर आहे हे तुम्हाला कसे समजले?

**प्रश्नकर्ता :** जोपर्यंत भीती वाटते तोपर्यंत तर नक्कीच आहे ना की मजल अजून खूप दूर आहे.

**दादाश्री :** नाही, पण ती भीती कोणी काढून दिली तर? तुमची भीती कोणी घालवली आहे का? इतर कोणाकडूनही ही भीती जाणार नाही. यासाठी तर 'ज्ञानी पुरुष', की ज्यांच्या आत आत्मा प्रकट झाला आहे, जे परमात्मा प्रकट झाले आहेत, त्यांची सरळ कृपा झाली तर भीती निघून जाईल.

आम्हाला का भीती वाटत नाही? कारण आमचे सर्व अगदी करेक्ट आहे. करेक्टला कसले भय? ज्याचे सर्व अगदी करेक्ट आहे, त्याला जगात कसली भीती? भीती कोणाला वाटते की ज्याच्या आत काहीतरी गडबड आहे त्याला, नाही तर या जगात कसले भय?

दिवसभर भय, भय, भय! काय होईल कोण जाणे? काय होईल? अमक्या ठिकाणी दंगल चालू आहे! म्हणून उगाचच घाबरत राहतो. अरे, तू इथे जेवायला बसला आहेस, जेव ना आरामात! तर म्हणेल, 'नाही, पण तिथे दंगल चालू आहे ना?' म्हणजे हे लोक जे सुख आहे, प्राप्त सुख आहे, तेही भोगत नाहीत. जे सुख प्राप्त झाले आहे, ते भोगायला नको का? ते प्राप्त सुख भोगत नाहीत आणि अप्राप्ताची चिंता करीत राहतात. ही सर्व 'थिअरी'च चुकीची आहे. भगवंताने आधीच सांगितले आहे, 'प्राप्त सुख भोगा आणि अप्राप्ताची चिंता करू नका.' अप्राप्त तुमच्या हातात नाही. ते जेव्हा तुम्हाला प्राप्त होईल, तुमच्या हातात येईल, त्यावेळी त्याचा उपभोग घ्या. अप्राप्त गोष्टी आपल्या हातात नाहीत.

## बुद्धीचा उपयोग, परिणाम स्वरूप त्रासच!

**दादाश्री :** आपण आमटी बनवतो, त्यात बुद्धीचा उपयोग केला तर काय होईल?

**प्रश्नकर्ता :** आमटी बिघडून जाईल.

**दादाश्री :** का? बुद्धी देखील प्रकाशच आहे ना? म्हणजे नैसर्गिकपणे आपोआप जेवढी बुद्धी उपयोगात येते तेवढीच कामाची आहे, बाकीची जी गरजेपेक्षा जास्त बुद्धी आहे ती फार त्रास देते, आणि जर बुद्धीचा उपयोग करायचाच असेल तर सगळीकडे करा ना! लोक पाणी पितात ते काय बुद्धिपूर्वक पितात का? बुद्धिपूर्वक म्हणजे काय? या पाण्यात काही तरी पडलेले आहे की काय असा विचार करतात किंवा पाहतात का? तिथे अशा बुद्धीचा उपयोग करतात का?

**प्रश्नकर्ता :** नाही, दादा.

**दादाश्री :** मग जेवतात ते बुद्धिपूर्वक जेवत असतील ना? आमटी

शिजवताना त्यात काही पडले असेल, वरून पालीने घाण टाकली असेल, ती आत पडली असेल, असे सर्व विचार करतात का? म्हणजे बुद्धीचा उपयोग केला तर काही खाताही येणार नाही काही पिताही येणार नाही. लोक हॉटेलात जाऊनही खात असतात, तेथेही बुद्धीचा उपयोग करत नाहीत. जर बुद्धीचा उपयोग केला तर? तर मग ते खाता कसे येईल? म्हणूनच बुद्धीचा उपयोग कुठपर्यंत केला पाहिजे, याचा आपण निर्णय घेतला पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** या बुद्धीचा उपयोग कसा करावा, कुठे करावा, कुठे करू नये, हे सामान्य लोकांना असेच कळणार नाही ना?

**दादाश्री :** पण इतक्या बाबींमध्ये बुद्धीचा उपयोग करत नाहीत तर त्यांना काही नुकसान झाले आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** आणि जर बुद्धीचा उपयोग केला असता तर जास्त नुकसान झाले असते. म्हणून जिथे जिथेही बुद्धीचा उपयोग होतो तिथे तो फक्त तोट्याचाच व्यापार असतो आणि जिथे आवश्यक असते तिथे बुद्धीचा मर्यादित वापर होऊन जातो. तिथे बुद्धी आपोआप नैसर्गिक रूपातच जॉइंट झालेली असते. अंत:करणात ती सुसंगतपणे जॉइंट झालेली असते. त्यात आपण एक्सेस (गरजेपेक्षा जास्त) बुद्धीचा उपयोग करतो, त्यामुळे ही सर्व भानगड उभी राहिली आहे.

प्रभुश्रींनी कृपाळूदेवांना पत्र लिहिले होते की मला असे वाटते की आता देह सुटणार आहे, तर मला आपले दर्शन कधी होईल? तेव्हा कृपाळूदेवांनी त्यांना पत्र लिहिले की देह सुटणार आहे असे तुम्हाला कशावरून वाटते? तेव्हा ते म्हणाले 'माझे नाव लल्लुभाई आहे आणि इथे दर्शनासाठी येणाऱ्या एका व्यक्तीचे नावही लल्लुभाई आहे, ते लल्लुभाई दोन-तीन दिवसांच्या आजारानंतर मृत्यू पावले आणि मी तर एक महिन्यापासून आजारी आहे. माझी आणि त्यांची राशीही एकच आहे.' म्हणजे इथे त्यांनी बुद्धीचा उपयोग केला. म्हणून कृपाळूदेवांनी

त्यांना लिहिले की, 'मृत्यूची भीती बाळगू नका!' असे लिहिले जेणेकरून तिथे त्यांची बुद्धी ठिकाणावर राहील. कोणी तरी सांगितले किंवा मग डॉक्टरने सांगितले की 'काहीच हरकत नाही.' की मग बुद्धी ठिकाणावर राहते. तर काय डॉक्टर सांगतात ते बरोबरच असते का? ते सुद्धा अंदाजानेच सांगत असतात ना? पण जसे डॉक्टरने सांगितलेले खरे मानता तसेच तुम्ही स्वत: स्वत:लाच खरे मानू शकत नाही का? मग डॉक्टरने सांगितल्याशिवायच तू ठरवून टाक ना, 'काही अडचण नाही. मला काहीही होणार नाही.' आणि अडचण जर खरेच आली तर ती सोडणार पण नाही. मग त्रास करून घेण्याची गरजच काय? घाबरायचे कारणच काय? बऱ्याच वेळा मनुष्य शंकेनेच मरतो, शंकाच माणसाला मारते.

**प्रश्नकर्ता :** आजारी पडला तर त्यावर औषधोपचार तर करावाच लागेल ना?

**दादाश्री :** औषधोपचार करावा किंवा नाही करावा असे होय की नाही आम्ही सांगत नाही. पण आम्ही असे म्हणतो की अंत:करणात जे विचार येतील, 'व्यवस्थित' जसे करवेल तसे करावे, पण मनात शंका ठेवू नये. कुठलीही शंका ठेवू नये. औषधोपचार करावा. आत विचार आला की 'चला, डॉक्टरकडे जाऊया.' तर डॉक्टरकडे जावे. डॉक्टरांचे औषधही घ्यावे. पण डॉक्टर म्हणाले की 'तुमचे प्रेशर फार वाढले आहे.' तर त्याची नोंद आपल्या आत करू नये, ते आत लिहून ठेऊ नये. समजून चला की डॉक्टरने असे सांगितले आहे, आणि आत शंका वाटत असेल तर तुम्ही डॉक्टराला विचारा की, 'तुमच्या घरी तर कधी कोणी मरत नाही ना? तर मग मी तुमचे म्हणणे मान्य करीन.' मग डॉक्टरच म्हणेल, 'नाही, माझ्या घरीही मृत्यू झालेले आहेत!' मग शंका घेऊन काय फायदा? डॉक्टरच्या घरीही माणसे मरतातच ना? म्हणून तुम्ही साधारण रूपात डॉक्टरकडून इलाज करून घ्या, पण शंका घेऊ नका. डॉक्टर देखील काय करतात? ते बिचारे सावध करतात की फार प्रेशर आहे तर तुम्ही असे-असे वागा. तर तुम्ही त्याप्रमाणे वागावे. पण मनात शंका ठेऊ नये की माझे ब्लड प्रेशर बरेच जास्त आहे, आता काय होईल? अशा शंकेनेच लोक मरतात, जर डॉक्टर म्हणाले नसते

की 'प्रेशर आहे' तर चालत राहते, पंधरा वर्षांपर्यंत काहीच होत नाही आणि 'प्रेशर आहे' असे कळले की सर्व बिघडते. मग डिप्रेशन येते आणि मनावर सायकॉलॉजिकल इफेक्ट (मानसिक परिणाम) राहतो. डॉक्टर जे सांगतो ते तर त्याच्या आतील प्रेरणेनुसार सांगतो, तो चुकीचे सांगत नाही. त्याचे म्हणणे मान्यही करावे आणि औषधही घ्यावे, पण कुठल्याही प्रकारची शंका मनात ठेऊ नये, कारण ही सारी सत्ता काय कुणाच्या हातात आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही, अशी सत्ता कोणाच्याच हातात नाही.

**दादाश्री :** मग शंका कशाला? इथून आपण दुसऱ्या शहरात जात असू आणि कोणी सांगितले की 'हल्ली अमक्या ठिकाणी लोक लूटमार करू लागले आहेत.' मग आपण लगेच चिंता करू लागलो तर काय होईल? हे ज्ञान ऐकल्याबरोबर चिंता वाटू लागली तर काय होईल? आपल्याजवळ दहा-पंधरा हजारांचे दागिने असतील तर मग मनात शंका निर्माण होते. अजून लुटाऱ्यांना पाहिलेही नाही, अजून कोणी लुटलेही नाही, पण त्याआधीच तो लुटला जातो, घटना घडण्यापूर्वीच लुटला जातो!

## संयोगामुळे काळ चुकतो, मग कसली भीती?

आम्ही यात्रेला गेलो होतो. अडतीस लोकांना बरोबर घेऊन बसने सगळीकडे फिरलो होतो, तेव्हा एका शहरात गेलो होतो. त्या शहरात पोलिसांनी बस अडविली. आम्ही विचारले, 'का? काय आहे?' तर म्हणाले की, 'याच्या पुढे जायचे नाही.' मी विचारले 'पण कारण काय? आम्ही यात्रेवर निघालो आहोत.' तर ते म्हणाले की 'नाही, इथून पुढे जाऊ नका, कारण या रस्त्याने पुढे लूटमार होते. हा जो चाळीस मैलांचा रस्ता आहे, तिथे वारंवार लूटमार होतच असते. म्हणून रात्री जाऊ देणार नाही.' मी विचारले 'मग काय दिवसा चोऱ्या होत नाहीत?' त्यावर ते म्हणाले 'दिवसाही चोऱ्या तर होतातच.' मग मी विचारले 'मग आम्ही केव्हा जायचे? रात्री जावे की दिवसा?' मग मी पोलिसांना म्हटले, 'आम्हाला जाऊ द्या, आम्हाला काही अडचण नाही, आमच्या जबाबदारीवर जाऊ द्या.' तेव्हा पोलीस म्हणाले, 'मग तुम्ही जा, पण या दोन पोलिसांना

बरोबर घेऊन जावे लागेल.' तेव्हा मी म्हटले की 'ठीक आहे बाबा, बसवा त्यांना.' मग दोन बंदूकधारी पोलिसांना बसमध्ये बसविले. रस्ता पार केला, काहीही झाले नाही. म्हणजे कोणीही हात लावू शकत नाही. या जगात घाबरण्याचे काही कारणच नाही. ते लुटारू रात्री एक वाजेपर्यंत तिथे बसलेले असतात आणि नंतर त्यांना वाटते की 'आज काही शिकार मिळत नाही.' असे म्हणून ते तिथून निघून जातात. पाच मिनीटांपूर्वीच ते गेलेले असतात आणि आपली बस तिथून पुढे निघून जाते! ते लोक आपली बस पाहतात देखील आणि म्हणतात, 'अरे, पाच मिनीटे वाट पाहिली असती तर शिकार हातातून निसटली नसती!'

तर असे कोणाला काही करण्याची सत्ताच नाही. या दुनियेत घाबरण्याची काही गरजच नाही. तुम्ही मालकच आहात. तुम्ही स्वत:च स्वत:चे मालक आहात आणि या ज्या तुम्हाला अडचणी येतात, तो सगळा तुमचाच हिशोब आहे. तुम्ही जो गुंता निर्माण केला आहे त्याचेच हे फळ आले आहे. आपण गुंता निर्माण केलेला असेल तर त्याचे फळ येईलच ना? मग त्यात दुसऱ्या कुणाचा काय गुन्हा? म्हणून आपण ते फळ शांतपणे भोगून घ्यावे आणि परत गुंता निर्माण होणार नाही याकडे लक्ष द्यावे. तसे तर आपल्यामध्ये कोणाचीही ढवळाढवळ नाही, भगवंताचीही ढवळाढवळ नाही, खिसेकापूचीही दखल नाही. जो खिसा कापतो तो तर आपला हिशोब चुकता करून घेत आहे.

बस पुढे गेल्यावर कदाचित लुटारू भेटले तर तसा हिशोब असेल तर भेटतील, नाही तर कसे भेटतील? तरी देखील उद्धट होता कामा नये. कदाचित त्या पोलिसांनी सांगितले आणि सगळ्या महात्म्यांनीही तसेच म्हटले, तर मी एकटा असे म्हणणार नाही की, 'नाही, आत्ताच जाऊया.' मी 'सर्व एव्हिडन्स काय आहेत' ते पाहीन. जर सगळे म्हणाले की 'नाही जायचे' तर मी म्हणेन की 'हो ठीक आहे, जाणे रद्द करा.' कुठेही आग्रह धरता कामा नये.

## जिथे निरंतर भय! तिथे निर्भयक्षेत्र कोणते?

हे जग भय बाळगण्यासारखे नाही, अगदी निर्भय होऊन

फिरण्यासारखे आहे आणि जे भय बाळगतात त्यांना तर संपूर्ण जागृती असते, त्यांना हे जग निरंतर, प्रतिक्षण भयग्रस्तच वाटते. आम्हाला तर हे जग एक क्षणभर देखील निर्भयतावाले वाटत नाही, निरंतर भयावहच आहे. पण हे भय कोणासाठी? जर तुम्ही चंदुभाई आहात तर भय आहे आणि तुम्ही शुद्धात्मा झालात तर कसले भय? नाही तर क्षणोक्षणी भयवाले हे जग आहे. लोक जागृत नाहीत, म्हणून त्यांना भय वाटत नाही. लोक तर असे निवांतपणे फिरतात ना? कोणत्या आधारे ते असे बेफिकीरीने फिरतात? पण त्याचेही भान नाही! नाही तर हे जग क्षणोक्षणी भयावह आहे, निर्भयपणा असतो असा एक क्षण देखील नसतो.

**प्रश्नकर्ता :** आपण ज्या भयाबद्दल बोलत आहात, ते कसले भय आहे?

**दादाश्री :** एक क्षणही निर्भयता राहील अशी ही जागाच नाही! कधी कुठून चक्री वादळ येऊन सगळे उध्वस्त करून टाकेल याचा काही भरवसा नाही. इथून बाहेर पडले तर कधी चिरडले जाल, ते सांगता येत नाही. रात्री झोपल्यावर कोण केव्हा चावेल ते काही सांगता येत नाही. घरी आले आणि पाणी प्यायले त्या पाण्यात काय पडलेले असेल ते काही सांगता येत नाही. म्हणजेच जग प्रतिक्षण भयावह आहे, निर्भयतेने राहता येईल अशी कोणतीही जागा या जगात नाही. इथे तर अजागृतीमुळे लोक फिरतात, लग्न करतात, व्यापार करतात. अजागृती आहे म्हणून चालले आहे, जागृतीत असे चालणार नाही!

एक फार्म सुपरिंटेन्डट होते, ते मला म्हणाले, दादा या 'व्यवस्थित शक्तीला' कसे मानता येईल? अशी अंधश्रद्धा का ठेवावी? मी म्हटले 'व्यवस्थित शक्ती' म्हणजे अंधश्रद्धा नाही, खरी श्रद्धा आहे. त्यांनी 'ज्ञान' घेतले नव्हते त्यामुळे त्यांना ती अंधश्रद्धाच वाटणार ना? मग एके दिवशी मी त्यांच्या फार्मवर गेलो होतो, तेव्हा मी विचारले 'अंधश्रद्धा आणि खरी श्रद्धा याबद्दल तुम्हाला माहिती आहे का?' तेव्हा ते म्हणाले मी तर अंधश्रद्धा बाळगतच नाही! मी म्हटले की 'संपूर्ण जग अंधश्रद्धेतच जगत आहे!' त्यावर ते म्हणाले 'माझी कोणती अंधश्रद्धा आहे ते मला

दाखवा.' मी म्हटले, दाखवीन. यांना प्रत्यक्ष उदाहरण देणेच योग्य आहे. असे बुद्धीने विचार करायला सांगितले तर पटणार नाही. मग ते मला फार्ममध्ये घेऊन गेले, तिथे बाग दाखवली, फळांची बाग दाखवली. त्यानंतर पुढे सुमारे शंभर फुटांच्या परिसरात गवत उगवले होते, ते गवत ओलांडून पलीकडे जायचे होते. आता ते गवत तर दोन दोन फूट उंच झालेले होते. म्हणून त्यांनी काय केले? ते तिथे उड्या मारत मारत चालू लागले. तीन तीन, चार चार फुटाच्या उड्या मारत मारत चालू लागले. आणि मी माझ्या परीने सरळ चालत गेलो. मी कुठून एवढ्या उड्या मारू? बाहेर आल्यावर मी त्यांना म्हटले, 'तुम्ही तर खूपच अंधश्रद्धाळू व्यक्ती आहात!' त्यावर ते म्हणाले 'असे कसे? तुम्हाला कुठे अंधश्रद्धा दिसली?' मी म्हटले 'तुम्ही उड्या मारत मारत पाऊल टाकत होतात ते कशाच्या आधारावर? अरे, कुठे साप किंवा काही तरी असते तर? जिथे तुमचे पाऊल पडत होते तिथे साप नाहीच अशी खात्री तुम्हाला का वाटली?' ते म्हणाले 'अशी खात्री तर नव्हती.' तेव्हा मी म्हटले 'यालाच अंधश्रद्धा म्हणतात. मी तर माझ्या परीने रुबाबाने चाललोच ना! मला अंधश्रद्धा नाही, मला श्रद्धाच आहे. तुम्ही उड्या मारता, ती तुमची अंधश्रद्धा तुमच्या लक्षात आली की नाही? पाच फूट लांब उडी मारली पण पाऊल ठेवता ते कुठल्या आधारावर? रात्री अंधारात फार्म वरून परत येताना, लाइटशिवाय पुढे चालत राहता ते कुठल्या आधारे? कुठून तरी साप येईल, काय होईल याचा काय भरवसा?'

हे 'ज्ञान' मिळण्यापूर्वी लोकांना अनेक प्रकारच्या भयामुळे त्रास होत असतो की 'असे होईल, तसे होईल.' अरे बाबा, असेही होणार नाही आणि तसेही होणार नाही. खाऊन-पिऊन आरामात झोप ना! घरात खायचे-प्यायचे आहे ना, मग काय पाहिजे? उद्याची चिंता आज करू नकोस, आता खाऊन-पिऊन झोप आणि थोडे देवाचे नाव घे आणि जर शुद्धात्मा प्राप्त केला असेल तर 'शुद्धात्मा, शुद्धात्मा' कर!

भय बाळगण्यासारखे हे जग नाहीच आणि जिथे निरंतर भय असते असे हे जग आहे, तिथे तुम्ही कसले भय बाळगणार? जर तुम्ही तुमच्या स्वरूपात राहिलात तर तुम्हाला भय वाटणारच नाही. या देहावर

तुमची सत्ता नाही. परक्या सत्तेत आपण डोकेफोड केली तर त्याला काय अर्थ आहे?

'ज्ञान' घेण्यापूर्वी इन्कमटॅक्सचे पत्र आले आणि आत लिहिले असेल की, 'तुम्ही असे असे केले आहे, म्हणून तुम्हाला इतका इतका दंड भरावा लागेल', तर तेव्हा तुम्हाला भीती वाटते की इतका दंड करतील, इतका दंड करतील! तर हे भय दुपारी जेवण करताना तर निघून जाते ना? जेवण करताना आरामात जेवण्यासाठी काय करता? कपडे बदलून, पंखा लावून, आरामात टेबलावर बसता, तेव्हा काय त्या भयाला बाहेर ठेवता? बरोबरच ठेवता ना? म्हणजे किती तरी कसोट्यांमध्ये जीव जगत असतो! जेवण चांगले झालेले असते पण या बिचाऱ्याला चवच लागत नाही. मुले तर आरामात चवीने खातात, कारण त्यांना भीती अशी नसतेच. मुलांमध्ये बुद्धी नसते. बुद्धीच नाही मग कसला त्रास? मुले तर रडायच्या वेळी रडतात, हसायच्या वेळी हसतात, इतर काही त्रासच नाही ना त्यांना! त्यांचे तर 'वर्क व्हाइल यू वर्क, प्ले व्हाइल यू प्ले, दॅट इज द वे, टु बी हॅपी एन्ड गे.' अर्थात मुले हसायच्या वेळी हसतात, रडायच्या वेळी रडतात आणि उड्या मारायच्या वेळी उड्या मारतात! आणि हे बुद्धीवाले तर हसण्याच्या वेळी रडतात. रडण्याच्या वेळी तर रडतातच पण हसण्याच्यावेळी देखील रडल्याशिवाय राहत नाहीत, कारण मनात सतत भय वाटत असते. एखादी वस्तू आपल्या पायात घुसली तर सारखी टोचतच राहते, तसेच ते भय टोचत राहते. मी ही व्यापारी आहे, म्हणून असे पत्र आले की मी वाचून समजून जातो की, हा भयाचा सिग्नल आहे, आणि मग मी तो बाजूला ठेऊन देतो! भयाला जाणायचे असते आणि निर्भयतेलाही जाणायचे असते. या सर्व जाणण्याच्या गोष्टी आहेत, कपाटात ठेवण्यासारखी एकही गोष्ट नाही.

जंगलात लुटारू भेटले आणि त्यांनी लुटले तर रडू नये, पुढे प्रगती करण्यासाठी 'आता काय केले पाहिजे' त्याचा विचार केला पाहिजे. 'आता पुढे काय केले पाहिजे?' असा विचार केला तर देव त्याला सर्व प्रकारची मदत करतो. परंतु जर तेव्हा 'माझे काय होणार?' असे म्हणत रात्रभर रडत बसला तर? तिथे जंगलातच रडत बसला तर त्याला कोण

चहा पाजेल? त्यापेक्षा चालायला लाग ना, पुढे चहा पाजणारे भेटतील, खाऊ घालणारे भेटतील, सगळे काही मिळेल. देवाच्या घरी काही कमी नाही. लुटारू तर खूप मिळतील, असे एक नाही तर अनेक मिळतील. म्हणून लुटला गेलास तरी पुढे चालत रहा! लुटला गेल्यावर तिथे रडारड केल्याने काहीही निष्पन्न होणार नाही. सारे जग लुटले गेलेलेच आहे, लुटणारे त्यांना भेटतातच. आणि शेवटी तो हिशोबच आहे. पूर्वीच्या हिशोबाशिवाय कोणी लुटू शकत नाही. पूर्वीच्या हिशोब असल्याशिवाय कोणीही आपल्याला लुटू शकत नाही.

## क्रियेमुळे नाही तर भावामुळे बीज पडते

माणूस आता खोटे बोलताना दिसतो, पण कोणताही मनुष्य आज खोटे बोलूच शकत नाही, किंवा असा लुच्चेपणा करूच शकत नाही, चोरी करूच शकत नाही, त्याची सुरुवात आज झालेलीच नाही तर यापूर्वीच झालेली आहे. आज त्याची सुरुवात दिसणार नाही. ज्याची चोरी करण्याची सुरुवात झाली असेल, ती आज दिसत नाही. आज तर तो सावकार दिसत असतो. दिसायला नेहमी सावकार दिसतो, पण त्याच्या आत चोरीची बीजे पडत असतात. ते आपल्याला समजत नाही. पण ते जेव्हा वृक्ष रूपात उगवेल तेव्हा आपल्याला इथे दिसेल. म्हणजे जेव्हा वृक्षरूपी होईल तेव्हा लोक म्हणतील, 'हा आज चोऱ्या करतो.' पण खरोखर तर तो पूर्वीपासूनच होता.

**प्रश्नकर्ता :** या जन्मात कोणी नवीन क्रिया करू शकत नाही का?

**दादाश्री :** असे दिसायला नवीन क्रिया करू शकत नाही, पण आत नवीन क्रिया चालूच असते.

**प्रश्नकर्ता :** मी आता काही चांगले केले, सेवा केली, तर ते सर्व जुनेच आहे का?

**दादाश्री :** जुनेच आहे, नवे काही होतच नाही. नवे आत होत राहते, त्याचा तुम्हाला पत्ता नसतो. आत नवी बीजे पडत राहतात, चार्ज होत राहते, ते कळत नाही. पण जे डिस्चार्ज होत आहे तेवढेच तुम्हाला समजते.

एक व्यक्ती चांगले काम करीत असे, त्यांना पन्नास हजार धर्मासाठी दान देण्यास सांगितले. आपण इथे बसलेलो आहोत आणि त्यावेळी त्यांना असे सांगितले, तर ते म्हणाले 'मी पन्नास हजार देईन!' मग ते आपल्या घरी गेले, शेजाऱ्याने विचारले 'तुम्ही पन्नास हजाराचे दान केले?' तेव्हा ते म्हणाले, 'मी काही देणारा असा तर नाही, पण या लोकांच्या दबावाखाली मी दिले.'

म्हणजे पूर्वजन्मी दान देण्याचा भाव केला होता त्यामुळे आज दान दिले गेले, पण आज असे बीज पडत आहे की 'मी कोणाला दान देईन असा नाहीच.' म्हणजे घेईन असा मी आहे! तर त्यामुळे आता लोकांचे घेण्याचे बीज पडत आहे. म्हणजे दान देऊनही बीज मात्र उलटे पडले!

## जगात निर्भयता आहे तरी कुठे?

भीती का वाटली पाहिजे? तुला भीती वाटत नाही का?

**प्रश्नकर्ता :** नाही, अजिबात भीती वाटत नाही.

**दादाश्री :** घ्या! हा म्हणतोय् भय वाटत नाही! याला तर बायको जरा खाली गेली तरी भीती वाटते की काय होईल? आणि तरी पण मला सांगतोय की 'भीती वाटत नाही!' साप पंधरा फूट लांब असला तरी पाहिल्याबरोबर भीती वाटते, तेव्हा तर थरथर कापतो! आणि म्हणतो की 'मला भीती वाटत नाही!'

हे संपूर्ण जगच भयपूर्ण आहे! सापाची भीती, वाघाची भीती, अरे, इन्कमटॅक्सवाल्याचीही भीती वाटते, अशी भीती वाटते की नाही? मला वाटते की तू भीतीला ओळखतच नाहीस? तुला काय वाटले, मी सख्या 'भावा'बद्दल बोलत आहे?

हे तर भीतीचे संग्रहस्थान आहे. विचारवंतांना तर क्षणोक्षणी भीती दिसते. जो जागृत नाही, त्याला भीती कशी वाटेल? कोणालाही पोलिसाबद्दल प्रेम वाटत नाही, दिसल्याबरोबरच म्हणेल, 'अरे, हा कुठून

टपकला?' आणि भगवे कपडे घालून एखादा बुवा आला तर म्हणेल 'या महाराज!' पण पोलिसाला पाहिल्याबरोबर धास्ती वाटते.

संसाराचे हे स्वरूप आम्हाला लहानपणीच दिसत असे, भयंकर विक्राळपणा! प्रतिक्षण भयपूर्ण, प्रतिक्षण दु:खदायक, प्रतिक्षण उपाधी असलेले! त्यामुळे मग आम्हाला कुठेही मूर्च्छा होत नसे की कुठेही टेस्ट (स्वाद) वाटत नसे! कधी तिरडी निघेल याचा काय भरवसा? पण काय होते की जे भय भरलेले आहे तेच भय त्याला दिसते. जे भय भरलेले नाही ते दिसत नाही.

पाच जण इथून अंधारात जंगलातून जात असतील, तर एकाला अशी भीती वाटेल की, 'आता वाघ डरकाळी फोडेल, आता वाघ डरकाळी फोडेल.' दुसऱ्याला 'साप चावला तर?' अशी भीती वाटेल. तिसऱ्याला वाटेल 'लुटारू भेटले आणि त्यांनी मारले तर?' म्हणजे सर्वांची भीती वेगवेगळी असते. ज्याने ज्याप्रकारची भीती भरली असेल, त्याला त्याचीच भीती वाटते, दुसरी नाही. म्हणजे मुळात या गोष्टीत काही तथ्य नाही.

काही लोकांना तर, दिवसभर मोटारीतून फिरत असतानाही, 'माझी टक्कर होईल' असा विचारच येत नाही, कारण तसा मालच भरलेला नाही ना! आणि जर तसा माल भरलेला असेल तर ड्राइव्हर ड्राइव्हिंग करूच शकणार नाहीत, टक्कर होईलच! अर्थात जो माल भरलेला नाही, त्याचा विचारसुद्धा येत नाही. काही लोकांना तर रात्री एकांतात एकटे असले तरी भीती वाटत नाही, आणि काहींना तर रात्री एकटा असला की भूत आठवत राहते. टेक्निकली शोध (विश्लेषण) केला, तर लक्षात येते की भरलेल्या भीतीचेच विचार येतात.

हे स्त्री-पुरुष लग्न करतात, पण त्यांनी 'वैधव्य आले तर काय होईल?' असा माल भरलेला नाही, म्हणून त्यांना असा विचारच येत नाही की, 'वैधव्य आले तर काय होईल?' खरे तर एखाद्यालाच वैधव्य येते, सामान्यत: असे घडत नाही, पण शेवटी तर वैधव्य आहेच ना!

पण तशी भीती वाटतच नाही ना! लग्नाच्या वेळी तर थाटमाट असतो आणि मंडप वगैरे सर्व असतो, पण तो मंडप रोज रोज नसतो. तो तर ज्या दिवशी लग्न होते त्यादिवसापुरताच असतो आणि तोसुद्धा भाड्याने आणलेला असतो ना! ही मुले बाहुला-बाहुलीचे लग्न लावत नाहीत का? प्रसादही वाटतात. असे असूनही हे 'इल्युजन' नाही आणि घालवून घालवता येईल असेही नाही.

तुला भीती वाटते का? वाघ आला तर? ते तर निमित्त भेटल्याशिवाय कळणार नाही ना? त्याचे असे आहे की वर्तमान भीती तर वाटतेच. जर भीतीचे परमाणू नसते तर या रस्त्यावरील गाई-म्हशी उठल्या नसत्या आणि कुठलेही व्यवहार चालले नसते आणि रस्ताही चालला नसता, हॉर्न वाजवत राहिले तरी गाई उठल्या नसत्या, बसूनच राहिल्या असत्या. पण जनावरांमध्ये ती भयसंज्ञा असते, आणि म्हणूनच लहान पिल्लू असले तरी ते गाडी पाहून लगेच उठून निघून जाते, भयसंज्ञा त्याला उठविते!

भीतीची गरज आहे की नाही? जर या गाई-म्हशी रस्त्यातून उठणारच नाहीत आणि म्हणतील, 'जा, तुम्हाला जे करायचे ते करा.' ही पाखरेही उडणार नाहीत. पण नाही, गाई-म्हशी भीतीमुळे रस्त्यातून उठून जातात. म्हणजेच हे जग भीतीमुळेच चालले आहे, या माणसांना सुद्धा भीतीची आवश्यकता आहे. 'ज्ञानी पुरुषां'ना जे भेटतात आणि 'ज्ञानी पुरुषां'ना वाटले की याला भीतीची आवश्यकता नाही तर ते भीती काढून टाकतात आणि मग त्यांना पास करतात, तसे तर हे आता 'फेल' (नापास) झालेले आहेत. ज्यांना भीती वाटते ते 'फेल' झालेले आहेत. भीती गेली तरच काम होईल, त्याशिवाय तर चालणारच नाही ना!



# [ 7 ]
# कढापा-अजंपा

## 'पेला' करवितो कढापा-अजंपा

मोक्षाचा मार्ग इतका सरळ नसतो. पण इथे तर हा सरळ मार्ग मोकळा झाला आहे, तर आपले (मोक्षाचे) काम करून घ्यायचे आहे. सरळ मार्ग आणि तोही चिंतारहित! तसे तर *कढापा-अजंपा* सर्वांनाच होत असतो. सत्तर वर्षांचा मनुष्य देखील जर काचेचे दोन पेले फुटले आणि त्याचा आवाज ऐकला की म्हणेल, 'अरे, हे काय फुटले?' दोन पेल्यात जणू काही आत्मा फुटला की काय असे वाटते आणि सर्व जग असेच तर करते ना? पण 'यात कोण फोडतो?' हे जाणत नसल्यामुळे 'नोकरानेच फोडला' असे म्हणतो. अरे, नोकर कशाला फोडेल? नोकर काही आपला शत्रू नाही. खरे तर नोकराचा गुन्हा नाही, पण तरी हे लोक असेच म्हणतात ना की 'नोकरच फोडतात.' बरेच दिवस असेच चालले की मग एक दिवस नोकर चाकू मारून निघून जातो. मग लोक आरडाओरडा करतात की 'हल्ली तर नोकर मारून टाकतात.' मारेल नाही तर काय? तुम्ही त्याला रोज मारत असता, मग एक दिवस तो तुम्हाला पूर्णच मारून टाकतो! म्हणजे 'नोकराबरोबर कसे वागले पाहिजे' हे समजायला नको का?

नोकराच्या हातून पेले पडले आणि फुटले तर आपण त्याला म्हटले पाहिजे, 'बाबा, गरमागरम चहा तुझ्या पायावर पडला, तुला

भाजले तर नाही ना?' तर त्याला किती बरे वाटेल? त्याच्या घरचेसुद्धा देणार नाही असे आश्वासन जर तुम्ही त्याला दिले तर त्या नोकराला किती बरे वाटेल? नोकर पण आत्माच आहे ना? पण दिवसभर शेठाणी कटकट करीत राहते आणि मग एक दिवस शेठाणीला चाकू मारून नोकर निघून जातो. तुमच्या घरी कधी पेले फुटले होते की नाही? मग *कढापा-अजंपा* होतो ना?

## कढापा-अजंपा बंद झाल्यावर परमात्मा पद

ज्याचा *कढापा-अजंपा* बंद झाला असेल त्या माणसाला काय म्हणतात? त्याला परमात्मा म्हणतात. कारण लोक म्हणतात की *कढापा-अजंपा* याशिवाय माणूस राहूच शकत नाही. कोणाला पेले फुटल्यावर *कढापा-अजंपा* होतो तर कुणाला पेन हरवल्यामुळे *कढापा-अजंपा* होतो. कुणाला त्याच्या ड्राइव्हरने गाडी खराब करून टाकल्यामुळे *कढापा-अजंपा* होतो. कशा ना कशामुळे तरी *कढापा-अजंपा* होतच राहतो. एखाद्याला त्याचे डायनिंग टेबल कोणी खराब केले तर *कढापा-अजंपा* होतो. तो मग दिवसभर *कढापा-अजंपाच* करत राहतो. आणि ज्याचा *कढापा-अजंपा* गेला त्याला जग परमात्माच म्हणते!

## कढापा आणि अजंपा, यात फरक काय?

तुम्ही ह्या दोघांना ओळखता की एकालाच ओळखता?

**प्रश्नकर्ता :** दोघांनाही ओळखतो.

**दादाश्री :** असे होय! तर या दोघांतील मोठा भाऊ कोण आहे?

**प्रश्नकर्ता :** *कढापा* हाच मोठा आहे.

**दादाश्री :** हो, *कढापा* मोठा आहे आणि भोळा आहे, आणि *अजंपा* तर छोटा आहे आणि कपटी आहे. म्हणून जर कोणी *कढापा* करत असेल तर लोक पण म्हणतील की 'अरे, दोन पेले फुटले तर एवढा *कढापा* का करतोस?' घरची माणसे देखील म्हणतील की 'फुटले तर फुटले! तुम्ही जरा स्वस्थ बसा ना! जरा शांत राहा ना!' *कढापा*

भोळा आहे ना, म्हणून लोकांना समजते पण *अजंपा* तर आत होत असतो. काही शेठ तर अब्रू जाऊ नये म्हणून *कढापा* करत नाहीत. पण आतील *अजंपा* कपटी आणि छोटा असतो आणि त्यामुळे पुढील जन्मासाठी क्रमवार हिशोब बांधले जातात, म्हणजे हा *अजंपा* सगळ्या सह्या करवून घेतो. ज्याला *कढापा* होतो त्याला आत *अजंपा* तर असतोच, परंतु जर फक्त *अजंपा* असेल तर त्यात जास्त धोका असतो. आणि जेव्हा *कढापा* आणि *अजंपा* दोन्ही एकत्र असतात, तेव्हा *कढापाचा* वाटा मोठा असतो, आणि *अजंपाचा* वाटा कमी असतो. पण हे शेठ लोक *कढापा* करत नाहीत तर फक्त *अजंपाच* करतात. शेठनां वाटते की ह्या सर्वांना माझा कमकुवतपणा कळेल, म्हणून शेठ लोक बाहेरून कढापा करत नाहीत पण आतल्या आत *अजंपा* करत राहतात की, 'ह्याने एवढे महागडे पेले फोडून टाकले, आता तर हे सगळे (पाहुणे) बसले आहेत, पण ते गेल्यावर नोकराला दोन फटके मारीन. याला तर आता काढूनच टाकीन असे आतल्या आत बडबडत राहतात. म्हणजे ज्याचा *कढापा* आणि *अजंपा* निघून जातो त्याला तर परमात्माच म्हणावे लागेल. आता इतके मोठे पद का बरे दिले असेल? कारण कुठलाच मनुष्य *कढापा-अजंपाशिवाय* राहूच शकत नाही. म्हणून *कढापा-अजंपा* एवढेच शब्द ज्याच्यातून निघून गेले, त्याला परमात्मा म्हटले जाते. तो परमात्मा आपला थर्मामीटर आहे.

## कढापा-अजंपा याचा आधार?

**प्रश्नकर्ता :** समजा *कढापा-अजंपा* निघून गेला, तर काय तो परत येतो?

**दादाश्री :** परत येत नाही. तुम्हाला परत आणायचा आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** *कढापा-अजंपा* करणे लोकांना आवडत असेल का? मनात तर समजून असतात की 'आता काय करणार? त्या बिचाऱ्या नोकराकडून फुटले आणि मला *कढापा-अजंपा* झाला, हे सर्व चुकीचे

होत आहे, असे व्हायला नको.' म्हणजे मनात तर पश्चात्तापही करत असतो, सर्व काही करतो, पण पुन्हा जेव्हा असे घडते तेव्हा परत तसाच वागतो. कारण त्याच्याजवळ ज्ञान प्रकाश नाही ना! घोर अंधकार आहे. अंधारात तर जावयाशी टक्कर झाली तरी म्हणेल की 'लुटारूशी टक्कर झाली.' आणि लुटारूशी टक्कर झाली तर म्हणेल, 'जावयाशी टक्कर झाली' म्हणजे हे असे आहे!

**प्रश्नकर्ता :** *कढापा-अजंपा* याचा आधार तर अज्ञानच आहे ना?

**दादाश्री :** अज्ञानच. अंधारामुळेच. तो लुटारूला जावई समजतो, हे अज्ञान नाही तर दुसरे काय आहे? अंधारात लुटारूशी टक्कर झाली तर म्हणेल 'माझे जावई आलेले दिसतात', याच प्रकारे हा ही अंधारात घेतलेला निर्णय म्हणावा लागेल. अंधारात कोणाला कसे कळेल की हा लुटारूच आहे की जावईच आहे? अंधारात जावयाला म्हणतील ह्या लुटारूशी टक्कर झाली. असे उलटे-सुलटे होते. आणि हे सर्व चुकीचे आहे हे काय लोकांना समजत नाही? सर्व काही समजते? पण आत अंधार असेल तर काय करणार?

## किंमत पेल्यांची की रागावण्याची?

मोठे मिलमालक सुद्धा, नोकर दहा कप-बश्या घेऊन येत असताना त्याच्या हातून ट्रे पडला, तरी त्याचा आत्माच फुटतो. अरे, चार चार मिलस्चा मालक असूनही तू कसा आहेस? असा कसा आहेस की या कप-बश्यातच तुझा आत्मा सामावला? चार मिलस्चा मालक, तर काय तू गरीब आहेस?

## रागवावे, पण कोणत्या हेतूने?

ज्ञानी पुरुष तर काय म्हणतात? प्रथम तर त्याला विचारतील की 'बाबा, तुला कुठे भाजले तर नाही ना? मग म्हणतील की 'जरा सावकाश चाललास तर बरे होईल.' म्हणजे ज्ञानी तर सर्व काही सांगतात, पण वीतरागपणे, अनुभव ज्ञानी कितीही सांगोत, काहीही करोत, तरी पण ते वीतरागतेत राहतात. कदाचित तोंडावर रागावतीलही, पण तरीही ते

वीतरागतेत राहतात. रागावणे वगैरे सर्व वेळेच्या आधीन असते. कारण तसे केले नाही तर ती व्यक्ती कुठल्या तरी वेगळ्याच, उलट मार्गाला लागण्याची शक्यता असते. म्हणून दोन्ही जबाबदाऱ्या सांभाळाव्या लागतात. समोरची व्यक्ती आपल्यामुळे उलट रस्त्याने जाता कामा नये आणि कामही होत राहायला हवे.

## नोकर पेले फोडतो का?

हे तर दिवसभर *कढापा-अजंपा, कढापा-अजंपा,* एक पेला फुटला तरी, बोंबाबोंब आणि कलह करतात! आपण या मुलाला विचारले की, 'बाळा, हा पेला फुटला तर तू काहीच का बोलत नाहीस?' तर तो म्हणेल, 'मला काय?' म्हणजे त्याला तर ज्ञानीच म्हणावे लागेल, अज्ञानी-ज्ञानी! का? तर हे लोक नोकराला रागवत आहेत, हे काय त्या मुलाला समजत नाही? तो बघत राहतो की 'हे लोक का रागावतात?' हा नोकर तर चांगला आहे, मग या बिचाऱ्याला हे लोक का रागावतात? एखादा लहान मुलगा देखील मुद्दाम पेले फोडणार नाही. लहान मुलांना सांगितले की, 'जा बाळा, हा काचेचा पेला बाहेर फेकून दे', तर तो फेकणार नाही. मी बडोद्याला जातो ना, तेव्हा बऱ्याचदा मी मुलाला सांगतो की, 'हे दादाचे बूट आहेत ना, ते बाहेर फेकून दे.' तेव्हा ते खांदे उडवितो. कारण त्यालाही समजते की हे फेकायचे नसतात. जर एवढा लहान मुलगा देखील (मुद्दाम) फोडत नाही, तर एवढा मोठा नोकर कसा काय फोडेल? तरी पण शेठाणी सतत रागावत असते म्हणून नोकर मनात समजून जातो की 'ही कर्कशा आहे', आणि आपल्या बरोबरच्या दुसऱ्या नोकरांनाही सांगतो की, 'माझी शेठाणी तर कर्कशा आहे!'

## ... आणि मग नोकराचे अभिप्राय कसे!

आमचे एक भागीदार होते, ते खूप कडक स्वभावाचे होते. तेव्हा मी त्यांना म्हटले की, तुमच्या नोकरांना जरा विचारा तर खरे की 'बाबा, आज मी तुम्हाला शिक्षा करणार नाही, नुकसान करणार नाही, पण अगदी मनापासून मला सांगा की माझ्या मागे माझे काय उपनाम ठेवले

आहे?' तर नोकरांनी वेगवेगळी नावे सांगितली. कोणी नीच म्हटले, कुणी लबाड म्हटले, सर्वांनी आपण ठेवलेली नावे सांगितली. तेव्हा मी म्हटले, 'बघा तरी, तुमच्या मागे तुम्हाला काय काय नावे ठेवली आहेत!' लोक तर अशी नावे ठेवतात आणि शेठाणीचे नावही ठेवलेले असते की ही तर कर्कशा आहे.

## पर्याय पाहून निघालेली वाणी

इतका लहान मुलगा सुद्धा जाणूनबुजून पेले फोडत नाही. आपण सांगितले 'फोड', तरीही फोडणार नाही. पण त्याच्या हातून फुटला तर तो चिंता-बिंता करत नाही. त्याचे आई-बाप जर कडक असतील तर मात्र ते आता मला रागावतील असे वाटून रडतो.

**प्रश्नकर्ता :** आपल्याला हे सर्व माहीत आहे?

**दादाश्री :** असे आहे की, या ज्ञानात आम्हाला सर्व काही दिसते. सर्व पर्याय आम्हाला समजतात. प्रत्येक पौद्‌गलिक पर्याय आम्हाला सूक्ष्म रूपात दिसतात, म्हणून आम्ही तुम्हाला उत्तर देऊ शकतो.

## नोकर तर निमित्त, हिशोब स्वतःचाच

पेले फुटले तरी *कढापा* होतो. नोकराला शिव्या देतो, तुझे हात तुटले आहेत की काय? परंतु जर त्यावेळी असा विचार केला की, 'मी याच्या जागी असतो तर माझी काय दशा झाली असती? मला किती दुःख होईल?' असा विचार कोणी करतो का? नोकराला वाटत असते की 'हे शेठ मला विनाकारण रागावतात. माझा काही गुन्हा नाही. मी तर नोकर आहे आणि नोकरी करीत आहे. म्हणून मला रागावतात.' त्याला बिचाऱ्याला असे वाटते. अर्थात अशा चुकीच्या समजुतीमुळे श्रीमंत लोक गरीबांना दुःख देतात. नाहीतर, कुठलाही नोकर (मुद्दाम) पेले फोडेल का? आणि जर नोकर पेले फोडत असता तर तो रोजच फोडेल ना? जेव्हा त्याला पेले सांभाळणे जमत नाही तेव्हाच फुटतात ना? या जगात कोणीही काहीही फोडत नसतो, हा सर्व तर तुमचाच हिशोब चुकता होत असतो. त्यात नोकर तर बिचारा निमित्त बनत असतो. पण

नोकराच्या हातून पेले फुटले तर शेठाणी आरडाओरडा करते आणि जर शेठ तिथे बसलेले असतील तर तेही चिडतात. अरे, एक भागीदार चिडला तर चिडू दे ना! सर्व भागीदारांना चिडण्याची काय गरज आहे? कंपनीतील एक भागीदार चिडला तरी खूप झाले! एकाचेच बिगुल वाजू दे ना! सगळ्यांचे बिगुल एकाच वेळी कशाला वाजवायचे? पण सगळे कशाला वाजवतात? इच्छा नसली तरी वाजले जाते! कारण अज्ञान त्यांना तसे करण्यासाठी भाग पाडते ना! आणि सगळे बिगुल एकदमच वाजायला लागले की नोकराला कापरे भरते! जेव्हा सगळे त्याला घेरतात तेव्हा तिथली लहान मुलगी देखील किंचाळते की 'अरे, या मूर्खाला तर फटके द्यायला हवेत.' मग तेव्हा नोकराची काय दशा होईल?

## तर आता नोकराशी कसे वागावे?

मोक्षाला जायचे नसले तरी, निदान इथे तरी शांती असली पाहिजे ना? आत *अंजपा* होणार नाही, एवढे तरी समजले पाहिजे ना? पेले फुटले आणि त्यामुळे *कढापा-अजंपा* केला तर ती आपलीच चूक आहे ना? की पेल्यांची?

**प्रश्नकर्ता :** हो, ती आपलीच चूक आहे.

**दादाश्री :** म्हणजे शेठ एकटेच *अजंपा* करत नाहीत, तर शेठाणीसुद्धा *अजंपा* करत राहते. शेठ एकटेच *अजंपा* करत आहेत तर त्यात तुम्ही का भागीदारी करता? पण त्यातही भागीदारी! त्यात पण दोघे भागीदार! मग तो नोकर बिचारा एकटाच अडकतो. आता मी काय म्हणतो की 'जर तुम्ही त्या नोकराच्या जागी असाल तर तुमचा न्याय कसा असेल? मग तुम्ही त्या नोकराला शिव्या दिल्या तो घोर अपराध नाही का? इंडियन फिलॉसॉफी काय अशी असेल? खरे तर आपण एवढे नोबल असले पाहिजे की... समजा आम्ही तिथे असू आणि जर नोकराच्या हातातून ट्रे पडली आणि कप फुटले, तर आधी आम्ही नोकराला विचारू की, 'तुला भाजले तर नाही ना? कप फुटले तरी ठीक आहे, दुसरे कप आणता येतील पण तुला भाजले नाही ना?' म्हणजे प्रथम असे विचारले पाहिजे, कारण खूप भाजले असेल आणि

आपण काही बोललो तर ते चुकीचे होईल. आणि जर भाजले नसेल तर म्हणावे, 'बाबा, जरा हळूहळू, सावकाश चाललास तर असा त्रास होणार नाही.' असेही म्हणावे लागते, जर तसे म्हटले नाही तर तोसुद्धा गुन्हा आहे, कारण सावध करण्यासाठी अशी चेतावणी द्यावी लागते. पण ती अशी नाही की 'तुझे हात मोडले आहेत का? तू असा आहेस, तसा आहेस.' असे बोलू नये. याला तर चेतावणी म्हणताच येणार नाही, ती तर हिंसा म्हटली जाईल. नोकराला बिचाऱ्याला असेच वाटत असते की आता मला म्हणतील की 'काय तुझे हात मोडले आहेत का?' त्यामुळे तो आतून घाबरलेला असतो की 'आता काय म्हणतील? शेठ-शेठाणी आता काय म्हणतील?' तो नोकर मनातून समजून असतो की हे शेठ-शेठाणी दोघेही चित्त्यासारखे आहेत. जसे चित्ता गरजतो तसे हे पण गरजतील. तो आतून असा घाबरलेला असतो. म्हणून त्या शेठना मी समजावतो की, 'शेठ, तुम्ही त्याच्या जागी असता तर काय झाले असते? जरा असा विचार तर करून पाहा ना. तसे तर तुम्ही पुण्यशाली आहात, त्यामुळे तुम्ही त्याच्या जागी जाणार नाही. पण तुम्ही तुमच्या बॉसच्या तावडीत अशाच प्रकारे सापडाल. म्हणून सावध राहा.' तू ज्याचा बॉस आहेस त्यावर तेवढीच पॉवर वापर की जेवढी तुझा बॉस तुझ्यावर वापरील, त्यावेळी तुला कसोटीची वेळ येऊ नये! बॉस तर सगळ्यांचे असतातच ना! माझ्यासारखा कुणी असेल, त्याला बॉस नसतो. पण बाकी सर्वांना तर बॉस असणारच ना! ज्याला अंडरहँड (नोकर, हाताखलची माणसे) असण्याची आवड आहे किंवा ज्याला असे वाटते की, 'माझ्या हाताखाली एखादा तरी असला पाहिजे, त्याला पण बॉस तर असतोच.' आम्हाला अंडरहँडचा शौक नाही म्हणून आमचा कोणी बॉस पण नाही.

याला कुठल्याप्रकारचा अन्याय म्हणावे? तर घोर अन्याय केला असे म्हणावे लागेल! असे तर भयंकर दोष केले आहेत. स्वत:ला कळतही नाही की, माझ्याकडून हा दोष झाला आहे. नोकराशी असे वागल्यानंतर हा दोष झाला आहे ते कळतच नाही. उलट 'नोकराचेच चुकले आहे, त्याला काढून टाकले पाहिजे.' असे म्हणतो आणि म्हणून

त्यांना या सर्व अडचणी येतात. म्हणूनच मोक्ष मिळत नाही. नाही तर जर मोक्षाचा न्याय समजून घेतला ना, तर नक्कीच मोक्ष मिळेल, असे आहे. सांसारिक न्याय हा न्याय नाही. भगवंताचा न्याय हा न्याय आहे.

भगवंताचा न्याय काय आहे? जितके देहधारी जीव आहेत. मग ती झाडे असोत किंवा इतर कोणीही असोत, पण ते जिवंत आहेत. जिवंत आहेत, हे कसे कळेल? तर ते झाड कापले की त्याचे लावण्य निघून जाते. म्हणजे जितके लावण्यवान जीव आहेत, त्यांच्या आत भगवंत बसले आहेत, म्हणून जर त्यांना किंचितमात्र दु:ख झाले तर त्याला अन्याय म्हणावे लागेल.

## साधनांचे प्रमाण किती असले पाहिजे?

अहमदाबादमधील शेठजींच्या दोन मिल्स आहेत, तरी त्याच्या बेचैनीचे तर येथे वर्णनच करता येणार नाही, एवढी बेचैनी आहे. दोन-दोन मिल्स आहेत पण ते कधी फेल होतील सांगता येत नाही. तसे तर शाळेत चांगल्या मार्कांनी पास होत होते, पण इथे कधी फेल होतील सांगता येणार नाही, कारण त्यांनी 'बेस्ट फूलिशनेस' सुरू केला आहे. 'डिसऑनेस्टी इज दी बेस्ट फूलिशनेस' (अप्रामाणिकता ही सर्वोत्तम मूर्खता आहे). या फूलिशनेसची काही तरी हद्द असेलच ना? की 'बेस्ट'पर्यंत पोहोचायचेच आहे? तर आज ते बेस्ट फूलिशनेसपर्यंत पोहोचले आहेत! आणि आपल्या इथे जे मोठे मोठे बंगले असतात, त्या बंगल्यातील स्वच्छता आपण पाहतो ना? तशीच ही मोठी मोठी घरे असतात. ती किती तरी मजल्यांची, आणि जसजसे वर जावे, तशतशी स्वच्छता वाढत जाते आणि जसजशी स्वच्छता वाढते तसतसा जळफळाट वाढत जातो. मग त्या जळफळाटावर इलाज म्हणून ब्रँडी किंवा इतर काही उपाय करतात? मग काय स्वच्छता ॲडमिट करू नये? नाही, स्वच्छता इतक्या प्रमाणात ॲडमिट करावी की जरी मळली तरी आपल्याला चिंता होणार नाही. मुलाने स्वच्छता बिघडवली तरी त्याच्यावर रागवायला लागणार नाही. हे मला म्हणाले, 'हा जुना सोफासेट बदलून टाकूया का?' त्यांना मी म्हटले, 'नाही, त्याला राहू द्या ना!' कारण लहान

मुलाने त्यावर ब्लेडने चीर पाडली तरी आपल्याला वाईट वाटणार नाही. उलट त्याला म्हणावे घे, आणखी एक चीर पाड. म्हणजे आपण निर्धास्त राहू. आपण साधने अशी ठेवावी की त्या साधनांमुळे आपल्याला भीती वाटणार नाही, अन्यथा कृपाळूदेवांनी जसे गायले आहे तसे होईल की,

*'सहु साधन बंधन थयां, रह्यो न कोई उपाय,*
*सत् साधन समज्यो नहीं, त्यां बंधन शुं जाय?'*

अर्थात ही साधनेच बंधनरूप झालेली आहेत. तरी पण अशी काही साधने असतात की जी आवश्यक असतात. ती साधने असू द्यावीत. कारण ती असणे गरजेचे आहे, पण त्याचे प्रमाण आपल्याला माहीत असले पाहिजे. बंगला किती मोठा असावा याला काही लिमिट असेल की नाही? आपल्याकडे पाच अरब रुपये आहेत, पण बंगला किती मोठा बांधला पाहिजे त्याची काही लिमिट असावी की अनलिमिटेड असावे? कोणाचा अनलिमिटेड बंगला पाहिला आहे का तुम्ही? नाही. असेल, कोणाचा तरी असेलच ना? लिमिटेड कोणाचा नसतो ना! हॉटेलही अनलिमिटेड नसते, त्याचीही लिमिट ठेवलेली असते, पण बंगले मात्र लिमिटेड होत नाहीत. माझे म्हणणे असे आहे की यात तुम्ही का अनलिमिटेड होता? कारण नंतर तेच तुमच्या त्रासाला कारणीभूत होते. मुलांनी जरासे बिघडवले की त्याच्यावर चिडत राहतो आणि त्याला मारत राहतो!

## कढापा-अजंपा यांची नावड, ही सुद्धा जागृती!

मोठमोठ्या शेठजींना मी विचारतो की 'शेठ तुम्ही ह्या महागड्या नवीन कप-बश्या आणल्या आहेत आणि नोकर त्यात चहा घेऊन येत असेल, ट्रेमध्ये सहा कप आणि सहा बश्या घेऊन येत असेल. आणि नोकराच्या हातून तो ट्रे पडला तर तुमच्यावर काही परिणाम होईल का?' तर म्हणतात की, 'अरे होईल ना, फार परिणाम होईल, फार *अजंपा* होईल.' मग मी विचारले 'तर तुम्ही त्या *अजंपावर* काही औषध चोपडत नाही का?' तेव्हा ते म्हणाले 'त्यावर तर काही औषध नसते ना!' मी

म्हणालो, 'मग तुम्ही कशाच्या आधारावर जगता? काही आधारच नाही? जीवन जगण्यासाठी काही आधार तर हवा की नको?' तुमचे कप फुटले तर तुम्ही काय कराल?

**प्रश्नकर्ता :** मला काहीच होणार नाही.

**दादाश्री :** काय बोलताय? तशी तर पंच्याऐंशी वर्षांची उधारी झालीच आहे, आता आणखी पंधरा वर्षे येतील, आणि मग शंभर पूरे होतील!

**प्रश्नकर्ता :** होऊ देत, नंतर 'हा' पेलाही फुटणारच आहे ना?

**दादाश्री :** असे होय! देहाला पेला म्हणताय्? मग ठीक आहे! याला ज्ञान म्हणतात! आणि ते शेठ लोक तर म्हणतील 'यावर औषधच नाही!' अरे बाबा, मग तुझी काय अवस्था होईल? तुम्हाला पुन्हा अजंपा झाला तर बरे वाटेल?

**प्रश्नकर्ता :** नाही वाटणार.

**दादाश्री :** लोक मला म्हणतात, 'तुम्ही जिज्ञासू का होत नाही?' अरे! मला जिज्ञासू बनून काय करायचे आहे? ज्याला हा अजंपा आवडत नाही तेच जिज्ञासू पद आहे. जिज्ञासू तर ते लोक बनतात की ज्यांना *अजंपा* आवडतो. मला *अजंपा* आवडत नाही, तर मग मी जिज्ञासू का बनावे? *अजंपा* आवडत नसणे हीच गोष्ट त्यांना मोक्षाला घेऊन जाईल. कोणी म्हणेल, लोकांनाही *अजंपा* तर आवडत नाही ना? नाही, त्यांना जर विचारले तर म्हणतील 'ते सर्व तर हवेच ना, हेही हवे आणि तेही हवे.' म्हणजे हे चुकीचे होत आहे असे त्यांना वाटतच नाही.

**प्रश्नकर्ता :** *अजंपा* मोक्षाला कसे घेऊन जातो? जर कोणाला *अजंपा* होत नसेल तर?

**दादाश्री :** *अजंपा* होत नसेल तर त्यात असे सुख आहे आणि *अजंपा* होत असेल तर त्यात असे दु:ख आहे, असे ज्ञान त्याला सतत वर्तत (जाणवत) असते, त्यामुळे त्याला अशी जागृती येते की, *अजंपा*

होता कामा नये. 'हे चुकीचे आहे.' ही जी जागृती आहे तीच त्याला मोक्षाला घेऊन जाईल. माणसाला *अजंपा* कसा सहन होईल? खरे तर *अजंपा* आवडत नाही, तरी लोक काय म्हणतात की, पण संसारात तर असेच असते ना! जर असेच असेल तर जगण्याला अर्थच काय आहे? ते मिनिंगलेस आहे. आणि *अजंपा* सोबत तू कसले सुख भोगले आहेस? वर तलवारी लटकत आहेत आणि त्या पडतील अशी भीती आहे, मग तू जेवलास कसा? जनक राजाने एका मुनीला भोजन दिले, त्यावेळी वरती एक मोठी घंटा बांधली होती, ते तपस्वी मुनी भोळे होते, त्यामुळे (जेवल्यानंतर) जेव्हा राजाने त्याला विचारले की, 'भजी कशी होती? श्रीखंड कसे होते?' तेव्हा त्या भोळ्या मुनीने सरळ सांगितले की, 'मी तर वरून घंटा पडेल या भीतीतच होतो. मी खात होतो पण माझे चित्त तर त्या घंटेवरच होते, त्यामुळे चव कशी होती हे मला कळलेच नाही!' राजाने विचारले 'पण तुम्ही खाल्ले तर आहे ना?' तेव्हा मुनीने उत्तर दिले 'हो खाल्ले तर आहे.' मग राजाने विचारले, 'ते चवीपूर्वक खाल्ले ना?' तर म्हणतो 'नाही, मला ते समजले नाही.' तेव्हा राजा म्हणाला 'इतके चविष्ट होते तरी तुम्हाला त्याची चव कळली नाही, कारण तुमचे चित्त घंटेवर होते. तसेच आम्ही या राण्यांच्या गळ्यात हात घालून असतो, तरीही आमचे चित्त भगवंतांमध्ये असते!'

## 'परका' 'जाणला' तर समता राहते

हे सर्व नीट समजून घेतले तर याचे निराकरण होईल अन्यथा निराकरण होणार नाही. आणि कॉजेस आणि इफेक्ट, इफेक्ट आणि कॉजेस, कॉजेस आणि इफेक्ट असे चालतच राहील. आणि अजंपा काही रोजच होत नाही, तसे तर कोणा शेजाऱ्याच्या घरातून पेला फुटल्याचा आवाज आला तर काही आपत्ती नाही पण आपल्या खोलीतून पेला फुटल्याचा आवाज आला तर मात्र त्रास होतो ना? कशाकरिता? काय कारण असेल त्याचे?

**प्रश्नकर्ता :** आपल्या वस्तूबद्दलचा मोह आहे, आणि शेजाऱ्या घरचे सामान आपले वाटत नाही.

**दादाश्री :** असे आहे, हा मोह नाही, ही ममता आहे की 'माझे नुकसान झाले, दहा-पंधरा रुपयांचे पेले फुटले!' आणि हेच शेजाऱ्याकडे झाले तर वाटते, त्याचे गेले मला काय? आणि स्वत:च्या घरात पेले फुटले तर मात्र त्याचा लगेच परिणाम होतो. आता स्वत:च्या घरात काचेचे पेले फुटले असूनही ते शेजाऱ्याच्या घरात फुटले असे वाटेल तर तो भगवंत होईल! पण लोक तर खूप पक्के आहेत ना! शेजाऱ्याच्या घरी पेले फुटले तर स्वत:वर त्याचा परिणाम होऊ देत नाहीत आणि स्वत:च्या घरी फुटले तरच त्याचा परिणाम होऊ देतात असे हे पक्के आहेत. पण त्यामुळे ते मूर्ख ठरतात! या जगात जे पक्के समजले जातात तेच भगवंताच्या दारी मूर्ख ठरतात. या दुनियेत ज्यांना भोळे म्हणतात, त्यांना भगवंताच्या दारी खरे समजले जाते! आणि इथे जे पक्के आहेत, ते भगवंतांच्या दारी मारले गेलेच म्हणून समजा! मी असे म्हणतो ते ऐकायला आवडते ना! की तुमचा वेळ वाया जातो?

## समज नसल्यामुळे दोन प्रकारे नुकसान!

**प्रश्नकर्ता :** नाही, नाही. या सर्व गोष्टी तर समजण्यासारख्या आहेत.

**दादाश्री :** म्हणजे ही जी ममता आहे, तीच सर्व भानगड करविते. आणि मग तो हिशोबही करतो की किती पेले आणले होते? आधी किती फुटले? आज किती फुटले! मग त्याचा रिफंड (परतावा) त्याला लगेच मिळणार आहे का? का बरे! चिंता केली, त्रास करून घेतला तर त्याचे फळ मिळणार नाही का? पेले फुटल्यावर तुम्ही चिंता करता तर काय त्या पुरुषार्थाचे फळ मिळणार नाही? त्याचे फळ मिळेल, जनावर गतीत जायला मिळेल, म्हणजे एक तर पेले फुटले, शिवाय जनावर गतीत जाण्याची तयारी केली. अर्थात तो एका नुकसानात दोन नुकसान सोसतो. या दुनियेत एका नुकसानात दोन नुकसान कोण सोसत नसेल?

**प्रश्नकर्ता :** समज नसेल तर एका नुकसानात दोन नुकसान सोसावेच लागेल ना!

**दादाश्री :** हो, म्हणजे पेले पण गेले आणि चिंता करण्याचा पुरुषार्थ केला तोही वाया गेला.

## पेले फुटले, तरीही पुण्य बांधले!

कोणी म्हणेल की, 'मला तर ज्ञान मिळाले नाही, समकित झाले नाही, तर मी काय करावे? मला आणखी नुकसान करून घ्यायचे नाही!' तर मी त्यांना सांगेन की 'एक मंत्र शिका की, जेव्हा पेले फुटतील तेव्हा तुम्ही बोला, 'बरे झाले, सुटले जंजाळ! आता नवीन पेले आणूया.' तर त्यामुळे पुण्य बांधले जाईल. कारण चिंता करण्याऐवजी त्याने आनंद व्यक्त केला, म्हणून पुण्य बांधले जाते. एवढे जरी जमले तरी खूप झाले. आम्हाला लहानपणापासूनच अशी समज होती, कधीच चिंता केली नाही, काही घडले की लगेच असे काही आतून येतच असे. हे असे शिकवल्याने असे येत नाही पण तरी लगेचच उत्तर मिळून जात असे.

## नीट समजून घेतल्याने समाधी राहते

म्हणजे जर उपाधीतही समाधी राहत असेल, तर त्याला 'ज्ञानी पुरुषां'चे सांगणे समजले आहे, असे म्हणता येईल. जेव्हा उपाधी नसेल, तेव्हा तर कुत्र्यालासुद्धा समाधी वाटते. तो पुऱ्या खाऊन झोपून जातो तर रात्रभर समाधीदशाच असते ना! ज्याला उपाधीतही समाधी राहते, त्याला माणूस म्हणतात. *कढापा-अजंपा* लोकांना दुःखदायक नाही का?

**प्रश्नकर्ता :** पण ते दुःख मानले तर दुःख होईल.

**दादाश्री :** नाही, पण जसे मानावे तसे होत नसते ना! दुःख मानले तर दुःख आहे, हे तर सर्वांनाच माहीत आहे, परंतु जगात सर्व जण असे मानतील तर कोणी दुःख मानणारच नाही ना! काही जण दुःख आहे असे मानायला तयारच होत नाहीत, तरी दुःखे काही संपत नाहीत ना!



# [ 8 ]
# सावध हो जीवा, अंतिम क्षणी!

## पुढील जन्माचे गाठोडे बांध ना!

एक ऐंशी वर्षांचे काका होते, त्यांना हॉस्पिटलमध्ये ठेवले होते. मला कल्पना होती की हे दोन-तीन दिवसात जाणार आहेत, तरी देखील मला म्हणाले, 'ते मगनभाई तर मला भेटायलाही आले नाहीत.' मी म्हटले, 'मगनभाई तर आले होते!' तर म्हणाले 'त्या नगीनदासचे काय?' म्हणजे बिछान्यात पडल्या पडल्या नोंद करत होते की कोण कोण भेटायला आले. अरे, तुझ्या तब्येतीची काळजी घे ना, आता दोन-तीन दिवसांनी जायचे आहे. आधी तू स्वत:चे गाठोडे सांभाळ, इथून घेऊन जाण्याचे तुझे गाठोडे तर गोळा कर. नगीनदास नाही आले तर काय करायचे आहे? पण तरी ते काका नोंद करत राहतात की, 'मला भेटायला कोण कोण आले होते?' अरे, तुला भेटायला आले त्याचा तुला काय फायदा? ते तुला भेटल्यावर बाहेर येऊन काय म्हणतात? की 'आता हे काका तर निघाले, दोन दिवसांचे पाहुणे आहेत!' म्हणजे 'हे तर आता निघाले' असा आशीर्वाद देऊन जातात लोक! भेटायला आलेले लोक असे म्हणतात. अरे, मग तुला भेटायला आले यात तुझा काय फायदा झाला? त्यापेक्षा नाही आलेलेच बरे ना, निदान असे आशीर्वाद तरी देणार नाहीत. भेटायला येणारे बाहेर आल्यावर म्हणतात की, 'आता दिव्यातील तेल तर संपले आहे आणि फक्त वात जळत आहे.' पण काका तर म्हणतात 'ते नगीनभाई भेटायला आले नाहीत!' जगाबद्दल

वासना किती आहे, पाहा! आता जर ही ममता सुटली तर सुटका होईल. पण जोपर्यंत ममता सुटत नाही तोपर्यंत पेला फुटताच कान टवकारले जातात, अरे, अर्ध्या झोपेत असेल तरीही विचारेल, 'काय फुटले आत?' तसे तर चार दिवसानंतर जाणार असतात तरीही आज कुरबुर करतात! अरे, आता जायची वेळ आली आहे, तर तुझे गाठोडे-बिस्तरे तरी बांध! जाताना तुझ्याकडे वाटखर्च नको का? पण एवढी समज असती तर अशी कुरबुर केलीच नसती ना! समज नसल्यामुळेच तर सतत या जंजाळात अडकून राहतात.

जेव्हा कोणी आजारी पडतो तेव्हा लोक त्याला भेटायला येतात. एक तर या देहाला आजार झाला आहे, त्याच्या वेदना होत असतात आणि लोक येऊन प्रश्न विचारतात, त्यामुळे तर जास्तच त्रास होतो. काही लोकांना मात्र सगळे भेटायला आल्यावरच संतोष होतो. ते तर उलट असे म्हणतात की 'नवनीतभाई तर मला भेटायला आलेच नाहीत.' म्हणजे कित्येकांना सगळे भेटायला आल्यावरच संतोष होतो ते लोक वेगळे आहेत, आणि कित्येकांना कोणी भेटायला आले तर ओझे वाटते ते लोक वेगळे आहेत. आम्हाला असे वाटते की कोणाला त्रास होऊ नये म्हणून कोणाला कळवूच नये; याउलट लोक तर मृत्यूशय्येवर पडलेले असले तरी, 'नगीनभाई मला भेटायला आले नाहीत' याची नोंद ठेवतात. कारण अहंकार आहे ना! आत्मा आणि अहंकार दोन्ही वेगळ्या गोष्टी आहेत. अहंकार हा रॉंग बिलीफमधून उत्पन्न झाला आहे. स्वत:च्या स्वरूपाचे भान नसल्यामुळे 'मी हा आहे, मी हा आहे.' असा फक्त 'इफेक्ट'च आहे. आता हा उत्पन्न झालेला अहंकार, तो कसा सुटू शकेल? जायची वेळ आली तरी म्हणेल, 'अमके भाऊ मला भेटायला आले नाहीत.' त्याची नोंद ठेवतात. आता यातून कसे बाहेर पडावे? आणि जे भेटायला येतात ते बाहेर आल्यावर काय म्हणतात, 'हे तर आता एक-दोन दिवसाचे पाहुणे आहेत.' खरे तर त्यांच्या आत्म्याला पाहण्यातच फायदा आहे, बाकी सर्व वेडेपणा पाहण्यासारखा नाही. वेडेपणात ते काय बोलतील ते सांगता येणार नाही. अशावेळी तर फक्त हे लोक (महात्मा) प्रार्थना करतात. बाहेरचे लोक काय प्रार्थना करतात

का? बाहेरचे लोक तर 'आता वय झाले आहे, आता काही खरे नाही' असे म्हणतात. म्हणजेच ते असेही म्हणतात आणि तसेही म्हणतात, पण यात त्यांचा काय दोष? जगाचा व्यवहारच आहे ना! ते तर काहीही म्हणू शकतात.

**प्रश्नकर्ता :** अंत:काळी मनुष्याच्या मनात काय काय विचार येतात? काय काय दिसते?

**दादाश्री :** मरताना तो पूर्ण जीवनाचे सार (ताळेबंद) पाहतो, वह्या वाचत नाही. वह्या म्हणजे वहीखाते वाचत नाही, आणि रोजचा हिशोबही वाचत नाही. ते सर्व वाचण्यात तर फार वेळ जाईल आणि इथे तर एका तासातच सर्व पूर्ण करायचे असते. सार, आयुष्यभराचे सार तो पाहतो आणि त्या सारानुसार त्याला पुढला जन्म मिळतो.

जर आयुष्यभरात भक्तीचे सार जास्त असेल, सत्संगाचे सार जास्त असेल, ते सार जर मोठे असेल तर शेवटच्या तासात चित्त जास्तीत जास्त त्यातच राहील. विषयांचे सार जास्त असेल तर मरताना त्याचे चित्त विषयातच राहील. कोणाला मुली-मुलांचा मोह असेल तर शेवटच्या वेळी त्याचे चित्त त्यांच्यातच राहील.

एका शेठच्या मृत्यूची वेळ जवळ आली, ते खूप श्रीमंत होते, मुले देखील 4-5 होती. त्यांनी सांगितले, 'बाबा, आता नवकार मंत्र म्हणा.' तेव्हा शेठ म्हणाले, 'हे सर्व बेअक्कलच आहेत. अरे, काय बोलावे हे काय मला माहीत नाही? मी स्वत:च बोलेन. तुम्ही मला परत परत का सांगत आहात?' तेव्हा मुलांनाही समजले की वडीलांचे चित्त आता दुसरीकडे कुठेतरी भटकत आहे. मग सर्व मुलांनी सार काढले की कुठे भटकत आहे? आम्हाला पैशांचे दु:ख नाही आणि काही अडचणही नाही, पण तीन मुलींची लग्ने झाली होती आणि एक धाकटी मुलगी बिनलग्नाची राहिली होती. म्हणून शेठचे चित्त सतत लहान मुलीतच होते की माझ्या या मुलीचे लग्न करायचे राहिले आहे, तर आता हिचे काय होईल? मुलांना हे समजले म्हणून धाकट्या बहिणीला बाबांकडे पाठविले, ती म्हणाली, 'बाबा, माझी काळजी करू

नका, तुम्ही आता नवकार मंत्र बोला.' तेव्हा वडील तिला तर काही म्हणाले नाहीत, पण त्यांच्या मनात आले की, 'ही तर अजून लहान आहे, हिला काय समजते?' अरे, जायची वेळ आली आता तरी सरळ वाग ना! आता एक-दोन तासात जायचे आहे, मग मुलगी जसे सांगते तसे कर ना! नवकार मंत्र म्हणायला लाग ना! पण काय होणार? नवकार कसे म्हणणार? कारण त्याची कर्मे त्याला सरळ राहू देत नाहीत. त्यावेळी त्याची कर्मे त्याला घेरतात.

म्हणून आता जे जे काही करत आहोत, ते सर्व मृत्यूच्या वेळी एक *गुंठाणुं* (48 मिनिटे)पर्यंत समोर येऊन उभे राहील, आपोआपच येऊन उभे राहील. आयुष्यभरात जे जे काही केले आहे त्याचे सार (ताळेबंद) त्यावेळी येऊन पुढे हजर होईल. आत्ता जे हजर आहे, तेच मृत्यूसमयी हजर असेल. आत्ता संसार हजर असेल तर मृत्यूसमयीही संसार हजर असेल; आत्ता शुद्धात्मा हजर असेल तर मृत्यूसमयीही शुद्धात्मा हजर असेल. म्हणजे मृत्यूसमयी पूर्ण जीवनाचे फळ येते, काहीही करावे लागत नाही. आपल्याला स्वत:ला काही आठवावे लागत नाही, आपोआपच त्याचा परिणाम येईल. जसे आता परीक्षा देतो, आणि मग रिझल्ट येतो ना? तसे आहे.

मनुष्य जीवनाची किंमत कधी कळते? शेवटच्या तासात. तेव्हा 'हे राहून गेले, हे करावे, ते राहून गेले.' असे वाटत राहते, तेव्हा समजते की मनुष्य जन्म फार किमती आहे.

## अंत:काळी स्वजनांची देखभाल

**प्रश्नकर्ता :** एखाद्या स्वजनाचा अंत:काळ जवळ आला असेल, तर त्याच्याशी जवळच्या नातेवाइकांचे वागणे कसे असले पाहिजे?

**दादाश्री :** ज्यांचा अंत:काळ जवळ आला असेल, त्यांना तर खूप सांभाळले पाहिजे. त्यांचे सर्व म्हणणे ऐकायला पाहिजे. त्यांना नाराज करू नये. सर्वांनी त्यांना खुश ठेवले पाहिजे, ते जरी उलट बोलले तरी तुम्ही ते मान्य केले पाहिजे, 'तुमचे बरोबर आहे' असे म्हटले पाहिजे.

ते म्हणाले 'दूध द्या' तर लगेच दूध आणून दिले पाहिजे. ते म्हणतील, हे तर पाण्यासारखे दूध आहे, दुसरे आणा.' तर लगेच दुसरे दूध गरम करून दिले पाहिजे आणि सांगितले पाहिजे, 'हे चांगले आणि शुद्ध आहे!' म्हणजे त्यांना आवडेल असेच केले पाहिजे, असेच सर्व बोलले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे त्यात चूक-बरोबर करायच्या भानगडीत पडूच नये?

**दादाश्री :** चूक-बरोबर असे काही दुनियेत नसतेच. त्यांना आवडले की झाले, त्यानुसार सर्व काही करायला पाहिजे. त्यांना आवडेल अशा प्रकारे सर्व व्यवहार केला पाहिजे. लहान मुलाशी आपण कसे वागतो? मुलाने काचेचा पेला फोडला तर आपण त्याला रागावतो का? दोन वर्षाचा मुलगा असेल तर 'तू का फोडलास' असे आपण त्याला विचारतो का? म्हणजेच जसे लहान मुलाशी वागतो तसेच त्यांच्याशीही वागले पाहिजे.

लोक तर मेल्यावर त्याच्यावर फुले वाहतात. अरे, मेल्यावर काय फुले वाहता? ते जिवंत असताना फुले वाहा ना! कारण आत भगवंत आहे, आत आत्मा विराजमान आहे. पण जिवंत असताना तर कोणी फुले वाहत नाहीत ना? यालाच दूषमकाळ म्हणतात! हिताहिताचे भान, म्हणजे स्वत:चे हित कशात आहे आणि अहित कशात आहे, याचे भान माणूस घालवतो, त्याला म्हणतात दूषमकाळ!

## गती-परिणाम कसे?

**प्रश्नकर्ता :** हार्ट फेल झाले तर, तो तर वरती पोहोचतो, पण जरा शांतीपूर्वक वर जाण्यासाठी काही मार्ग आहे का?

**दादाश्री :** हे सगळे पोहोचतात, ते कुणाच्या घरी जात असतील?

**प्रश्नकर्ता :** कुठे जातात ते कोणाला माहीत? पण शांतीपूर्वक गेले पाहिजे.

**दादाश्री :** असे आहे की इथे मरताना दु:ख असेल तर तिथे

जन्म घेतल्यानंतर एक तासही दुःखरहित जाणार नाही. मरताना तो दुःखी होता, आणि नंतर मेला म्हणजे त्याचे दुःख संपले असे नाही, दुःख तर तो सोबतच घेऊन गेला. देहाचे दुःख गेले, कारण देह सुटला, पण त्यामुळे काही सुटका होत नाही, सतत भटकत राहावे लागते.

## अरे! मृत्यूच होत आहे

लोक तर आरडाओरडा करतात. अरे, कर्म बदलत आहे, तू कशाला ओरडत आहेस? बदलते कोण? तर कर्मे बदलतात. द्रव्य-क्षेत्र-काळ-भाव सर्वकाही बदलतच राहते, त्यात स्वतः ओरडत बसतो की, 'हे माझे होते, आणि माझे हे गेले, हे राहून गेले', कारण नसताना आरडाओरडा करतो! हे जग सतत बदलत असते. या शरीरात, बाहेर सगळीकडे, व्यापारात आणि इतरत्र सगळीकडे सतत बदल होतच राहणार. हे शरीर देखील प्रतिक्षण मरत आहे, पण लोकांना हे माहीत आहे का? लोक तर जेव्हा लाकडाचे दोन तुकडे होऊन खाली पडतात तेव्हा म्हणतात की, 'कापले गेले.' अरे, हे कापलेच जात होते. याच्यावर करवत चालूच होती. करवत लावल्यापासूनच आपण म्हणतो ना की, या लाकडाचे दोन तुकडे होत आहेत? तसेच जन्मापासूनच ही करवत चालत आली आहे, जन्मानंतर जेव्हा मृत्यू होतो, तेव्हा दोन तुकडे वेगळे होतात. गर्भात करवत चालत नाही, पण जन्म झाल्यावर करवत चालणे सुरू होते. मग डॉक्टर सांगतात, 'हे गेले' (मृत्यू पावले). तेव्हा मग आपण म्हणावे की आता 'दोन तुकडे वेगळे झाले.' जोपर्यंत ते तुकडे वेगळे होत नाहीत, तोपर्यंत तर काहीच नाही. आणि दोन तुकडे वेगळे झाले की म्हणतात, 'तुटले'. अहो, पण तो तर कापलाच जात होता. तसेच या लोकांच्या बाबतीतसुद्धा हे सर्व कापलेच जात आहे. तरी पण कोणाला कसली भीती वाटत आहे का? पण जेव्हा तुकडे वेगळे होतील तेव्हा भीती वाटेल!

## स्मशानापर्यंतची साथ

ही उशी आहे ना, तर तिचे अभ्रे बदलत राहतात, पण उशी तशीची तशीच राहते. अभ्रे फाटून जातात आणि बदलत राहतात, तसेच हा अभ्रासुद्धा बदलत राहतो.

**प्रश्नकर्ता :** तर मग दीर्घ आयुष्याची अपेक्षा कशासाठी ठेवत असतील?

**दादाश्री :** तीच तर भ्रांती आहे ना!

**प्रश्नकर्ता :** तर मग घरचे लोक आपल्याला म्हणतात ना की हे भाऊ खूप 'सिरियस' आहेत, आपण जरा विधी करा, ती देखील भ्रांतीच आहे ना?

**दादाश्री :** ती देखील भ्रांतीच आहे, पण असे आहे की काही गोष्टी व्यवहारासाठी कराव्या लागतात आणि तसे केले नाही तर ते भाऊ घरातल्या सर्वांना काय म्हणतील, 'तुम्ही माझ्यासाठी काहीच केले नाही. तुम्हाला माझी काही पर्वाच नाही.' असे तसे काही तरी बोलतील. म्हणून असे विधी वगैरे करावे लागतात.

नाही तरी हे जग पोलम्पोल आहे. तरी पण व्यवहारिकपणे बोलले नाही तर त्याला दुःख होईल, पण त्याच्याबरोबर स्मशानात जाऊन चितेत कोणीही उडी घेत नाही. घरचे सगळेच परत येतात. सगळे समजूतदार आहेत, त्याची आई देखील रडत रडत परत घरी येते.

**प्रश्नकर्ता :** मग त्याच्या नावाने छाती बडवते की मागे काहीही ठेवून गेले नाहीत, आणि जर दोन लाख ठेऊन गेले असतील तर काहीच बोलत नाही.

**दादाश्री :** हो, बरोबर आहे. हे तर काही ठेवून गेले नाहीत म्हणून रडत आहेत. 'मरून गेला आणि मारून गेला' असेही मनात बोलत राहतात! 'काही ठेवून गेले नाहीत आणि आम्हाला अडचणीत टाकले!' आता तो काही ठेवून गेला नाही, त्यात त्याच्या पत्नीचे नशीब वाईट होते म्हणून ठेवले नाही, पण त्या मृत व्यक्तीच्या नशिबात शिव्या खाणे लिहिलेले होते त्यामुळे हे ऐकावे लागते. मोठमोठ्या शिव्या देते! मग लोकही येऊन विचारतात की, 'तुमचे पती काही ठेवून नाही गेले?' तेव्हा म्हणते 'नाही, नाही सर्व काही ठेवून गेले आहेत, तसे खाण्यापिण्याचे

सर्व काही आहे.' म्हणजे सर्वांच्या समोर असे बोलते आणि मनात वेगळेच बोलत असते! या मागचे कारण काय आहे?

लोक जेव्हा मृतकाबरोबर स्मशानात जातात ते परत येत नाहीत का? ते सर्व परत येतातच ना? म्हणजे ही एक प्रकारची फजितीच आहे! रडले नाही तरी दुःख आणि रडले तरी दुःख! फार रडले तर लोक म्हणतात की, 'इतरांकडे कोणी मरत नाही का की तुम्ही इतके रडत आहात? चक्रम आहात की काय?' आणि रडले नाही तर म्हणतात 'तुम्ही तर दगडासारखे आहात, दगडाचे काळीज आहे तुमचे!' म्हणजे नक्की काय करावे तेच कळत नाही. म्हणजेच सर्व काही पद्धतशीर असायला हवे, असे म्हणतात.

तिथे स्मशानात जाळतीलही आणि नंतर जवळच्या हॉटेलमध्ये बसून चहा-नाश्ताही करतील. नाश्ता करतात ना लोक?

**प्रश्नकर्ता :** अरे! नाश्ता सोबतच घेऊन जातात!

**दादाश्री :** असे होय! काय सांगता? म्हणजे असे आहे हे जग! या जगाबरोबर मेळ कसा बसणार?

## ...असे काही कर

कबीर साहेबांनी सांगितले आहे की, 'जेव्हा तुझा जन्म झाला तेव्हा तू रडत होतास आणि लोक हसत होते.' त्यावेळी सगळ्यांना आनंद होतो, पेढे आणतात, लोकांना पेढे वाटतात आणि सर्व पेढे खातात! बरोबर सांगतात ना कबीर साहेब? कारण तू जेव्हा रडत होतास तेव्हा कुणी असे म्हणाले नाही की, 'हा मुलगा बिचारा रडत आहे, तर थोड्यावेळासाठी हे सर्व राहू द्या.' मग कबीर साहेब आणखी काय म्हणतात, 'आता जगात येऊन असे काही कर की मरताना तू हसत असशील आणि बाकीचे लोक रडत असतील!' तर हे कसे शक्य होईल?

**प्रश्नकर्ता :** चांगली कर्मे केली असतील तर असे होईल.

**दादाश्री :** हो, लोकांसाठी खूप चांगली कर्मे केली असतील तर लोकांच्या मनात असे येईल की, 'अरेरे! यांच्या आधारानेच तर आम्ही जगत होतो, आनंद उपभोगत होतो.' म्हणून मग लोक रडतात. ज्यांचा आधार जातो ते रडतात आणि जाणाऱ्याला कळते की मी संतोषपूर्वक जीवन व्यतीत केले आहे. त्यांना अपार संतोष वाटत असतो, म्हणून हसत हसत जातात!

## कल्पांताची जोखीम किती?

**प्रश्नकर्ता :** तुम्ही 'व्यवस्थित शक्ती' बद्दल बोललात, तर 'व्यवस्थित' ही कोणती शक्ती आहे?

**दादाश्री :** ते 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स' आहे. त्याला आपण 'व्यवस्थित शक्ती' म्हणतो. आणि ती निरंतर जगाला 'व्यवस्थित'च ठेवते, अव्यवस्थित होऊच देत नाही. एकुलता एक मुलगा मृत्यू पावला, तरीही ते 'व्यवस्थित'च्या हिशोबानेच होत असते. पण हा तर स्वतःच्या लोभापायी, स्वार्थापायी रडतो. आणि म्हणून त्याला अव्यवस्थित मानतो. खिसा कापला जातो तेसुद्धा 'व्यवस्थित'च आहे. पण मग स्वार्थामुळे, लोभामुळे आरडाओरडा करत राहतो. नाही तर रडण्यामुळे कोणी परत येतो का? जास्त रडल्यावर मुलगा परत येईल ना? का बरे? सहा महिने रडत राहिला तरी?

**प्रश्नकर्ता :** तरीही येणार नाही.

**दादाश्री :** तरीही लोक कल्पांत करताना दिसतात ना? याला कल्पांत असे का म्हणत असावेत? 'कल्पा'च्या (कालचक्राच्या) शेवटपर्यंत भटकतील. एकदा असा कल्पांत केला की 'कल्पा'च्या अंतापर्यंत भटकावे लागेल, एका पूर्ण 'कल्पा'च्या अंतापर्यंत भटकावे लागेल!

## लौकिक, 'शोर्ट'मध्ये पूरे करा

वृद्ध काका आजारी असतील आणि तुम्ही डॉक्टरला बोलावले, सर्व इलाज केले, पण तरीही वारले. नंतर जे शोक प्रदर्शित करणारे

असतात ते आश्वासन देण्यासाठी येतात. आणि विचारतात 'काय झाले होते काकांना?' तेव्हा तुम्ही सांगता 'खरे तर मलेरियासारखे वाटत होते पण नंतर डॉक्टर म्हणाले की हे तर जरा फ्लूसारखे आहे.' त्यावर ते विचारतात 'कुठल्या डॉक्टरला बोलावले होते?' तुम्ही म्हणता 'अमक्या डॉक्टरला.' तर ते म्हणतील, 'तुम्हाला अक्कल नाही का? ह्या नाही, त्या डॉक्टरला बोलवायला पाहिजे होते.' मग दुसरा कोणी येऊन तुम्हाला रागावतो, अरे, असे करायला हवे होते ना! अशी मूर्खासारखी गोष्ट करायची असते का? म्हणजे लोक कसे वेड्यासारखे बोलतात! दिवसभर तुम्हाला रागवतच राहतात! लोक उलट तुम्हालाच दोष देत बसतात, तुमच्या भाबडेपणाचा फायदा घेतात. म्हणून मी तुम्हाला समजावितो की दुसऱ्या दिवशी लोक विचारायला आले तर तेव्हा त्यांना तुम्ही सांगावे की, 'भाऊ, काकांना थोडा ताप आला होता आणि त्यातच ते टप्प झाले (अचानक गेले), आणखी काहीच झाले नव्हते.' तर मग लोक पुढे विचारणे बंद करतील. तुम्ही काही तरी समजदारीपूर्वक बोलाल तर सर्व ठीक होईल, नाही तर जर तुम्ही सर्व सविस्तर सांगत बसलात तर लोक तुम्हाला गोंधळवून टाकतील आणि तुम्हाला सतावतील. त्यापेक्षा 'ताप आला आणि टप्प' इतकेच म्हणालात की विषय संपला!

## ...खुदाची अशीच इच्छा

**प्रश्नकर्ता :** एखादे मूल जन्मल्याबरोबरच मृत होते, तर काय त्याचे तेवढेच देणेघेणे होते?

**दादाश्री :** आई-वडिलांबरोबर राग-द्वेषाचा त्याचा जेवढा हिशोब होता तो पूर्ण झाला की मग तो आई-वडिलांना रडवून निघून जातो, खूप रडवतो, डोके फोडून घ्यायला लावतो, डॉक्टरांकडून औषधोपचार करवून पैसेही खर्च करायला लावतो, सर्व काही करायला लावून मुलगा निघून जातो!

या आपल्या बडोद्यात शुक्करवारी आहे, हे तुम्हाला माहीत आहे ना? तर या शुक्करवारीत (शुक्रवारचा बाजार) लोक म्हैस खरेदी करतात. म्हशीला विविध प्रकारे नीट तपासून विकत घेऊन येतात. सर्व

दलालांनाही विचारतात, 'कशी वाटत आहे?' तेव्हा सर्व दलाल म्हणतात, 'फार छान आहे.' मग तो घरी येऊन म्हशीला बांधतो. आणि तीन दिवसात ती म्हैस मरते. अरे, असे का झाले? तिने तर त्या मालकाला पैसे मिळवून दिले आणि नंतर मेली, नाही तर त्याच्याकडेच मेली नसती का? असे घडते ना? हे सर्व हिशोब चुकते करायचे असतात. बाळ जन्माला येऊन लगेच मरून जाते, सर्वांना रडवून जाते. तेव्हा मग सर्वांना असे वाटते की, त्यापेक्षा ते जन्माला आलेच नसते तर बरे झाले असते.

आणखी जे काही विचारायचे असेल तर विचारा. अल्लाजवळ पोहोचण्यात काही अडचण असेल तर आम्हाला विचारा, आम्ही तुमची अडचण दूर करू.

**प्रश्नकर्ता :** माझ्या मुलाचे अपघातात निधन झाले, तर त्या दुर्घटनेचे कारण काय असेल?

**दादाश्री :** या जगात जे काही डोळ्यांनी दिसते, कानाने ऐकायला येते ते सर्व 'रिलेटिव्ह करेक्ट' आहे, ही अगदी खरी गोष्ट नाही. हे शरीरही आपले नाही, तर मुलगा आपला कसा असू शकतो? हे तर व्यवहाराने, लोकव्यवहाराने आपला मुलगा असे मानले जाते. खरोखर तर तो आपला मुलगा नसतो. खरे तर हा देहही आपला नाही. म्हणजे जे आपल्याजवळ राहते तेवढेच आपले आणि बाकीचे सर्वच परके असते. म्हणून जर मुलाला स्वत:चा मुलगा मानत राहिलात तर त्रास होईल, आणि अशांती वाटेल! तो मुलगा तर आता गेला, खुदाची अशीच इच्छा होती, तर आता त्याला 'लेट गो' करा.

**प्रश्नकर्ता :** ते तर बरोबर आहे, अल्लाची ठेव आमच्याकडे होती, ती त्याने परत घेतली!

**दादाश्री :** हो, बस. ही सारी बाग अल्लाची आहे.

**प्रश्नकर्ता :** त्याचा मृत्यू अशा प्रकारे झाला, तर काय ते आमची कुकर्मे असतील?

**दादाश्री :** हो, मुलाचीही कुकर्मे व तुमचीही कुकर्मे. चांगली कर्मे असतील तर त्याचे फळ चांगले मिळते.

**प्रश्नकर्ता :** आम्ही आमचा दोष शोधू शकतो का? कुठल्या प्रकारची कुकर्मे झाली होती ते शोधू शकतो का?

**दादाश्री :** हो, ते सर्व कळू शकते. त्यासाठी सत्संगात बसावे लागेल.

ही अल्लाची बाग आहे. तुम्हीही अल्लाच्या बागेत आहात आणि मुलगाही अल्लाच्या बागेत आहे. अल्लाच्या मर्जीनुसार सर्व चालत राहते, त्यात संतुष्ट राहायचे आहे. अल्लाह ज्यात खुश त्यात आपणही खुश! बस खुश व्हायचे आहे!

**प्रश्नकर्ता :** मग तर काही प्रश्नच उरत नाही.

**दादाश्री :** अल्ला काय सांगतात की, 'तुम्ही चालविणारे असाल तर तुम्ही चिंता करा, पण चालवायचे तर मला आहे, तर मग तुम्ही का चिंता करता? चिंता करत आहात म्हणून तुम्ही अल्लाचे गुन्हेगार बनत आहात.'

**प्रश्नकर्ता :** म्हणजे अल्लाच्या अल्लाहीत आपण हस्तक्षेप करता कामा नये, असे म्हणायचे आहे का?

**दादाश्री :** हस्तक्षेप तर नाहीच पण चिंताही करू नये. आपण चिंता केली तर अल्ला नाराज होतात.

**प्रश्नकर्ता :** परंतु जे प्रश्न पडतात त्यांची उत्तरे तर मिळाली पाहिजेत ना?

**दादाश्री :** जो प्रश्न पडतो, त्याचे उत्तर एवढेच आहे की अल्ला म्हणतात, 'हे तर माझे आहे, मग तू कशाला चिंता करतोस?' चिंता करू नये. आपण त्यांची सेवा करावी, औषधोपचार करावा, शेवटपर्यंत त्यासाठी प्रयत्न करावेत. आपल्याला प्रयत्न करण्याचा अधिकार आहे, चिंता करण्याचा अधिकार नाही.

## मृतस्वजनांशी जोडा आंतरिक तार

मुलाच्या मृत्युनंतर त्याची चिंता करण्याने त्याला दु:ख होते. लोक अज्ञानतेमुळे असे सर्व करतात, म्हणून तुम्हाला 'जसे आहे तसे' जाणून शांतीपूर्वक राहिले पाहिजे. उगाचच उपद्व्याप करण्यात काय अर्थ आहे? एकही घर असे नसते की जिथे कधी मुलाचा मृत्यू झाला नसेल. हे तर संसाराचे ऋणानुबंध आहेत, देण्या-घेण्याचा हिशोब आहे. आम्हाला सुद्धा मुलगा-मुलगी होते, पण तेही वारले. पाहुणे आले होते, ते निघून गेले. ते आपले सामान नव्हतेच. आणि आपल्यालाही जायचे नाही का? आपल्यालाही जायचेच आहे. मग हा काय गोंधळ आहे? त्यापेक्षा जे जिवंत आहेत त्यांना शांती द्या, गेले ते गेले, त्यांची आठवणही काढू नका. जे इथे जिवंत आहेत, आश्रित आहेत, त्यांना शांती द्या. एवढेच आपले कर्तव्य आहे. इथे तर जे गेलेत त्यांची आठवण काढतात आणि जे इथे आहेत त्यांना शांती देऊ शकत नाहीत, असे कसे? अशाने तर तुम्ही तुमचे कर्तव्य चुकत आहात. तुम्हाला असे वाटते का? गेले ते गेले. खिशातून लाख रूपये खाली पडले आणि परत सापडले नाहीत तर आपण काय करावे? डोके फोडायचे का?

**प्रश्नकर्ता :** विसरायला हवे.

**दादाश्री :** हो, म्हणजे ही सर्व चुकीची समज आहे. कोणत्याही प्रकारे कोणी वडील आणि मुलगा नसतातच. मुलाचा मृत्यु झाला तर त्यात चिंता करण्यासारखे काहीच नाही. खरे तर, जगात चिंता करायची असेल तर आई-वडिलांचा मृत्यू झाला तरच चिंता वाटली पाहिजे. मुलाचा मृत्यू झाला तर त्याचे आणि आपले काय देणेघेणे? आई वडिलांनी तर आपल्यावर उपकार केले होते. आई ने तर आपल्याला नऊ महिने पोटात ठेवले आणि मग पालन पोषण करून मोठे केले वडीलांनी शिक्षणासाठी फी दिली, इतर सर्व काही दिले. उपकार मानायचे असतील तर आई-वडिलांचे मानावेत, मुलाशी काय देणेघेणे? मुलगा तर मालमत्ता घेईल आणि वर शिव्या देईल. म्हणूनच मुलांशी संबंध ठेवा, पण मृत्यू पावला तर असे दु:खी होऊ नये. तुम्हाला माझे म्हणणे कसे वाटते?

हा आपल्या हातचा खेळ नाही, आणि त्या बिचाऱ्याला तिथे दुःख होते. जर आपण इथे दुःखी झालो तर त्याचा परिणाम त्याच्यावर होतो. म्हणजे आपण त्यालाही सुखी होऊ देत नाही आणि आपणही सुखी होत नाही. म्हणूनच शास्त्रकारांनी सांगितले आहे, 'गेल्यानंतर दुःखी होऊ नका.' म्हणून लोक काय म्हणतात की गरूड पुराण ठेवा, अमुक करा, पूजा करा आणि विसरा. तुम्ही असे काही केले होते? तरीही विसरला नाहीत?

**प्रश्नकर्ता :** पण त्याला विसरू शकत नाही. वडिलांचे आणि मुलाचे संबंध खूप चांगले होते म्हणून विसर पडत नाही.

**दादाश्री :** हो, विसरता येण्यासारखे नाही. परंतु जर तुम्ही विसरला नाहीत तर तुम्हाला त्याचे दुःख होत राहील आणि त्यालाही तिथे दुःख होईल. आपल्या मनात त्याच्यासाठी दुःख बाळगणे, हे वडील या नात्याने आपल्याला उपयोगाचे नाही.

**प्रश्नकर्ता :** त्याला कशा प्रकारे दुःख होईल?

**दादाश्री :** तुम्ही इथे दुःखी झालात तर त्याचा परिणाम तिथे पोहोचल्याशिवाय राहणारच नाही. हे जग तर फोनसारखे आहे, टेलिव्हिजनसारखे आहे! आणि आपण इथे त्रास करून घेतला तर तो परत येणार आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** कोणत्याच प्रकारे येणार नाही ना?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** आपण दुःखी झालो तर ते त्याच्यापर्यंत पोहोचते आणि त्याच्या नावाने भक्ती-धर्मकार्य केले तर तेही त्याला पोहोचते आणि त्याला शांती मिळते. त्याला शांती मिळवून देण्याची गोष्ट तुम्हाला कशी वाटते? आणि त्याला शांती मिळवून देणे हे आपले कर्तव्यच आहे ना? म्हणून असे काही करा, की ज्यामुळे त्याला बरे वाटेल. एखाद्या दिवशी शाळेतील मुलांना पेढे खाऊ घाला, असे काही तरी करा.

**प्रश्नकर्ता :** ते सर्व केले!

**दादाश्री :** हो, पण ते वारंवार करा. जेव्हा थोडी सवड मिळेल तेव्हा पाच-पन्नासचे असे काही काम करा की जे त्याला पोहोचेल.

**प्रश्नकर्ता :** या भाऊंना मुलगा गेल्याचे दु:ख होत आहे, पण मला स्वत:ला असा अनुभव आला आहे की आई-वडील गेल्यानंतर मला त्यांची कधीच आठवण आली नाही. त्यांच्या मृत्यूच्या पाच-सहा दिवसानंतर कधी आठवणही आली नाही. ते कशामुळे?

**दादाश्री :** तुमचे खूप चांगले आहे, आणि आई-वडीलही पुण्यशाली आहेत. जर तुम्हाला आठवण आली असती तर त्यांना दु:ख झाले असते.

तुम्हाला माझे म्हणणे समजत आहे ना? म्हणून जेव्हा जेव्हा आठवण येईल तेव्हा एवढेच म्हणा की, 'हे देवा, या मुलाला तुमच्यावर सोपविले आहे!' तर मग याचे निवारण होईल.

म्हणजे मुलाची आठवण काढून त्याच्या आत्म्याचे कल्याण होवो असे तुम्ही मनात बोलत राहा, डोळ्यात पाणी येऊ देऊ नका. तुम्ही तर जैन थिअरीवाले आहात. तुम्हाला माहीतच आहे की आत्मा गेल्यावर 'त्यांच्या आत्म्याचे कल्याण होवो, अशी भावना केली पाहिजे. हे कृपाळूदेव, त्यांच्या आत्म्याचे कल्याण करा!' त्याऐवजी जर तुम्ही मनातून खचलात तर कसे चालेल? आपल्याच स्वजनांना दु:खात टाकणे हे आपले काम नाही. तुम्ही तर समजूतदार, विचारशील, संस्कारी लोक आहात, त्यामुळे जेव्हा जेव्हा आठवण येईल तेव्हा तेव्हा म्हणा की, 'त्यांच्या आत्म्याचे कल्याण होवो! हे वीतरागी भगवंत, त्यांच्या आत्म्याचे कल्याण करा!' एवढे बोलत राहा.

जेव्हा जेव्हा तुम्हाला मुलाची आठवण येईल, तेव्हा त्याच्या आत्म्याचे कल्याण होवो असे म्हणा. 'कृपाळूदेवां'चे नाव घ्या. किंवा 'दादा भगवान' बोलाल तरीही काम होईल. कारण 'दादा भगवान' आणि 'कृपाळूदेव' आत्मस्वरूपाने एकच आहेत! देहाने वेगळे दिसतात,

डोळ्यांनी पाहताना वेगळे दिसतात पण 'वस्तू' (आत्मा) स्वरूपात एकच आहेत. म्हणून महावीर भगवंतांचे नाव घेतलेत तरी तेच आहे. त्यांच्या आत्म्याचे कल्याण होवो, हीच भावना नेहमी तुम्हाला करायची आहे. ज्यांच्याबरोबर तुम्ही नेहमी राहिलात, एकत्र खाणे-पिणे केलेत, तर त्यांचे कल्याण कसे होईल अशीच भावना तुम्ही करावी. आपण इतर लोकांसाठी चांगली भावना करतो, मग हे तर आपले स्वजन आहेत, त्यांच्यासाठी का करू नये?

आपल्या इथे एक भाऊ आले होते, त्यांचा एकुलता एक मुलगा होता तो वारला. मी त्यांना विचारले 'मुलाच्या घरी मुलगा आहे का? ' तर ते म्हणाले, 'हो, आहे ना, तो तर अजून लहान आहे, पण माझा मुलगा तर वारला ना!' मग मी त्यांना विचारले, 'तुम्ही इथून दुसऱ्या जन्मी जाल तेव्हा तुमच्याबरोबर काय येईल?' ते म्हणाले 'तिथे तर सर्व विसरून जाऊ!' म्हणजे मुलगा गेला त्याचे दुःख नाही, हा गुंता तर न विसरता आल्यामुळे आहे! नंतर मी विचारले 'मी तुम्हाला विसर पाडू?' तर म्हणाले 'हो, विसर पाडा.' मग मी त्यांना 'ज्ञान' दिले आणि त्यानंतर ते विसरले. मग त्यांना सांगितले की 'आता आठवून पाहा.' तरीही आठवता आले नाही.

म्हणून 'दादा भगवान' तुमच्यावर सोपविले असे म्हणा. तुम्हाला खात्री आहे की नाही? शंभर टक्के खात्री आहे की थोडी उणीव आहे? दादांवर सोपवा ना, पूर्ण निवारण होईल!

## व्यवहार म्हणजेच लौकिक

मुलगा वारला तर बाप रडू लागतो. मुलाच्या मामाला, काकाला, या सर्वांना जर विचारले की, 'तुम्ही का रडत नाही?' तर ते म्हणतील, 'असे रडून काही होईल का? जो जन्म घेतो त्याचा मृत्यू होतोच ना!' पाहा ना, ह्या लोकांना तर व्यवस्थित माहीत नाही. पण तुम्हाला दुःख होते ते स्वार्थामुळे, कारण तुम्हाला वाटते की माझा मुलगा मोठा झाला असता तर मला फायदा झाला असता. दुसरे लोक तर रडत नाहीत ना?

**प्रश्नकर्ता :** जर रडले नाही तर समाजातील लोक म्हणतील की याला तर काही वाटतच नाही.

**दादाश्री :** हो. असेही म्हणतात. समाजातील लोक तर दोन्ही बाजूंनी बोलतात. जर झोपले तर म्हणतील 'आळशासारखा झोपला आहे.' आणि धावपळ केली तर म्हणतील की, 'दिवसभर धावपळ करत असतो, कुत्र्यासारखा भटकतच असतो.' मग आपण कोणती बाजू घ्यावी? म्हणजेच समाजाच्या बोलण्यावर फार लक्ष देऊ नये, व्यवहारापुरते लक्ष दिले पाहिजे. आपल्या हिताचे असेल तेवढ्यावरच लक्ष दिले पाहिजे, दुसऱ्या गोष्टींकडे लक्ष देऊ नये. असे सगळीकडे लक्ष द्यायला लागलो तर हे कधी संपणारच नाही ना?

समाजाला वाटत असते की, ह्याचे हृदय दगडासारखे आहे, तर तुम्ही बाथरूममध्ये जाऊन डोळ्यांवर पाणी शिंपडून यावे, कारण हे तर लौकिक आहे. लोक पण असेच म्हणतात ना की, 'लौकिकात या'? लौकिक म्हणजे बनावट. लौकिकचा अर्थच आहे बनावट, खोटा! नातेवाईक छाती बडवतात, तसाच हा ही छाती बडवतो, पण छाती फोडत नाही. असे हातावर हात आपटतो. पाहा, खरोखरच लौकिक करतो ना? आणि सगळे जण आपआपले आठवून रडतात. कुणाचा लहान भाऊ वारला त्याला आठवून रडतात, बायको आपल्या नवऱ्याची आठवण काढून रडते! आता हे अज्ञान कधी संपणार?

या गाई-म्हशी कधी रडत नाहीत, त्यांचीही मुले मरतात, मुली मरतात पण ते रडत नाहीत ना! पण हे सुधारले आहेत, म्हणून जास्त रडतात. गाई-म्हशींमध्ये 'माझी मुलगी वारली किंवा माझा मुलगा वारला?' असे रडणे-भाकणे होते का कधी?

आणि माझे म्हणणे असे आहे की, कोणी वारल्यानंतर जर आज तुम्ही रडलात तर अट ठेवा की, 'भाऊ, मी तीन वर्षे रडेन; त्यानंतर रडणे बंद करेन' अशी काही अट ठेवा, 'ॲग्रीमेंट' करा. जर स्त्रियाही रडत असतील तर त्यांनाही सांगतो की, 'अट ठेवून रडा की आपण तीन वर्षांपर्यंत रडू.' पण इथे तर पंधरा दिवसानंतर काहीच नसते! आणि

मग चांगली साडी नेसून हसत-खेळत लग्नाला देखील जातात. याचे कारण काय? तर हा बेभानपणा आहे. अशा बेभान लोकांबरोबर आपण का रडत बसायचे? आपल्याला तर तिथे फक्त नाटक करावे लागते. तिथे आपण हसू शकत नाही. हसले तर लोक मूर्ख म्हणतील, पण देखावा तर करावा लागतो ना? नाटकात जसा अभिनय करतात, तसा अभिनय करावा लागेल. डोळ्यातून पाणी येत नसेल तर बाथरूममध्ये जाऊन डोळयांना जरा पाणी लावून यावे. पण तुम्ही तर खूपच नाजूक आहात, म्हणून फारच मनाला लावून घेतले आहे. थोडेसे बोलले तरी डोळ्यांतून पाणी येते.

या जगाचा खोटेपणा मी पाहिला आहे, कारण मी खरा पुरुष होतो. मला लौकिकाची तशी आवड नव्हती. असा लौकिक कोणाला आवडेल? रडणे म्हणजे रडू आलेच पाहिजे, पण मग मला कळले की हे जग थोतांड (पोकळ) आहे. हा व्यवहार खरा आहे का? तुम्हाला काय वाटते? पण तरी हा खोटाही नाही. हा तर लौकिक आहे. आपल्याला देखील तसे लौकिकच करायचे आहे. लौकिक म्हणजे लोक आपल्याबरोबर जसा व्यवहार करतात तसाच व्यवहार आपणही केला पाहिजे. तुम्हाला असा लौकिक आवडतो का?

आपण जेव्हा छाती बडवतो तेव्हा हलक्या हाताने बडवतो, नाही तर दुखापत होईल ना?

पण लोक म्हणतील की आपण छाती बडवली. म्हणजे असा आहे हा व्यवहार. हे लोक रडारडी करतात. छाती बडवतात त्यावेळी जर आपण त्यांना पाहिले तर, ते अशा प्रकारे बडवतात की, आपल्याला वाटते आता हा छाती फोडूनच घेईल, पण तो फोडत नाही, खूप हुशार असतात हे लोक! यालाच लौकिक म्हणतात ना? त्यातला एखादा कच्चा असेल तर मार खाईल (अडचणीत पडेल). पण लौकिकमध्ये तर दुसऱ्या दिवशी त्याला शिकविणारे कोणी गुरु भेटतील आणि सांगतील की, 'असे करायचे असते का? हे बघ, असे केले पाहिजे!' म्हणजे तो परत तशी चूक करणार नाही. म्हणजे छातीवर मारतात जरूर, आपल्याला

तसे दिसतेही, पण दुखापत होत नाही! लौकिक म्हणजेच व्यवहार. सगळे रडतात म्हणून आपणही रडले पाहिजे. पण रडू आल्याशिवायच रडायचे, खरोखर रडायचे नाही. म्हणजे या लौकिकात तर सर्व काही समजते, पण यात मात्र समजत नाही. यात तर खरोखरच रडतात!

यातही व्यवहार, व्यवहारात आहे आणि केवळ, केवळमध्ये आहे. सगळ्यांनी आपापले वाटून घेतले की मग भांडणच नाही ना! पण हे वाटून घेतले नाही, म्हणूनच भांडणे आहेत ना! जे आपले नाही त्याला लोक पकडून ठेवतात, पण बिचाऱ्याला समजत नाही त्यामुळे पकडून ठेवतो आणि मार खातो (दु:खी होतो). ओझेही उचलतो शिवाय मारही खातो. अरे, ओझे तुझ्या डोक्यावर नाही, हे सारे ओझे तर घोड्यावरच पडत आहे! पण तरी डोक्यावर ओझे घेऊनच जगत असतो, असे आहे हे जग.

असे आहे की, सगळा व्यवहार वरपांगी आहे आणि निश्चय वास्तविक आहे. आता वरपांगी रक्कम काय आपण काढून टाकतो का? वरपांगी रक्कम अशी काढून टाकत नाही ना! पण लोकांनी वरपांगीला वरपांगी राहू दिले नाही. वरपांगीलाच खरे मानले आहे. म्हणून हे सर्व नीट समजून घेण्याची गरज आहे.

जेव्हा आमचे मोठे बंधू वारले, त्यावेळी आमची वहिनी वयाने लहान होती, तेव्हा जो कोणी येई तो तिला रडवीत असे, जो येईल तो तिला रडवीत असे! तेव्हा मला वाटले की, वहिनी फार 'सेन्सिटिव्ह' (संवेदनशील) आहे, तर हे लोक तिला बिचारीला खूप दु:खी करतील. म्हणून मी आईंना म्हटले, 'लोकांना तुम्ही असे सांगा की तुम्ही माझ्या सुनेला माझ्या मुलाबद्दल काही विचारू नका.' अरे, हा काय प्रकार आहे? माणसे असूनही माकडासारखे का वागता? तुमच्यापेक्षा तर माकडे बरी! माकडे जखम मोठी करून करून मारून टाकतात, तसेच तुम्ही बोलून बोलून करत आहात. मग तुमच्यात आणि माकडात काय फरक राहिला? तुम्ही लोकांना रडवायला येता की हसवायला? खरे तर आश्वासित करून जायचे असते, त्याऐवजी बिचाऱ्यांना आणखी दु:खी

करता. पण जगाचा नियम असा आहे की आश्वासन करणारी व्यक्ती स्वत:च जर दुखी असेल तर ती काय आश्वासन देणार? ती तर तेच देईल की जे तिच्याकडे आहे. आणि सध्या तर लोक दु:खी आहेत ना? म्हणून आपण समोरच्या व्यक्तीला सांगितले पाहिजे की कोणी व्यक्ती सुखी असेल, आंतरिक सुखी असेल तरच इथे यावे, नाही तर इथे येऊ नये आणि घरी बसून आश्वासन पत्र लिहा. उगाचच या भुतांचे इथे काय काम आहे? ही भुते तर उलट त्या बिचाऱ्याला रडवितात.

आमच्या इथे 'कांण काढो, (एखाद्याच्या मृत्यूनंतर रडारडी करणे) लौकिक करा' असे म्हणतात. 'कांण करा, मोकांण करा.' ते कशासाठी? तर असे करून सर्व शांत करण्यासाठी. हे रडत आहेत तर रडू द्या, त्यांच्या सर्व भावना निघून जाऊ द्या, असे म्हणतात. अश्रू आले नाहीत तर माणसाला वेड लागेल, म्हणून रडू दिले पाहिजे. रडण्यातही 'ऑबस्ट्रक्ट' करू नये आणि हसण्यातही 'ऑबस्ट्रक्ट' करू नये, नाही तर माणूस वेडा होईल. अर्थात आपल्याकडे जे होत आहे ते बरोबरच आहे, पण आता आपल्या इथे आरडाओरडा करत रडारडी करणे वगैरे सर्व बंद झाले आहे. लोकांना आता समजले आहे की, या गोष्टींमध्ये काही अर्थ नाही. आणि बाईसाहेबांनाही समजले आहे की, 'सोडा ना आता, जे गेलेत ते थोडेच परत येणार आहेत? पण बँकेत तीस हजार ठेऊन गेले आहेत ना!' म्हणजेच हे सर्व स्वार्थाचे संबंध आहेत. यात काही ठिकाणी काही चांगल्या भावना असतीलही, पण फार कमी ठिकाणी. मूळ संस्कार फार कमी ठिकाणी उरले असतील. बाकी तर सर्व स्वार्थ, मतलब आणि मतलबच, यातच गुंतले आहेत.

## मृत्यू निश्चित आहे तरीही...

**प्रश्नकर्ता :** घरात कोणाचा मृत्यू झाला तर मुंडन करतात. त्याला काही कारण असेल ना?

**दादाश्री :** गाववाल्यांना कसे कळणार की याचे वडील वारले

आहेत? म्हणून मुंडन करतात, मिशा काढतात. त्यामुळे लोकांना कळते की याच्या घरी कोणाचा तरी मृत्यू झाला आहे. म्हणजे मग 'चल माझ्याबरोबर लग्नाला' असे काही ते बोलणार नाहीत. हे तर हिंदुस्तानचे रिवाज आहेत, त्या मागे काहीतरी आशय तर असणारच ना! त्याने मुंडन केले असेल तर मग कोणी विचारेल का की, 'तुझ्या वडिलांची तब्येत कशी आहे?' नाही, कारण मुंडन केले आहे म्हणून समजून जातात. ओळखण्याचे काही तरी साधन तर असले पाहिजे ना?

**प्रश्नकर्ता :** या हिशोबाने तर जैन धर्मात अशी काही भानगडच नाही.

**दादाश्री :** धर्माचे आणि याचे काय देणेघेणे? मिशा फ्रेंच कट करणे किंवा पूर्ण काढून टाकणे, याचा धर्माशी काहीही संबंध नाही.

**प्रश्नकर्ता :** प्रेतयात्रा निघाल्यावर रामाचे नाव किंवा जय जिनेंद्र असे का बोलतात?

**दादाश्री :** मग काय बोलणार? नाव तर निघून गेले, त्याचे काही चांगले व्हावे म्हणून जय जिनेंद्र बोलतात किंवा रामाचे नाव घेतात. जसे 'राम बोलो भाई राम!' लोकांचा असा रिवाजच आहे की, मेल्यावर पूजा करतात, असे आहेत हे लोक! तो जेव्हा जिवंत होता तेव्हा खिचडीवर तूप मागितले तर म्हणतील 'तूप मागताय? आता म्हातारपणी?' आणि मेल्यावर 'फर्स्टक्लास' बारावे करतात! त्याने जिवंत असताना रामाचे नाव घेतले, तर घरचे लोक त्याला त्रास देतील, म्हणतील, 'उठा आता, गुपचुप साखर घेऊन या. इथे राम राम कशाला करत आहात?' म्हणजे रामाची भक्ती करू देत नाहीत. आणि जेव्हा मृत्युसमय येतो तेव्हा शेवटच्या तासात, शेवटच्या गुंठाणांत सगळ्या कषायांनी त्याला घेरलेले असते, तेव्हा लोक कानात ओरडतात की, 'बोला, राम बोला', अहो, आता तो कसा बोलेल? उगाचच त्याला कशासाठी त्रास देत आहात? त्या बिचाऱ्याला तेव्हा फार वाईट वाटते, आत खूप दु:ख होते, आत 'लाउड स्पीकर'सारखे वाटते आणि जीव घाबरतो! अहो, नका ना

बोलू, त्याला नीट मरू तरी द्या. पण लोक त्याला नीट मरूही देत नाहीत. गाडीतून उतरताना आपण त्याला विचारले की, 'कसे आहात? मजेत आहात? तब्येत ठीक आहे ना?' तर तो उलट आपल्याला गाठोडे मारेल. अहो, उतरू द्या ना त्याला!

माझ्या वडिलांची तब्येत बरी नव्हती, म्हणून माझे मोठे भाऊ, मणिभाई मला म्हणाले, 'तू काम बघ, मी वडिलांची तब्येत पाहून येतो.' आणि ते भादरणला गेले. थोड्यावेळाने माझ्या मनात विचार आला की, मी तर सर्वांवर कामे सोपविली आहेत. तर चला, मीही तब्येतीची चौकशी करून येतो. मग मी निघालो आणि गाडीत बसलो. वाटेत मला मणिभाई भेटले, ते बोरसदहून परत येत होते. त्यांनी मला विचारले, 'अरे, तू आलास?' मी म्हटले, 'हो, माझ्या मनात विचार आला की मी जावे, म्हणून मी सर्व कामे सोपवून आलो आहे.' तेव्हा ते म्हणाले की, 'मग तू आता घरी जा वडिलांकडे आणि मी परत कामावर जातो.' मी वडिलांकडे गेलो, तर त्यांनी त्याच रात्री जाण्याची तयारी केलेली दिसली, तोपर्यंत ते थांबले होते. म्हणजे ज्याच्या खांद्यावरून जायचे असते त्याच्याच खांद्यावरून जाणे होते.

## तरी देखील निसर्ग सोडवितोच

एवढे मात्र चांगले आहे की, हिंदुस्तान देशात मरणाऱ्याला अशी भीती नसते की मला कोण उचलणार? एवढे बरे आहे, नाही तर त्याला कोण उचलणार? ह्याने अशी अशी कृत्ये केली आहे, ह्याला कोण उचलणार? पण नाही, त्यालाही उचलणारे भेटतात. मरणाऱ्याला भीती वाटत नाही की कोण उचलेल? कारण मरणाऱ्याला माहीत असते की तुम्ही नाही उचललेत तर तुमचीच हवा खराब होईल आणि तुमचेच नुकसान होईल. म्हणून तुम्हीच स्वच्छ करा. आम्ही तर 'ही' मालमत्ता सोडून निघून जाऊ. तसे तर मालमत्ता सोडतील असे हे नाहीत, पण निसर्गच त्यांना सोडायला लावतो.

**प्रश्नकर्ता :** जीवाला शरीराची माया तर असते ना?

**दादाश्री :** त्याला शरीराची माया नाही, पण दुसरी माया असते. या डोळ्यांना सर्व काही दिसते. हा माझा मुलगा, हा माझ्या मुलाचा मुलगा, त्याची फार माया असते. मुलाचा मुलगा दिसला की, 'बाळा इथे ये, इथे ये', असे म्हणतो. जोपर्यंत त्याला डोळ्यांनी दिसते, तोपर्यंत हे सर्व छान वाटते. आपण विचारले, 'काका, अजूनही माया जात नाही?' तर म्हणतील 'नाही बाबा, आता जोपर्यंत डोळ्यांनी दिसते आहे तोपर्यंत चांगले आहे.' आपण म्हटले, 'काका, हे पाय मोडले आहेत, हात मोडले आहेत, जेवण जात नाही, तरीही?' त्यावर काका म्हणतात, 'नाही, अजून डोळ्यांनी दिसत आहे तोपर्यंत चांगले आहे!' अर्थात जाण्याची इच्छा कोणालाच नसते.

पण निसर्गाचा नियम असा आहे की कोणत्याही माणसाला इथून घेऊन जाता येत नाही, मरणाऱ्याने सही केल्याशिवाय त्याला इथून घेऊन जाता येत नाही. लोक सही करत असतील का? असे म्हणतात ना की, 'हे देवा, आता इथून निघून गेलो तर बरे.' असे का बरे बोलतात? तुम्हाला माहीत आहे का? कारण आत असे काही दु:ख होत असते, त्या दु:खामुळे बोलतात की, 'आता हा देह सुटला तर बरे.' त्यावेळी त्याची सही घेतली जाते. आणि परत सकाळी जेव्हा तब्येत बरी होते, तेव्हा जर आपण म्हटले की, 'काका, रात्री तर तुम्ही म्हणत होतात ना की इथून निघून गेलो तर बरे.' तर ते म्हणतील की 'नाही, आता तर बरे वाटत आहे.' पाहा! रात्री सही केली आणि सकाळी पलटले ना काका? जेव्हा सही केली तेव्हाच मी समजून गेलो की आता यांचा दहा-पंधरा दिवसांचाच मुक्काम आहे. सह्यांशिवाय तर कोणाला नेता येतच नाही. जेवढेही जीव मरतात ते सर्व सहीपूर्वक मरतात. नाही तर हे लोक तर दावा दाखल करतील की, 'माझ्या सहीशिवाय तुम्ही मला का घेऊन गेलात?' लोक नंतर अर्ज करतात ना? आणि हे सरकारही म्हणते 'सहीशिवाय कोणाला काही विकायचे वगैरे नाही, आणि जर विकलेत तर तुमची जबाबदारी.' सही केली की मग कोणी काही बोलू शकत नाही. नाही तर सह्यांशिवाय तर हे लोक वाकडेच बोलतील, कारण मूळ स्वभाव तर वाकडाच आहे ना!

संपूर्ण जग स्वतंत्र आहे, कुठलीही व्यक्ती परतंत्र नाही. ही जी परतंत्रता आहे, तो स्वतःच्या चुकांचा परिणाम आहे. 'ब्लंडर्स एन्ड मिस्टेक्स' या दोन गोष्टींमुळेच बांधले गेले आहात, नाहीतर दुसरा कोणी बांधणारा नाही, कारण कोणी कोणाचा *उपरी* (वरिष्ठ, मालक) नाहीच, असे स्वतंत्र आहे हे जग! माझाही कोणी *उपरी* नाही ना! आणि मला तर अनुभवाला येते की माझा *उपरी* कोणी नाही. तुमचाही कोणी *उपरी* नाही. तुमचा *उपरी* कोण? तर तुमच्या 'ब्लंडर्स' आणि तुमच्या चुका.

## आत्महत्येने काही सुटका होत नाही

**प्रश्नकर्ता :** माझ्या मनात आत्महत्या करण्याचे खूप विचार येतात, तर मी काय करू?

**दादाश्री :** पण आपण आत्महत्या कशाला करायची?

**प्रश्नकर्ता :** श्रद्धा बसत नाही.

**दादाश्री :** कशावर?

**प्रश्नकर्ता :** कोणी सज्जन किंवा आपल्यासारखा कोणी मार्ग दाखवणारा असला तरी श्रद्धा बसत नाही.

**दादाश्री :** असे होय! रोज काय जेवतोस?

**प्रश्नकर्ता :** भाजी-पोळी.

**दादाश्री :** ती आवडते की जिलेबी-लाडू हवेत? तू विवाहित आहेस? तर तुझी पत्नी रागावत नाही का? मग तुला असे काय दुःख आहे की तुला आत्महत्या करावीशी वाटते?

**प्रश्नकर्ता :** सामाजिक आणि आर्थिक दोनच दुःखे आहेत. तब्येतही चांगली नसते.

**दादाश्री :** मुले आहेत की नाही?

**प्रश्नकर्ता :** मुले आहेत.

**दादाश्री :** मुले मोठी झाली की तुझी सेवा करतील. जिवंत रहा ना चुपचाप! तिथे काहीच मिळणार नाही, तिथे तर प्रेते सुद्धा खूप दुःखी झाली आहेत बिचारी! अशी काही प्रेते मला भेटतात की ज्यांनी आत्महत्या केली होती. त्या बिचाऱ्यांना शरीर नसते, भूक लागली की त्यांना कुणाच्या तरी शरीरात घुसावे लागते. इथे तर मजेत खा-पी आणि पत्नीबरोबर फिरायला जा ना!

**प्रश्नकर्ता :** पण खाण्या-पिण्यासाठी आर्थिक परिस्थितीही चांगली असली पाहिजे ना?

**दादाश्री :** अरे, जरा मेहनत कर. आज तुला पूर्ण मार्ग दाखवू. मग हळूहळू तुझे सर्व काही सुधारेल. एकदम सुधारणार नाही, पण सुधारेल.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, असे ऐकले आहे की आत्महत्येनंतर सात जन्म तसेच होते, तर हे खरे आहे का?

**दादाश्री :** जे संस्कार पडतात, ते सात-आठ जन्मांनंतर जातात, म्हणून असे काही चुकीचे संस्कार पडू देऊ नका. चुकीच्या संस्कारापासून दूर राहा. हो, इथे कितीही दुःख असो, तरी ते सहन करा पण गोळी मारून घेऊ नका, आत्महत्या करू नका. बडोदा शहरात काही वर्षांपूर्वी सर्वांना सांगितले होते की, आत्महत्या करावीशी वाटली तर माझी आठवण काढा आणि माझ्याजवळ या. असे काही लोक असतात ना, जोखीमवाले, त्यांना आधीच सांगून ठेवतो. ते मग माझ्याकडे येत असत आणि मी त्यांना समजावून सांगत असे. त्यामुळे त्या दिवसापासूनच त्यांचे आत्महत्येचे विचार बंद होत असत. 1951 नंतर सर्वांना कळविले होते की ज्याला कुणाला आत्महत्या करायची असेल त्यांनी आधी मला भेटावे आणि नंतर आत्महत्या करावी. कोणी आला आणि म्हणाला 'मला आत्महत्या करायची आहे', तर मी त्याला समजावतो, आसपासचे 'कॉजेस' (कारणे), 'सर्कल' आत्महत्या करण्यायोग्य आहे की नाही, हे सर्व काही त्याला समजावून सांगतो आणि त्याचे मन परिवर्तन करतो.

हे तर उगाचच काहीतरी, कशाला आत्महत्या करतात? आत्महत्या का करायची? तू स्वतःच परमात्मा आहेस. मग तुला आत्महत्या करण्याची गरजच काय? पण पाहा ना, कोणी असे म्हटलेच नाही ना? जसे मी सांगत आहे तसे कोणी त्याला सांगितलेच नाही ना, पण वास्तवात तर असेच आहे ना!

**प्रश्नकर्ता :** एखाद्याने आत्महत्या केली, तर त्याला कोणती गती मिळते? तो भूत-प्रेत बनतो?

**दादाश्री :** आत्महत्या केल्याने तर प्रेत बनतो आणि प्रेत बनून भटकावे लागते. आत्महत्या करून उलट त्रास ओढवून घेतो. एकदा आत्महत्या केली की त्यानंतर कितीतरी जन्मांमध्ये त्याची प्रतिस्पंदने येत राहतात! आणि हे जे आत्महत्या करतात ते काही नवीन करत नाहीत, मागील जन्मात आत्महत्या केली होती, त्याच्या प्रतिस्पंदनांमुळे आत्महत्या करतात. आज आत्महत्या करतात, ते तर आधी केलेल्या आत्महत्या कर्माचे फळ येत असते. म्हणून तो स्वतःहूनच आत्महत्या करतो. अशी काही प्रतिस्पंदने पडलेली असतात की तो तसेच करत आलेला असतो. म्हणून स्वतः स्वतःहूनच आत्महत्या करतो आणि आत्महत्येनंतर अवगतीवाला जीव पण होऊ शकतो. अवगतीवाला जीव म्हणजे तो शरीराशिवाय भटकत राहतो. भूत बनणे काही सोपे नाही. भूत तर देवगतीचा जन्म आहे, ती सोपी गोष्ट नाही. भूत, जर इथे कठोर तप केले असेल, अज्ञान तप केले असेल तरच तो भूत बनतो. आणि प्रेत, ही तर वेगळी गोष्ट आहे.

प्रत्येकाला सर्वात अधिक प्रिय अशी कोणती वस्तू आहे? तर स्वतःचा जीव प्रिय आहे. मान-सन्मानापेक्षाही जीव जास्त प्रिय आहे. मान-सन्मानाची पर्वा नाही, क्रोधाचीही पर्वा नाही, लोभाचीही पर्वा नाही, स्वतःचा जीव प्रिय आहे, तरी पण पाहा ना, लोक आत्महत्या करतातच ना! जीव प्रिय असूनही लोक आत्महत्या करत नाहीत का? आत्महत्या कशाला करत असतील? त्यांना जीव प्रिय नसेल? घरातील सर्वच तिला सांगत होते, 'आत्महत्या करू नकोस, ताई शांत राहा, जा, जाऊन शांतपणे

झोप', तरीही ताई उठली आणि मागच्या खिडकीतून पसार झाली, सगळे जण तिला समजावत होते तरी पण! आणि तिने जाऊन सूरसागर (बदोद्यातील एक तलाव)मध्ये उडी मारली, आणि मग ओरडायला लागली की 'मला वाचवा, मला वाचवा.' तिला काय आधी अडविले नव्हते, मग का उडी मारली? आणि आता 'वाचवा, वाचवा' करत का ओरडत आहेस? उडी मारण्याचे भूत स्वार झाले होते, उडी मारल्यावर ते शांत झाले. हे जे म्हणतात ना की, 'मला मरायचे आहे, मरायचे आहे', त्यामुळे 'सायकॉलॉजिकल इफेक्ट' (मानसिक परिणाम) होतो, तो 'इफेक्ट' मग जात नाही. सूरसागरमध्ये उडी मारल्यावर भान येते, तेव्हा म्हणते, 'वाचवा, वाचवा.'

## विकल्पांची देखील आवश्यकता आहे

**प्रश्नकर्ता :** आत्महत्येचे विचार का येत असतील?

**दादाश्री :** ते तर आतील विकल्प संपलेले असतात म्हणून. विकल्पांच्या आधारावरच मनुष्य जगू शकतो. विकल्प संपले की, आता काय करावे त्याचे काहीच 'दर्शन' दिसत नाही, म्हणून मग आत्महत्येचे विचार येतात. म्हणजे हे विकल्प देखील उपयोगी आहेत.

सहजपणे विचार येणे बंद झाले की मग असे सर्व चुकीचे विचार येतात. विकल्प बंद झाले की मग सहजपणे जे विचार येत होते तेही बंद होतात. घोर अंधकार होतो, मग काहीच दिसेनासे होते! संकल्प म्हणजे 'माझे', आणि विकल्प म्हणजे 'मी', हे दोन्ही बंद होतात तेव्हा मरण्याचे विचार येतात.

आपल्या येथे एक वाणी होते, त्यांना खूप चिंता होत असे. म्हणून त्यांना कोणीतरी शिकविले की, तुम्ही असे ठरवा, 'हे माझे नाही, हे माझे नाही', तर सगळ्यातून सुटाल. तो वाणी बिचारा 'हे माझे नाही, हे माझे नाही' करत करत वेडा झाला. अरे, तुझे काय आहे हे समजल्याशिवाय तू उभा कुठे राहशील? म्हणजे तुझे काय आहे हे एकदा समजून तर घे. नाहीतर ममता काय अशीच सुटेल?

आता ही रोज म्हणते की, 'हे डॉक्टर माझे पती नाहीत, हा माझा मुलगा नाही, हा बंगला माझा नाही.' आता जर हिला ज्ञान मिळाले नसेल, आणि त्याआधीच जर ती 'माझे नाही, माझे नाही' असे म्हणाली तर वेडीच होऊन जाईल. 'माझे' काय आहे आणि 'मी आत्मा आहे' हे सर्व ज्याला समजले आहे, ते समजल्यानंतर 'हे माझे नाही' म्हणेल तर चालेल. हे तर स्वत:च पत्ता नाही आणि बोलत राहतात, म्हणून मग हे लोक मरतात ना! जेव्हा 'मी' आणि 'माझे' दोन्ही दिसत नाहीत, तेव्हा आत्महत्या करून मरून जातात! आम्ही त्याच्या डोक्यावर हात ठेऊन, आशीर्वाद देऊन मशीन सुरू करतो, बोल की, 'मी चोर आहे, मी चोर आहे, चोरी करणे माझा धंदा आहे, चोरी करणे हा माझा धंदा आहे', मग त्याचे सुरू होते, त्यांनतर तो जिवंत राहतो. तू काहीही कर, पण इथे जिवंत रहा ना! जेव्हा पोलिस पकडतील तेव्हा तुला दुसरे विचार येतील, 'आता परत कधी चोरी करायची नाही', आपण जर फुटबॉल समोर फेकला तर मग समोरचाही परत फेकेल ना! पण आपण फुटबॉल फेकलाच नाही तर समोरून कोण फेकेल?



## [ 9 ]
# क्लेशरहित स्थिती हिच समाधी आहे

### समजमुळे क्लेश परिणाम शांत होतात

लोकांच्या घरात क्लेश होणार नाही, जीवन क्लेशमय होणार नाही, असा धर्म दाखवायचा आहे. आता तर धर्म अपसेट झाला आहे, म्हणून लोक क्लेशमय जीवन जगत आहेत. नाही तर हे जैन, हे वैष्णव काय गुन्हेगार आहेत? नाही, असे नाही. तरी देखील इतक्या चिंता का आहेत? कारण सारे जीवनच क्लेशमय आहे. सारा धर्मच असा (सरळ) होता, तो आता असा उलटा झाला आहे. म्हणून जो असा उलटा झाला आहे, त्याला आता आम्ही आता परत उलटा करून देऊ. (म्हणजे मग सरळ होईल). मग खूप सहजपणे जीवन क्लेशरहित होऊ शकेल, असे आहे! आणि या लोकांना विना मेहनतीचा धर्म देऊ. यांचे चेहेरे तर एरंडीचे तेल चोपडल्यासारखे (दु:खी, निराश) आहेत, यांच्याकडून काय मेहनत करून घ्यायची? बाहेर लोकांच्या तोंडावर एरंडीचे तेल दिसत नाही का? तोंडावर एरंडीचे तेल चोपडून फिरत नाहीत का? त्याचे कारण काय आहे? या लोकांकडून मेहनत करून घेण्यासारखे नाही, तप, त्याग करून घेण्यासारखे नाही, हे बिचारे तर दु:खीच आहेत. तरी त्यांना सांगतात, 'अमुक एक खाणे सोडून द्या.' अरे, त्या बिचाऱ्याला फक्त तोच पदार्थ तर आवडतो, तो त्याला का सोडायला लावत आहात? त्याला त्याग करायला सांगण्यासारखे नाहीच. त्याच्याकडे कसलेही सुख

नाही! करुणा वाटेल असे सर्व झाले आहे! आम्हाला हे सर्व दिसते म्हणूनच आम्हाला करुणा येते, आणि वाटते की यांना या दुःखांपासून मुक्ती मिळावी.

## क्लेश झाले, पण ते मिटवायचे कसे?

या संसारात लोक, हिंदुस्तानातील स्त्रिया आणि पुरुष दिवस कसे घालवतात, तेही आश्चर्यच आहे ना! किती अडचणींमधून जातात, तरी संध्याकाळी सर्वांना शांत करून, सर्व भांडणे मिटवून मग आई झोपते, परंतु जोपर्यंत घरातून क्लेश जात नाहीत तोपर्यंत घरात भगवंताचा वास होत नाही. घरात क्लेश असतील तोपर्यंत भगवंत येत नाहीत. आता क्लेश तर कोणालाही नको असतात पण होतात. त्याला काय करणार? क्लेश तर कोणालाही नकोच असतात ना? पण आपोआपच क्लेश होतात, मग काय करायचे? क्लेश म्हणजे काय ते आपल्याला समजते? तुम्ही एकटे, स्वतंत्र राहता की कुटुंबासोबत?

**प्रश्नकर्ता :** भाऊ-बहीण, आई-वडील सर्वांबरोबर राहतो.

**दादाश्री :** घरात, त्या वातावरणात कधी तरी क्लेश होत असतील ना?

**प्रश्नकर्ता :** कधी कधी होतात.

**दादाश्री :** मग त्या वातावरणातून कोण बाहेर काढतो? ते क्लेशमय वातावरण घरात रात्रभर तसेच राहते की तुम्ही ते दूर करता?

**प्रश्नकर्ता :** आम्ही दूर करतो.

**दादाश्री :** कसे दूर करता? काठी मारून? या लोकांना क्लेशमय वातावरण दूर करण्याची इच्छा असते, पण कसे दूर करणार?

**प्रश्नकर्ता :** क्लेश विसरून आनंदी वातावरण बनवावे.

**दादाश्री :** असे आहे, संपूर्ण जीवन फ्रॅक्चर झाले आहे, मन फ्रॅक्चर झाले आहे, बुद्धी फ्रॅक्चर झाली आहे, अशा काळात लोक काय

शोधत असतात? म्हणून आता पुन्हा मन मजबूत झाले पाहिजे. मन मजबूत केव्हा होईल? जेव्हा ज्ञानी पुरुषांचे दर्शन होईल तेव्हा, फक्त दर्शनाने मन मजबूत होते.

हे काय एकाच प्रकारची तुंबे आहेत का? कितीतरी प्रकारचे तुंबे आहेत. जितकी तुंबे तेवढी मते. तुंडे-तुंडे मतिर्भिन्ना! त्याला तुंड केव्हा म्हटले जात होते? तर जोपर्यंत स्वतः सतर्क राहून घरात क्लेश घुसू देत नव्हते तोपर्यंतच त्यांना तुंड म्हटले जात होते. सध्या तर लोक एवढे भोळे आहेत की क्लेशांना घुसू देतात, म्हणून त्यांना तुंबे म्हणतात. आता तर क्लेश घुसतोच ना? कितीही कुंपणे घातली तरी तो घुसतो ना? शेवटी मोरीतून देखील क्लेश घुसतो. दरवाजे बंद करून ठेवतात, कडी लावून ठेवतात, जेणेकरून घंटी वाजली तरच दरवाजा उघडला जाईल, तरी देखील मोरीतून क्लेश घुसतोच. घरचे खातात, घरचे कपडे घालतात, आणि सगळेच काही चोरी करत नाहीत पण तरीही क्लेश होतात, म्हणूनच यांना तुंबे म्हटले आहे. घरात उत्पादन होते आणि घरातच त्याचा उपयोग करतात. अशी माणसे झाली आहेत!

आता जी क्लेशाने घायाळ झालेली माणसे आहेत ती मनाने घायाळ झालेली आहेत. मनाने घायाळ झालेली, चित्ताने घायाळ झालेली आहेत, अहंकाराने घायाळ झालेली आहेत! ज्यांचा अहंकारच घायाळ झालेला आहे, त्यांना काय रागवायचे? त्यांना रागावले तर तुमचे शब्द वाया जातील. कित्येक चित्ताने घायाळ झालेले असतात ते बेचित्त होऊन फिरत राहतात. कोणाचे मन घायाळ झाले असेल तर तो दिवसभर व्याकूळ होऊन फिरत राहतो. जसे काही साऱ्या जगातील अग्नि त्याला खायला उठला आहे?

## समजुतदारपणामुळे संसार व्यवहार शोभतो

खरे तर ह्या दुनियेत क्लेश नावाची वस्तू आहेच कुठे? क्लेश म्हणजे समजेचा अभाव. जिथे जिथे समजुतदारपणा नाही तिथे क्लेश आहेत. आणि जिथे जिथे समजुतदारपणा नाही तिथे दुःख आहे. खरे तर दुःख असे काही नाहीच. दुःख म्हणजे समजेचा अभाव.

**प्रश्नकर्ता :** क्लेशामुळे माणसाची वृत्ती थोडी वैराग्याकडे वळते.

**दादाश्री :** क्लेशामुळे जे वैराग्य उत्पन्न होते ना, ते वैराग्य तर माणसाला संसारात अधिक खोल नेते, त्यापेक्षा तसे वैराग्य नाही आले तर बरे. वैराग्य तर समजपूर्वकच असले पाहिजे. समजपूर्वक आलेले वैराग्य कामाचे आहे, नाहीतर इतर सारे वैराग्य काही कामाचे नाहीत. लोक 'साइनाइड' का पीत असतील? वैराग्य येते त्यामुळेच ना? स्वत:वरचा विश्वास उडतो तेव्हा मग पॉइजन (विष) शोधतो ना? कुठल्याही जनावराचा स्वत:वरील विश्वास उडत नाही. ह्या माणसांशिवाय इतर सगळ्या जाती आहेत, त्यांचा स्वत:वरचा विश्वास उडत नाही. फक्त ही माणसेच अगदी पामर जीव आहेत, बुद्धीचा उपयोग करतात म्हणून पामर आहेत. त्यांना भगवंताने निराश्रित म्हटले आहे, दुसरे सगळे आश्रित आहेत. आश्रिताला भय नसते. कावळे वगैरे सर्व पक्षी आहेत त्यांना काही दु:ख आहे का? जे जंगलात राहणारे प्राणी आहेत, कोल्हा वगैरे त्या सर्वांना कसलेही दु:ख नाही. फक्त ज्यांनी या माणसाची संगत केली, कुत्रे, गाय वगैरे ते सगळे दु:खी असतात. माणूस मुळातच दु:खी आहे, आणि जे त्यांच्या संगतीत येतात, ते सर्व दु:खी होतात.

समज नसल्यामुळे मनुष्य दु:खी आहे, समज मिळवायला जातो म्हणून दु:खी आहे. जर समज मिळवायला गेला नसता तर हा गैरसमज निर्माण झालाच नसता. ही सर्व दु:खे समज नसल्यामुळेच आहेत. स्वत: मनात असे मानतो की 'मला हे समजले, हे समजले.' अरे, काय समजले? समजले तरी पत्नीशी भांडणे तर थांबत नाहीत. कधी पत्नीशी भांडण झाले तर तुला त्याचे निवारणही करता येत नाही. पंधरा दिवस तर तोंड फुगवून राहतात. म्हणतात, 'निवारण कसे करू?' जोपर्यंत त्याला पत्नीशी झालेले भांडण मिटवता येत नाही, तोपर्यंत त्याला धर्मातील काय समजणार? शेजाऱ्याशी झालेल्या भांडणावर इलाज करता येत नसेल तर त्याचा काय उपयोग? ते काय कामाचे? भांडण मिटवता तर आले पाहिजे ना?

एवढे मोठमोठे न्यायाधीश असतात, ते सात सात वर्षांची शिक्षा

ठोठावत असतात, ते न्यायाधीश मला भेटले होते. घरी त्यांच्या पत्नीशी भांडण झाले असेल तर ती केस अजूनही तशीच पेंडिंग राहिलेली असते. मी त्यांना म्हटले 'प्रथम तुमच्या त्या केसचा निकाल लावा ना! सरकारी केस पेंडिंग राहिल्या तरी हरकत नाही.' पण घरची केस कशी सोडवतील? ती समज त्यांना नसते ना! पत्नीबरोबर भांडण झाले तर कशाप्रकारे मिटवावे याची समजच नाही ना! याचे निराकरण कसे करावे ते माणसाला समजत नाही, मग काळच त्याचा निकाल लावतो. खरे तर स्वतःच आत्ताच्या आत्ता, लगेचच 'ॲडजेस्ट' करून घेतले पाहिजे, अशी समज तर या लोकांना नाही.

**प्रश्नकर्ता :** मामला संभाळूनही घेता येत नाही.

**दादाश्री :** नाही, जिथे समजच नाही, तिथे सांभाळणार कसा? मग टाइम त्याचा निकाल लावतो. शेवटी टाइम तर प्रत्येक गोष्ट संपवतो.

काही वाद-भांडण झाले तर त्याचे निराकरण कसे करावे याची समज असली पाहिजे ना? असे का व्हायला पाहिजे? हे सर्व प्राणी संसार चालवितात. तर काय त्यांना पत्नी-मुले नाहीत? त्यांचीही पत्नी आहे, मुले आहेत, सर्व आहे. अंडी एवढ्या उत्तम तऱ्हेने उबवितात, आणि अंडी घालण्याआधी घरटे तयार करतात. त्यांना अशी समज आहेच ना? आणि हे मोठे अकलेचे कांदे!! जेव्हा यांना अंडी द्यायची असतात तेव्हा ते हॉस्पिटल शोधत बसतात. अरे, प्रथम घरटे बनव ना! पण हे अकलेचे कांदे हॉस्पिटल शोधत बसतात आणि बिचाऱ्या प्राण्यांना अंडी घालण्याआधीच समजते की आता आपल्याला अंडी द्यायची आहेत, म्हणून प्रथम आपल्याला घरटे बांधले पाहिजे. अंड्यातून पिले झाली मग घरटे तोडले तरी त्यांना त्याची हरकत नसते, पण त्यांना अंडे घालायचे आहे हे लगेच समजते. आणि या दूषमकाळात माणसे अकलेची पोती बनले आहेत! अकलेचे पोते कोणाला म्हणतात? तर भरलेला आहे बेअक्कलपणाने आणि वर लिहिले आहे अक्कल! माल बाहेर काढतो तेव्हा सर्व बेअक्कलपणाच निघतो. नाहीतर दुनियेत माणसांना दुःख असू शकते का? तू माणूस बनला आहेस, आणि तरीही तुला दुःख मिळत

असेल तर तुला माणूस म्हणावे तरी कसे? जर प्राण्यांना दु:ख नाही तर माणसांना दु:ख कसे असू शकते? तुला तुझी बाउंड्री (सीमा) समजत नाही, तुझी क्षमता काय आहे हे समजत नाही आणि लोकांच्या सांगण्यानुसार, लोकांचे पाहून पाहून चालत राहतोस आणि समोरच्याची नक्कल करत राहतोस. नक्कल तर माकडे करतात. माणूस नक्कल करत नाही, अस्सलच करतो. स्वत:च्या समजेनुसार अस्सल करतो की, माझी ऐपत किती? मला चारशे रुपये पगार मिळतो, आणि शेजाऱ्याची ऐपत किती? तर तो 'महिना दहा हजार कमावतो.' म्हणून आपण शेजाऱ्याची गोष्ट आपल्या आत घुसू देता कामा नये. आपल्याला हे समजले पाहिजे की जर आपली दृष्टी बदलली तर रोग घुसेल? म्हणून घरात पत्नीला, मुलांना सांगितले पाहिजे की 'बाबारे, आपली कमाई एवढी आहे. लोकांच्या दृष्टीने आपली लेव्हल बनवू नये.' म्हणजे हे सर्व समजून घेतले पाहिजे ना?

शेजाऱ्याने सोफा आणला तर घरात पत्नी म्हणेल, 'आपणही सोफा आणू', असे सर्व स्वत:चे अहित करणारे होत आहे. अरे, पत्नी तर सोफा आणा असे म्हणेल, पण आपण पत्नीला विचारावे की, 'तुला माझी तिरडी काढायची आहे का?' पण पत्नीला कसे समजवावे हे तर त्या बिचाऱ्याला जमत नाही, त्यामुळे मग पत्नीला चुकीची सवय लावतो. कारण पती होणे जमलेच नाही. म्हणून मग पत्नीला बिघडवतो आणि स्वत:च्या मनालाही बिघडवतो. स्वत:च मन बिघडवतो आणि मग म्हणतो की, 'माझे मन माझे ऐकत नाही.' अरे, तूच तर त्याला बिघडविले आहेस, तू स्वत:च बिघडविले आहेस. असे कसे की तुझे मन तुझ्या ताब्यात नाही? याला काही कारण तर असेलच ना? त्याला बिघडविले कोणी? मुलांना तर समजा शेजाऱ्यांनी बिघडविले! शेजारी मुलांना बोलावून सांगतील की, 'तुझे वडील खरे तर असेच आहेत.' त्याच्या वडिलांबद्दल उलट-सुलट बोलतात म्हणून मग मुलांना शेजारी चांगले वाटतात. मुलांना वाटते की हे काका खूप चांगले आहेत, पण काका तर मुलांना बिघडवत असतात. म्हणजे मुलांना तर कोणी दुसरा माणूस बिघडवू शकतो, पण स्वत:च्या मनाला कोण बिघडवतो? मी असे केले

तर मन बिघडेल की सरळ राहील याचे भानच नाही. त्यांना वाटते की हे तर फुकटात मिळत आहे ना, हॅवमोअरचे आइसक्रीम फुकटात मिळत आहे ना? मग चला!! अरे, फुकटचे मिळत आहे पण त्यामुळे तुझे मन बिघडते ना, मग जेव्हा ते फुकटचे मिळणे बंद होईल तेव्हा तुझी काय दशा होईल? काही लोकांना तर ब्रँडी फुकट मिळते म्हणून त्यांना ब्रँडीची सवय लागते. आधी फुकटचे सुरू होते आणि मग त्याचे व्यसन लागते. म्हणून सर्व प्रथम लोकांना समजले पाहिजे की या जगात काहीही फुकट घेण्यासारखे नाही. सगळ्यात महाग जर या जगात काही असेल तर ते आहे 'फुकटचे'. म्हणून फुकट आहे त्याला स्पर्शही करू नका. अगदी महागात महाग, फार जोखीम असलेली अशी महाग वस्तू आपल्या इथे घुसू देऊ नये. फुकटचे घेण्यात फार जोखीम आहे, आणि हे लोक तर फुकट घेण्याला सौदा समजतात आणि स्वत:ला अक्कलवंत समजतात. सर्वांना सांगत बसतात की, 'मी काही पैसे वगैरे खर्च केले नाही, हा सर्व खर्च तर माझ्या मित्रांनी केला आहे!' अरे, तू मरत आहेस पण त्याचे तुला भानच नाही ना! आज माणसांना कसलेच भान राहिलेले नाही. मोक्षाचे भान नाही त्याची काही हरकत नाही. मोक्षाचे भान तर नाही, पूर्वीपासूनच नव्हते, पण संसारातील हिताहिताचे भान तरी असायला हवे की नको? संसारात कशाप्रकारे माझे हित होईल आणि कशाप्रकारे अहित होईल, एवढे तरी भान असायला हवे की नको?

आधी पत्नीला रोज, 'चल, सिनेमा बघायला जाऊ, चल, सिनेमा बघायला जाऊ', असे म्हणतो. मग सिनेमाला जातात. मग पत्नी थोडा अंदाज घेते आणि म्हणते की, 'या मुलाला मी उचलू शकत नाही', तर तो म्हणतो, 'मला दे, मी उचलतो.' मग चेष्टा करणारे मित्र भेटले की ते म्हणतात 'अरे, तुझ्यासोबत पत्नी आहे तरी तू मुलाला उचलतोस आणि ती तर अशीच इकडे तिकडे हिंडत आहे?' तेव्हा मग त्याला लाज वाटते. मग पत्नीला म्हणेल, 'घे, आता तू उचल.' अरे, तुला तिला सिनेमा दाखवण्याची काय गरज होती? पत्नी सारखी सारखी सिनेमाचे म्हणत असली, तर म्हणू द्या तिला. पण तुम्हाला समजले पाहिजे की तुम्ही फसले आहात, तर आता त्याचा उपाय करा. पत्नीने

फारच आग्रह केला तर त्याच्यावर मार्ग काढा. पण तिला असे म्हणू नका की, 'चल, सिनेमा बघायला.' 'चल, चल' असे म्हणू नये. इथे तर लग्न करतानाही सौदेबाजी करतात ना?

त्यापेक्षा असे दुकान काढलेच नाही तर काय वाईट आहे? दुकानाशिवायच पडून राहणे चांगले. असे दुकान सुरू करून मग अडकतात! याला मनुष्यत्व कसे म्हणता येईल? मनुष्यत्व तर त्याला म्हणतात की जसे बारा महिन्यात दिवाळी एकदाच येते. पण लाभपंचमीपर्यंत त्याची प्रतिस्पंदने होत राहतात. त्याचप्रमाणे वर्षभरातून फार तर पाच दिवस असे अडचणीचे असतात आणि बाकीचे दिवस साधारणपणे चांगले जातात. पण इथे तर रोजच अडचणी, अडचणींशिवाय दिवसच नाही!

## कुठली चूक राहून जाते?

काळजी घेण्याच्या गुणाकारामुळे तर सर्व जग भटकत राहिले आहे. काळजी घेण्याची काही गरजच नाही ना! काळजी करायची नाही. निष्काळजी असण्याचा भागाकार करण्याचीही गरज नाही. म्हणजे काळजीचा गुणाकार करण्याचीही गरज नाही आणि निष्काळजीचे भागाकार करण्याचीही गरज नाही. इथे तर संपूर्ण दिवस सतत काळजीतच काळजी, काळजीच काळजी! तरी काहीही निष्पन्न होत नाही आणि काही फायदाही होत नाही! इतके सारे खाणे-पिणे, इतकी कमाई असूनसुद्धा कोणी सुखीच नाही? असे कसे? व्यवहारात तर असे निष्क्लेश व्हायला पाहिजे ना? व्यवहार थोडाच क्लेशमय आहे? व्यवहार तर निष्क्लेशच आहे, फक्त त्याला जीवन जगणे येत नाही. म्हणून त्याला क्लेश निर्माण होतो.

क्लेशमय जीवनाला मनुष्य जीवन म्हणताच येणार नाही! कारण कुठल्याही प्राण्याला क्लेश होत नाहीत. या प्राण्यांना आतून दुःख झाले आणि वेदना झाल्या तर डोळ्यांतून पाणी टपकते, ते पण रडतात, पण माणसाव्यरिक्त कोणालाच क्लेश होत नाही. माणसाला क्लेश कसे काय असू शकतात? पण तरीही अशी काही चूक राहून जाते की त्यामुळे

क्लेश उत्पन्न होतात, काही तरी चूक राहून जाते ना! भगवंतांनी सांगितले होते की, क्लेश घालवण्यासाठी ज्ञानाची गरजच नाही, बुद्धीची गरज आहे. बुद्धी तर चांगल्याप्रकारे प्रकाशमान होऊ शकेल अशी आहे, बुद्धीने सारा क्लेश निर्मूळ होऊ शकतो. पण पाहा ना, क्लेशाचे तर कारखानेच काढले आहेत! आता एक्सपोर्ट (निर्यात) तरी कुठे करावे? फॉरेनवाल्यांना विचारले तर म्हणतील, 'आमच्याकडे खूप काही आहे, पण तरीही झोपेच्या गोळ्या घ्याव्या लागतात. वीस वीस गोळ्या खातो तेव्हा कुठे झोप येते.' साऱ्या जगातले सोने, जगातील लक्ष्मी त्यांच्याकडे आहे, तरीही झोपेसाठी गोळी खावी लागते! पण तिला झोप म्हणता येणार नाही. झोप कशाला म्हणतात? तर जी सहज स्वभावी असते. इथे तर यांना जड बनवून टाकले आहे. जसे औषध देऊन सुन्न करतात ना? तसे सुन्न करतात. अरे, असे सुन्न होण्यापेक्षा असेच उघड्या डोळ्यांनी पडून रहा ना! फार झाले तर जागरण होईल ना? मग सुन्न होण्यापेक्षा हे काय वाईट आहे? असे सुन्न व्हायचे असते का कधी?

## अरे, त्याला जरा विचारा तरी...

जे हाती आले ते पोटात ढकलले. असे करायचे असते का? एका व्यक्तीने तर शेरभर आइसक्रीम खाल्ले होते. अरे, आत विचार तरी. आत विचारायला नको की, 'बाबा, तुम्ही कसे पचविणार? पचवणार असाल तर आत (पोटात) टाकतो.' हे तर असे विचारतच नाहीत ना! आता तो आज लगेच मेला नाही म्हणून लोक काय समजतात की, 'काही हरकत नाही, पाहा ना पचले ना!' अरे, पण आत रोग घुसलाच ना! तो रोग मग आत पक्का बसल्याशिवाय राहतच नाही. आज जरी मेला नाही पण रोग शंभर टक्के पसरला असता तर मेला असता. काही प्रमाणात कमी पसरला म्हणून आतच राहिला. मग या कॅन्सरच्या गाठी निघतात ना? हे जे सर्व कॅन्सरचे रोग आहेत ना? ते याच कारणामुळे होत आहेत. न विचारताच रोज पोटात काही तरी ढकलतच राहतात, ढकलतच राहतात! जसे काही पोट म्हणजे कारखानाच आहे!

मी अगासहून बोरसदला जात होतो, तर मी एका घोडागाडीत बसलो

होतो. तीन जण आधीच बसले होते आणि मी चौथा बसलो. मी घोडागाडीवाल्याला म्हटले, 'आता चार पॅसेंजर झाले, तू गाडी चालव!' तो म्हणाला, 'हो, काका चालवतो!' वाटेत दोन पॅसेंजरनी हात दाखवला तर त्याने गाडी थांबवली. त्या दोघांनाही गाडीत बसविले, तरी देखील मी काही बोललो नाही. थोडे पुढे गेल्यावर आणखी दोन जण हात दाखवू लागले. तेव्हा त्याने गाडी उभी केली आणि पॅसेंजरना म्हणाला 'बसायचे तर बसा.' अरे, घोड्याला जरा विचार तरी की तू खेचू शकणार आहेस का? त्याला न विचारताच पॅसेंजर बसवतच चालला आहेस! तू कसा माणूस आहेस? तर तो म्हणाला, 'काका! मी घोड्याला चांगले खायला देईन!' पण बिचाऱ्या घोड्याला विचारणार नाही, आणि खेचून खेचून घोड्याची दमछाक होईल, तसेच हे लोकही विचारल्याशिवाय पोटात खाणे ढकलतच राहतात. काहीही न विचारता अंदाधुंद खाणे ढकलतच राहतात. घोड्याला विचारायला नको की, 'दोन जण जास्त आहेत, आत बसवू की नको?' हे तर जास्त लोकांना बसवतात आणि घोड्याला हाकलत राहतात आणि वर चाबूक मारतात! मग घोडाही मागच्या पायाने टांग्याला लाथ मारतो, धाडकरून! घोडा का लाथ मारतो? कारण तो आतून त्रासलेला असतो, की 'हा शेठ किती नालायक आहे?!' तो म्हणतो की, 'तुझ्याकडे मी अडकून पडलो आहे, तुझ्यासारखा मालक मिळाला म्हणून मी अडकून पडलो आहे!' त्याला चांगला घोडागाडीवाला मिळाला पाहिजे ना! बिचाऱ्या घोड्यालाही महादुःख आहे ना! म्हणूनच तर हा संसार परवश आहे ना!

## दुःखाला ढकलून दूर करण्यासाठी हा कसला शौक?

मी एकाला विचारले की, 'हे शेठ लोक ड्राइव्हरला मागे का बसवतात? ड्राइव्हरला तर पगार देतात आणि शेठच्या जागी ड्राइव्हरला बसवतात?' तर म्हणाला, 'या शेठ लोकांना शौक असतो!' मी म्हटले 'ड्राइव्हर बनवण्याचा शौक? शेठ लोकांना काय असा शौक असतो?' जर कोणी तरी मजूर वगैरे चिरडला गेला तर त्याची जबाबदारी गाडी चालविणाऱ्याची असते, असा शौक कोणाला असतो का? मग मी शोधून काढले की शेठला काय होत आहे? दिवसभर मशीनरी बंद होत नाही

आणि गाडी चालवताना तर पुढे बघावे लागते ना? त्यामुळे तेव्हा एकाग्रता ठेवावी लागते, म्हणून त्यावेळी बाकी सर्व बंद होते. गाडी चालवत असेपर्यंत मशीनरी बंद राहते, नाही तर ही मशीनरी क्षणभर देखील बंद होत नाही. आत शांती नसते, म्हणून हे लोक ड्राइव्हींग करतात. काय होणार आता! पण आता यांच्या बाबतीत सर्व सैल झालेले आहे (सवय झालेली आहे), म्हणून मशीन पुन्हा चालू होते.

सैल होणे म्हणजे उदा. आपण बाटलीत तेल ओतले आणि वर बूच लावले पण बाटली जरा आडवी झाली तरी बूच बाहेर निघून येते, आपोआपच बाहेर निघून जाते. तसेच यांचे सैल झालेले असते. पती-पत्नीच्या संबंधात देखील काही लोकांच्या बाबतीत सैल झालेले असते ना? मग पत्नीकडून दबाव टाकला जातो, तेव्हा आम्हाला म्हणावे लागते की, 'बुचला जरा वेल्डींग करवून रुंद करा ना?' म्हणजे ते आपोआप बाहेर निघणार नाही!

## अशा प्रकारे सर्व शक्ती वाया गेल्या

**प्रश्नकर्ता :** पण लोकांना तर जोपर्यंत पत्नीबरोबर अबोला होत नाही तोपर्यंत जीवनात मजा येत नाही.

**दादाश्री :** हो! अबोला झाला की त्याला मजा येते. कारण हा कुत्रा जेव्हा हाड चघळत असतो, पाहायला गेले तर ते हाड धुतले तरी त्यातून जरा देखील रक्त येणार नाही. पण तो कुत्रा जसजसा ते हाड दाबत जाईल, तसतसे त्यातून रक्त येत राहते. खरे तर ते रक्त त्याच्या स्वत:च्याच जबड्यातून येत असते, पण त्याला वाटते की हाडातून येत आहे. अशा प्रकारे संसार चालत राहतो!

आंधळा दोर विणतो आणि वासरू खाते, असा हा संसार आहे. आंधळा दोर विणत असतो, पुढे पुढे विणत जातो आणि मागे वासरू तो दोर खाऊन टाकते. त्याप्रमाणेच अज्ञानी माणसाच्या सर्व क्रिया वाया जातात आणि मग मेल्यावर पुढचा जन्मही बिघडवतो, त्याला मनुष्य जन्मही मिळत नाही! आंधळ्याला वाटते, अरे वा! पन्नास फुटांचा दोर

तयार झाला पण घ्यायला गेल्यावर समजते की 'हे काय झाले?' अरे, सारा दोर तर वासराने खाऊन टाकला!

त्याप्रमाणेच लहापणापासून लोक सतत पैसे कमावत राहतात, पण बँकेत जाऊन बघितल्यावर म्हणतात 'दोन हजारच पडले आहेत.' आणि मग दिवसभर हाय-हाय, हाय-हाय, दिवसभर कलह-क्लेश आणि भांडण! खरे तर अनंत शक्ती आहेत, जसे तुम्ही आतून विचार करता तसेच बाहेरही होईल, इतक्या साऱ्या शक्ती आहेत. पण यांना विचार तर जाऊ द्या, पण मेहनतीने करायला गेले तरी बाहेर काही मिळत नाही. तर सांगा, माणूस किती दिवाळखोर झाला आहे?

## अहो! क्लेश करून घेण्यातच सुख आहे का?

या बंगल्यातही काही सुख मिळाले नाही! इतके मोठ-मोठे बंगले!! पाहा, बंगल्यात किती प्रकाश आहे, लाल-हिरवे प्रकाश किरण आहेत, कितीतरी स्टेनलेसस्टीलच्या थाळ्या आहेत, पण सुख मिळाले नाही. दिवसभर धांगडधिंगा-धांगडधिंगा! हे कावळे, चिमण्या सगळे घरट्यात जाऊन शांतपणे मिळून-मिसळून राहतात. फक्त हा माणूसच असा आहे जो कधीही मिळून-मिसळून राहत नाही! आताही टेबलवर भांडत असतील, कारण ही जात पहिल्यापासूनच सरळ नाही. सत्‌युगातही सरळ नव्हती, तर आताच्या या दूषमकाळात कशी सरळ असणार? ही जातच अहंकारी आहे ना! या गाई-म्हशी सर्व 'रेग्युलर' आहेत, त्यांना काही तक्रार नाही. कारण ते सर्व आश्रित आहेत. फक्त माणसेच निराश्रित आहेत, म्हणून ही सर्व माणसे चिंता करतात. बाकी जगात दुसरे प्राणी किंवा देवी-देवता चिंता करत नाहीत, फक्त ही माणसेच चिंता करतात. इतक्या चांगल्या बंगल्यात राहतात तरी अपार चिंता. जेवतानाही दुकानाची आठवण येते की 'दुकानाची खिडकी उघडी राहिली, त्याच्याकडून पैसे घ्यायचे राहिले.' इथे जेवता जेवता चिंता करत असतो जणू काही आता जाऊन तिथे पोहोचणार असेल? अरे! सोड ना आता! चुपचाप जेवून तर घे!! पण साधे जेवणही नीट जेवत नाही. खिडकी उघडी राहिली म्हणून आतून चिडलेला असतो. म्हणून मग काही तरी कारण काढून

बायकोवर राग काढतो. अरे, तू चिडला आहेस कोणा दुसऱ्यावर आणि बायकोवर कशाला राग काढतोस? म्हणून आपले कवी म्हणतात, 'कमजोर पती बायकोसमोर शूर.' मग आणखी कुठे शूर बनणार? बाहेर शूर व्हायला जाईल तर मार खाईल! म्हणून घरीच शूर! आपल्याला हे शोभते का? आपण हिंदुस्तानातील माणसे, एका एका माणसात जबरदस्त शक्ती आहे! पण किती उलटा उपयोग चालू आहे! पण त्यात त्यांचाही दोष नाही. त्यांना ज्ञानच उलटे मिळाले आहे म्हणून उलटे चालतात. जर सरळ ज्ञान मिळाले तर सरळ चालतील. तुम्हाला हे सरळ ज्ञान मिळाल्यावर तुमची शक्ती किती वाढली आहे! दर्शन आणि *सूझ* खूप वाढते!!

## ...त्याला मानव धर्म म्हणतात

**प्रश्नकर्ता :** मानव धर्म म्हणजे काय?

**दादाश्री :** कोणा माणसाला आपल्या निमित्ताने दुःख होऊ नये, अन्य जीवांचे सोडून द्या, पण निदान माणसांना 'आपल्या निमित्ताने दुःख होऊच नये', एवढे जरी सांभाळले तर तो मानव धर्म आहे.

खरे तर, मानव धर्म कशाला म्हणतात? जर तुम्ही शेठ आहात आणि नोकराला खूप धमकावत आहात, तर त्यावेळी तुमच्या मनात असा विचार आला पाहिजे की, 'जर मी नोकर असतो तर काय झाले असते?' असा विचार आला तर तुम्ही त्याला मर्यादेत राहून धमकावाल, जास्त बोलणार नाही! जर तुम्ही कुणाचे नुकसान करत असाल तर तुमच्या मनात विचार आला पाहिजे की, मी समोरच्याचे नुकसान करत आहे, पण कोणी माझे नुकसान केले तर काय होईल?

मग कुणाचे पंधरा हजार रुपये, शंभर-शंभराच्या नोटांचे एक बंडल आपल्याला रस्त्यात सापडले तर त्यावेळी आपल्या मनात असा विचार आला पाहिजे की, 'जर माझे इतके पैसे हरवले तर मला किती दुःख होईल, मग ज्याचे हे पैसे आहेत त्याला किती दुःख होत असेल?' म्हणून आपण वर्तमान पेपरात जाहिरात दिली पाहिजे की, 'या जाहिरातीचा खर्च, आणि मालसामानचा पुरावा देऊन आपल्या वस्तू घेऊन जावे.'

बस, याप्रकारे मानवता समजून घेतली पाहिजे. कारण जसे आपल्याला दु:ख होते तसेच समोरच्यालाही दु:ख होत असेल, असे तर आपण समजू शकतो ना! प्रत्येक बाबतीत अशा प्रकारचे विचार तुमच्या मनात आले पाहिजेत, पण आजकाल तर ही मानवता विस्मृत झाली आहे, विलय झाली आहे ना! त्यामुळेच ही सर्व दु:ख आहेत. लोक तर फक्त स्वत:च्या स्वार्थाचाच विचार करतात, त्याला मानवता म्हणता येणार नाही.

मग मानवतेपेक्षाही वरचढ 'सुपर-ह्युमन' असे कोणाला म्हणावे? तुम्ही दहा वेळा कोणाचे तरी नुकसान केले तरीही तुम्हाला जेव्हा गरज असेल तेव्हा ती व्यक्ती तुम्हाला मदद करते! तुम्ही पुन्हा त्या व्यक्तीचे नुकसान केले तरी पण तुम्हाला गरज असेल तेव्हा ती व्यक्ती मदत करते. त्याचा स्वभावच मदत करण्याचा असतो. म्हणून आपण समजून जावे की ती व्यक्ती 'सुपर-ह्युमन' आहे. अशी माणसे क्वचितच असतात. सध्या तर अशी माणसे भेटतच नाही ना! कारण लाखात एखादाच असा असतो, असे याचे प्रमाण झाले आहे.

**प्रश्नकर्ता :** आम्हाला माहीत आहे की, कोणाचे मन दुखावले जाणार नाही, अशा प्रकारे जगले पाहिजे, हे सर्व मानवतेचे धर्म आम्ही जाणतो.

**दादाश्री :** हे सर्व तर मानवतेचे धर्म आहेत, पण जर स्वाभाविक धर्म जाणून घेतला तर नेहमीसाठी सुख मिळेल. मानव धर्मात तर कसे आहे? आपण समोरच्याला सुख दिले तर आपल्याला सुख मिळत राहील. आपण जर सुख देण्याचा व्यवहार केला तर व्यवहारात आपल्याला सुख प्राप्त होईल आणि दु:ख देण्याचा व्यवहार केला तर व्यवहारात दु:ख प्राप्त होईल. म्हणून जर सुख हवे असेल तर व्यवहारात सर्वांना सुख द्या आणि दु:ख हवे असेल तर दु:ख द्या.

**प्रश्नकर्ता :** सर्वांना सुख देण्याची शक्ती प्राप्त होवो, अशी प्रार्थना केली पाहिजे ना?

**दादाश्री :** हो, अशी प्रार्थना करू शकतो ना!



## [ 10 ]
# फ्रॅक्चर झाल्यापासूनच जोडण्याची सुरुवात

### हिशोब चुकते करतानाही स्वपरिणती राहते

फक्त ज्ञानी पुरुषांनाच कोणा *उपरी* (बॉस, वरिष्ठ, मालक)ची गरज नसते. त्याचे कारण काय? तर त्यांच्यात स्वच्छंद नसतोच. निरंतर स्वपरिणतीत राहत असतात, म्हणून त्यांना कोणा *उपरीची* गरज नसते. माणसाला *उपरीची* गरज कुठपर्यंत असते? जोपर्यंत तो चुका करत असतो तोपर्यंत त्याला उपरीची गरज आहे. जेव्हा चुका होतच नाहीत तेव्हा उपरीची गरज राहत नाही. या 'अंबालाल'कडून चूक झाली असेल पण ज्ञानीच्या रूपात आमची चूक होत नाही.

हा जो पाय मोडला आहे, तो अंबालालच्या चुकीचा परिणाम आहे, आमच्या ज्ञानाचा हा परिणाम नाही. पण लोक असे म्हणतात की, 'तुम्हाला असे कसे होऊ शकते?' मी म्हणतो, 'सर्व काही होऊ शकते. पण हा अंबालालचा परिणाम आहे, भगवंताचा परिणाम नाही आणि भगवंताला असे होतही नाही.'

श्रीकृष्ण भगवंत देखील असे झोपले होते, तेव्हा त्यांच्या पायाला बाण लागला होता. श्रीकृष्ण वासुदेव भगवंत होते, तो परिणाम वेगळा आहे आणि बाण लागला हा परिणामही वेगळा आहे. दोन्ही परिणाम वेगवेगळे आहेत. परंतु यावरून लोक परिणाम समजून घेण्यात चूक करतात. श्रीकृष्ण भगवंत तर भगवंतच आहेत, जरी त्यांना बाण लागला

असेल किंवा आणखी काही झाले असेल, तरी ते भगवंतच आहेत. कारण ते स्वपरिणतीत होते आणि नैष्ठिक ब्रह्मचारी होते!

म्हणजे हे जग, हा निसर्ग एका मिनिटाकरताही न्यायाबाहेर गेलेला नाही. म्हणूनच काही घडले तर आम्ही लगेच समजून जातो की, हे जे घडले आहे ते न्यायस्वरूप आहे, म्हणून कोणावर आरोप करण्याचे कारण नाही. धक्का मारणाऱ्याला पाहिले असेल तरी पण आरोप करण्याचे कारण नाही. धक्का मारणारा तर बिचारा निमित्त आहे, यात तर निसर्ग न्यायच करत असतो.

जेव्हा माझा पाय मोडला तेव्हा मला जाणवले की मला नाही चक्कर आली, ना काही झाले, तर मग मला पाडले कोणी? मग असे पाहिल्यावर मला दिसले की, ओहोहो! हा तर हिशोब चुकता केला. आहे. हिशोब कोणाला सोडत नाही ना!

**प्रश्नकर्ता :** कोणाचा धक्का लागला आणि तो पूर्वीच्या हिशोबामुळे लागला असे म्हणणे म्हणजे एक प्रकारचा दिलासा नाही का?

**दादाश्री :** नाही, ते वास्तवात तसेच आहे. तरीही लोक याचा लाभ दिलासा म्हणून घेतात.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे हे वास्तवात आहे?

**दादाश्री :** हो, हे वास्तविकच आहे! मी तुम्हाला सोप्या भाषेत सांगतो. जशी तुम्ही कोणाला थप्पड मारता, तशी मी ही मारली आहे, पण फरक इतकाच की तुम्ही जोरात मारतच राहता, आणि मी हळूवार मारली आहे. पूर्वजन्मी जी थप्पड मारली होती ती हळूवार मारली होती, म्हणून मला त्याचे फळ जरूर मिळते पण ते हलके असते, त्यामुळे ते सहजपणे ठीक होऊन जाते. त्याला ठीक होण्यासाठी चांगले निमित्तही मिळून जाते, गोंधळात टाकणारे निमित्त मिळत नाही. म्हणजे जो उत्तरावरून रक्कम शोधून काढतो त्याची तर गोष्टच वेगळी ना!

## देहाला उपाधी तरी अंतःकरणात समता

आमचे मन तर अनंत जन्मांपासून घडविलेले आहे. बाहेर काहीही होवो, पण आमचे मन घडविलेले आहे. आता हा पाय मोडला आणि त्याच्या उपचारामुळे जर मन दुःखी झाले तर ते मनाची डेव्हलपमेंट थांबवेल. म्हणून आम्ही इतर उपचारांसाठी मनाई केली, आणि हेही सांगितले की गुंगी आणणारी औषधे आम्हाला देऊ नका. कारण आमच्या मनाने गेल्या वीस वर्षात कधी क्षणभरही डिप्रेशन पाहिलेले नाही, आणि जराही एलिव्हेट पण झाले नाही. आणि पडल्यानंतरही क्षणभरासाठीही आनंद लोप पावला नाही.

**प्रश्नकर्ता :** हे शरीर आहे आणि ते तर मन आहे.

**दादाश्री :** नाही, हे शरीर आहे पण पाय मोडल्यावर आत ज्या वेदना झाल्या पाहिजेत आणि त्या वेदनेने जो त्रास व्हायला पाहिजे, उठता-बसताना जे दुःख व्हायला हवे होते ते दुःख झाले नाही. आता शौचाला जायला लागते, इतर सर्व क्रिया होतात, तरीही शरीरावर काही परिणाम होत नाही. बसल्यानंतर उभा राहतो तरी पण एक मिनिट देखील काही परिणाम होत नाही. तुमचे देखील शरीर वेगळे आहे, पण अजून वेगळेपणाचा असा 'एक्झॅक्ट' अनुभव तुम्हाला आलेला नाही ना! हे (शरीर आणि आत्मा) वेगळे आहेत, प्रत्यक्ष वेगळे दिसतात, या सर्व गोष्टीही बरोबर आहेत. परंतु जोपर्यंत शरीर चिकटलेले आहे तोपर्यंत वेदना निर्माण केल्याशिवाय राहणार नाही. आमचे मन-बुद्धी-चित्त आणि अहंकार इतके सुंदर डेव्हलप झालेले आहेत की ते गेल्या वीस वर्षात हलले देखील नाहीत, डिप्रेस झाले नाहीत की एलिवेट झाले नाहीत. तुम्हाला समजले ना? म्हणजे आमचे मन किती डेव्हलप झाले आहे, चित्त किती सुंदर डेव्हलप झाले आहे, अहंकार किती जास्त डेव्हलप झाला आहे! आता हे सर्व इतके सुंदर डेव्हलप झाले असताना जर पाय जोडण्यासाठी गुंगीचे औषध घेण्याची वेळ आली, तर अशा स्थूल गोष्टींमुळे इतक्या सुंदर रितीने डेव्हलप झालेले माझे मन-बुद्धी-चित्त-अहंकार, ते बिघडतील ना! आणि हा पाय जरी थोडा लहान झाला

तरीही माझी काही हरकत नाही, कारण मला फारसे चालावे लागत नाही. असे आहे ना, की आम्हाला हे शरीर जिवंत ठेवण्याचीही इच्छा नाही. आम्हाला तर हा देह राहिला, नाही राहिला तरी काही फरक पडत नाही. मरायचे आहे असेही नाही आणि जगायचे आहे असेही नाही. आपोआपच हा देह सुटेल तेव्हा सुटेल! लोक कशासाठी असे सर्व करत असतात? तर जास्त जगण्यासाठी सगळ्या उचापती करत असतात. म्हणतात 'डॉक्टर साहेब, मला असे करा, मला बरे करा, मला वाचवा.' आम्हाला तर वाटते की जे सहजपणे होईल तेच चांगले, हे सर्व डॉक्टर इथे येऊन सर्व काही करतात. डॉक्टरांची तर अशी इच्छा आहे की यांना इथून 'जाऊ द्यायचे' नाही. अजून पाच-दहा वर्षे राहिले तर चांगले आहे, जगाला उपयोगी पडतील. म्हणून हे सर्व डॉक्टर सहाय्य करू इच्छितात. तसे तर आता चौऱ्याहत्तर वर्षे तर झाली!

## पाय मोडला की जोडला जात आहे?

जेव्हा माझा हा पाय मोडला, तेव्हा जगातील लोक 'पाय मोडला' असे म्हणत होते. तेव्हा मी म्हणत होतो 'नाही, हा पाय तर जोडला जात आहे.' पाय मोडला तो तर फार आधी मोडला होता! त्यात काही नवीन नाही. लोक मला विचारतात, 'तुमच्या पायाला फ्रॅक्चर झाले?' मी सांगतो, अरे, नाही, पाय तर त्यादिवशी मोडला होता, आता तर जोडला जात आहे. आता तुम्हाला जे प्रत्यक्षात दिसत आहे, ती तर जोडण्याची सुरुवात झाली आहे, आणि हा जो 'फ्रॅक्चर' झाला तो तर सांधा आहे. कसला सांधा? जोडणारा सांधा. फ्रॅक्चर झाले त्याच मिनिटापासून आत जोडण्याची प्रक्रिया सुरू झाली. प्रत्यक्षात मोडतो, त्याचक्षणी जोडण्याची प्रक्रिया सुरू होते आणि खरोखर फ्रॅक्चर कोणत्या मिनिटापासून सुरू झाले, हेही आम्ही जाणतो. या बाबतीत जग फार खोलवर विचार करू शकत नाही ना! 'जोडण्याच्या सुरुवातीलाच' लोक 'फ्रॅक्चर झाले' असे म्हणतात. पण आम्ही म्हणतो, अरे, हे तर जोडणे सुरू झाले आहे. त्याला का बरे 'फ्रॅक्चर' झाले म्हणता? आता तर जोडण्याची सुरुवात झाली. आता तर हे कन्स्ट्रक्टिव्ह आहे.

## ताप आला? नाही, जात आहे

ताप जेव्हा प्रकट होतो तेव्हापासूनच जायची सुरुवात झालेली असते. पण लोक म्हणतात, 'ताप आला' पण ताप कधी येतो ते लोकांना कळतच नाही. ताप येण्याची प्रक्रिया तर आधीच झालेली आहे. जेव्हापासून तुम्ही चुकीचे पदार्थ खाऊ लागलात तेव्हापासूनच ही प्रक्रिया सुरू झालेली असते. आता तर ताप निघण्याची व्यवस्था होत आहे. आणि तो ताप आता जात आहे तेही कळते. खरे तर ताप आता जात आहे. जेव्हापासून जायची सुरुवात होते तेव्हापासून निर्जरा (डिस्चार्ज) होते. म्हणजेच जेव्हा डिस्चार्ज होण्याची सुरुवात होते तेव्हा लोक 'ताप आला' असे म्हणतात. मग म्हणतील की 'साहेब माझा ताप उतरवा.' अरे, ही तर ताप निघण्याची (उतरण्याची) सुरुवात झाली आहे, पण लोकांना हे समजतच नाही ना! कारण लोक तर कर्ताभावात पडले आहेत.

म्हणजे जे बिघडले आहे ते तर कोण जाणे कधीपासून बिघडत आले आहे, पण आता तर ते सुधारायला लागले आहे. सुधारायला लागल्यापासून डॉक्टर भेटतात, सामग्री मिळते, औषधे मिळतात, म्हणजे सुधारायची सुरुवात झाली.

## फ्रॅक्चर झाल्यांनतर मोडते की जोडले जाते?

पूर्वी जी कार्ये केली होती, जी भावना केली होती त्याचेच हे फळ आहे. ते डिस्चार्ज होत आहे.

**प्रश्नकर्ता :** 'हा पाय आधीच तुटला होता, आता नव्याने तुटला नाही' हे जरा समजावून सांगा.

**दादाश्री :** कसे फ्रॅक्चर झाले, कसे जोडले गेले, निमित्त काय झाले? या सर्व गोष्टी जशा होत्या तशाच आहेत. म्हणजे यात नवीन काही झालेले नाही. फ्रॅक्चर झाले तर लोक काय म्हणतात? पडले आणि लागले. डॉक्टर देखील काय म्हणतात?

**प्रश्नकर्ता :** फ्रॅक्चर झाले.

**दादाश्री :** हो, आणि भगवंताच्या भाषेत काय आहे? तर जोडले जाण्याची सुरुवात झाली आहे. पण लोक त्याला 'फ्रॅक्चर' झाले असे म्हणतात. म्हणजे फ्रॅक्चर बरे होण्याच्या प्रारंभालाच लोक 'फ्रॅक्चर झाले' असे म्हणतात. फ्रॅक्चर तर आधीच झाले होते. फ्रॅक्चर झाल्यानंतर लगेच जोडण्याची क्रिया सुरू होते. अगदी त्याच मिनिटापासून, काही काळानंतर नाही पण त्याचक्षणी जोडले जाण्याची सुरुवात होऊन जाते. आपल्या लक्षात आले ना? जोडण्याची सुरुवात होत असेल ना?

**प्रश्नकर्ता :** समजले नाही.

**दादाश्री :** फ्रॅक्चर झाल्यावर परत फ्रॅक्चर होत नाही ना?

**प्रश्नकर्ता :** नाही, फ्रॅक्चर तर एकदाच होते ना!

**दादाश्री :** त्यानंतर जोडले जात असेल की पुन्हा फ्रॅक्चर होत असेल?

**प्रश्नकर्ता :** परत फ्रॅक्चर होत नाही, ते तर जोडलेच जात असते.

**दादाश्री :** तेव्हापासूनच, अगदी त्याच मिनिटापासून जोडले जाऊ लागते. हे तुम्हाला समजले का?

## फरक परिणामात की भोगण्यात?

**प्रश्नकर्ता :** हे तर नीट कळले, पण हे मोडण्याची जी कारणे आहेत, कॉजेस् आहेत, ते कसेही करून निर्मूळ करता येतात का?

**दादाश्री :** ती कारणे नष्ट होऊ शकत नाहीत, पण आपल्यावर त्या कारणांचा कमी परिणाम होईल, असे करणे शक्य आहे.

**प्रश्नकर्ता :** जी काही चांगली किंवा वाईट कारणे आपण भूतकाळात उभी केली आहेत, ती प्रत्यक्षात येण्याआधी निर्मूळ होऊ शकतात का?

**दादाश्री :** नाही, ती तर त्याच भावात राहतात. हो, आपण फक्त एवढे करू शकतो की पेटलेल्या होळीजवळ गेलो की खूप गरम वाटते. नाही तरी होळी तर त्याच भावात राहणार. पण आपण (अंगावर) काही तरी चोपडून गेलो तर आपल्याला फार गरम वाटणार नाही, बाकी, होळी तर त्याच भावात राहते. होळी काही स्वत:चा भाव सोडणार नाही.

**प्रश्नकर्ता :** होळी स्वत:चा भाव सोडेल तर तिला होळी म्हणताच येणार नाही.

**दादाश्री :** तिला मग होळी म्हणताच येणार नाही आणि मग जगावर प्रभावही पडणार नाही. मग तर लोक समजतील की, आता तर मार्ग मिळाला, आता भगवंताची काय गरज? पण ही किमया सापडेल अशी नाही. म्हणूनच आपण आतून असे काही करून होळी जवळ गेलो, तर परिणाम होणार नाही. असे होते की नाही? मुसळधार पाऊस पडत असताना आपण एक अशी छत्री घेऊन गेलो तर पाण्याचा थेंबही आपल्याला लागणार नाही. पण पाऊस मात्र थांबणार नाही. लोक एविडन्स बंद करू पाहतात, तो बंद होणार नाही. जर असे झाले असते तर लोकांनी सर्व जगच नष्ट केले असते ना! जर असे दोन विटा काढता येत असतील तर लोक तर सगळे काही तोडून टाकतील. पण यातील एक वीटही हलू शकत नाही. नाही तर हे वाणी लोक काय असे तसे आहेत? सगळ्या विटा काढून विकून खातील. पण एकही एविडन्स पुढे-मागे होऊ शकत नाही. म्हणजे आपले सर्व संयोग देखील असेच आहेत, म्हणून आम्ही तर असे काही तरी अंगावर पांघरून जातो, इथून तिथून कसेही करून निघून जातो, वेळ मारून नेतो, जेणेकरून जास्त त्रास होऊ नये.

## तुटते-जोडले जाते, त्यात 'स्वत:' कोण?

जेव्हा आत गरम होते तेव्हा लोक म्हणतात की 'मला ताप आला.' घरच्यांना सांगतात, 'थर्मामीटर आणा.' मग पाहून सांगतात, '101 डिग्री ताप आला आहे', डॉक्टर येतात तेही सांगतात की 'ताप आला आहे', पण भगवंतांच्या भाषेत सांगायचे तर ताप उतरत आहे. तापाची सुरुवात

होत नाही तर तापाचा विनाश होत आहे. पण आता ही गोष्ट लोकांना समजत नाही ना! त्याने विकृत आहार सुरू केला तेव्हापासूनच आपण समजून जातो की हा तापाच्या कारणांचेच सेवन करीत आहे! तीच ताप चढण्याची सुरुवात असते. मग जेव्हा ताप चढतो, ती तर ताप उतरण्याची कारणे आहेत, ती आत ताप उतरवत असतात.

**प्रश्नकर्ता :** ताप जेव्हा आपोआप जात असतो, तेव्हा लोक ताप उतरण्यासाठी मेहनत करतात. त्याचा काय परिणाम होतो ?

**दादाश्री :** नाही, ती मेहनतही एक निमित्त आहे.

**प्रश्नकर्ता :** पण जे स्वाभाविकपणे होत आहे त्यात ढवळाढवळ करतात ना लोक ?

**दादाश्री :** नाही, ते ढवळाढवळ करत नाहीत, तेही स्वाभाविकपणेच होत असते. आत त्याची गरज असेल तर मदत होईल. पण लोक गरजेपेक्षा जास्तच करत असतात.

मी जे सांगत आहे ना, तसेच मी आधीपासून मानत होतो. जर आता ताप चढला आहे, याचा अर्थ तो आधीच आला होता, तर मग त्यात नवे काय सांगितले ? आणि आता तर तो उतरत आहे!

दु:ख ही अशी गोष्ट आहे की तुम्ही जिथे जाल तिथे ती तुमच्याबरोबर येईल, म्हणूनच इथेच दु:खापासून मुक्त व्हा. इथे आमच्यावर सोपवा आणि निवारण करा, नाहीतर दु:खापासून दूर पळालात तर तुम्ही जिथे जाल तिथे दु:ख तुमच्यासोबतच येईल. हो, म्हणजे इथेच हिशोब चुकता करावा लागेल. आणि जे काही आहे ते तुम्ही स्वत:च आहात. मग शोधून काढा ना! तुम्ही जे आहात, ते बनल्यावर तर काही शिल्लक राहतच नाही. मग जरी पाय मोडला, पण तेव्हा देखील तुम्ही तर आहातच! पाय मोडला, ते तर इथे डिस्चार्ज कर्मांचे हिशोब चुकविणे आहे.



# [ 11 ]
# पाप-पुण्याची परिभाषा

## खरे धन तर सुख देते

हे तर पूरण-गलन आहे, त्यात जेव्हा पूरण (चार्ज होणे, भरणे) होत असेल तेव्हा हसण्यासारखे नाही आणि गलन (डिस्चार्ज होणे, रिकामे होणे) होत असेल त्यावेळी रडण्यासारखे नाही. जर पूरण होत असेल आणि हसण्याची सवय पडली असेल तर कुणीही मूर्ख बनवू शकेल. जेव्हा दु:खाचे पूरण होत असते त्यावेळी रडता कशाला? पूरणात जर तुम्हाला हसायचे असेल तर हसा. पूरण म्हणजे, सुखाचे पूरण होत असेल तरी हसा आणि दु:खाचे पूरण होत असेल तरी पण हसा. पण यांची भाषाच वेगळी आहे ना! आवड-नावड, दोन्ही ठेवतात ना? सकाळी जे आवडत नसते तेच सायंकाळी आवडायला लागते. सकाळी म्हणेल 'तू चालती हो इथून' आणि सायंकाळी तिलाच म्हणेल, 'तुझ्याशिवाय मला करमणारच नाही.' म्हणजे भाषाच वेडगळपणाची वाटते ना!

जगाचा नियमच असा आहे की जे पूरण होते त्याचे गलन झाल्याशिवाय राहत नाही. सगळेच जण जर पैसे जमा करत असतील तर मुंबईत कोणीही म्हणाला असता की, 'मी सर्वात अधिक श्रीमंत आहे.' पण संतुष्ट होऊन कोणीच असे म्हणत नाही. कारण तसा नियमच नाही!

निसर्ग काय म्हणतो? 'त्याने किती रूपये खर्च केले, ते आमच्या

इथे पाहिले जात नाही. इथे तर कसले वेदनीय भोगले? शाता का अशाता (सुख की दु:ख) तेवढेच आमच्या इथे पाहिले जाते. पैसे नसले तरीही शाता भोगेल आणि पैसे असले तरी अशाता भोगेल.' म्हणजे जी काही शाता किंवा अशाता वेदनीय मनुष्य भोगतो, ते पैशांवर आधारित नाही. आता जर आपली कमाई थोडी कमी असेल पण बिल्कुल शांती असेल, कसली कटकट नसेल, तर आपण म्हणू की 'चला, जरा देवदर्शन करून येऊ!' आणि हे जे पैसे कमावण्याच्या मागे लागले आहेत, त्यांनी अकरा लाख कमावले त्याला हरकत नाही, परंतु नंतर जरी पन्नास हजाराचे नुकसान झाले तरी यांना अशाता उत्पन्न होते! अरे, अकरा लाखांमधून पन्नास हजार माइनस (वजा) कर ना!' तर म्हणतील 'नाही, मग तर माझी रक्कम कमी होणार ना!' अरे, तू रक्कम कशाला म्हणतोस? आली कुठून ही रक्कम? ती तर जबाबदारीवाली रक्कम होती म्हणून जेव्हा ती कमी झाली तेव्हा तू आरडाओरडा करू नकोस. जर रक्कम वाढली तर तू खुश होतोस आणि कमी होते तेव्हा? अरे, पुंजी तर 'आत' आहे, हार्ट फेल करून त्या पुंजीला कशाला घालवतोस? हार्ट फेल झाले तर सगळी पुंजी संपून जाईल ना?

**प्रश्नकर्ता :** हो, संपून जाईल.

**दादाश्री :** मग हे सर्व कशासाठी? तर त्यावर तो म्हणतो की, 'पण मला तर पैशांची पुंजीच किमती वाटते.' अरे, तुम्हाला आतील पुंजीची गरज नाही का?

वडीलांनी मुलाला दहा लाख रुपये दिले व म्हणाले की, 'आता मी अध्यात्मिक जीवन जगेन!' तर मग तो मुलगा नेहमी दारूत, मांसाहारात, शेअर बाजारात, सगळीकडे खर्च करून सर्व पैसे गमावून टाकतो. कारण जे पैसे चुकीच्या मार्गाने आलेले असतात, ते स्वत:जवळ राहत नाहीत. आज तर खरे धनही, खऱ्या मेहनतीचे धनही राहत नाही, तर चुकीचे धन तरी कसे राहील? म्हणजेच पुण्याने आलेल्या धनाची आवश्यकता आहे. ज्यात अप्रामाणिकता नसेल, दानत चोख असेल असे धन असेल तर ते सुख देईल, नाही तर, आता या दूषमकाळातील धन,

ते देखील पुण्याचेच म्हटले जाते, पण ते पापानुबंधी पुण्याचे आहे, त्याने तर निव्वळ पापच बांधले जाते! त्यापेक्षा त्या लक्ष्मीला म्हणावे की, 'तू येऊच नकोस, इथून जरा दूरच रहा, त्याने आमचीही शोभा राहील आणि तुझीही शोभा वाढेल.' हे जे बंगले बांधले जातात त्यात पापानुबंधी पुण्य उघडपणे दिसून येते. इथे क्वचितच कोणी असा असेल, हजारात एखादाच असा असेल की ज्याचे पुण्यानुबंधी पुण्य असेल. बाकीचे सर्व पापानुबंधी पुण्य आहे. इतकी लक्ष्मी असावी का कधी कुणाकडे? निव्वळ पापेच बांधत असतात हे, काही उपभोगत वगैरे नाहीत पण नुसते पापच बांधत असतात. हे तर तिर्यंचगतीचे (जनावर गतीचे) रिटर्न टिकीट घेऊन आलेले आहेत.

एक मिनिटभर सुद्धा राहता येणार नाही, असा हा संसार आहे! जबरदस्त पुण्य असूनही आतील अंतरदाह कमी होत नाही. अंतरदाह सतत जळतच असतो! चारी बाजूने सगळे फर्स्ट क्लास संयोग असले तरीही अंतरदाह चालूच राहतो, आता तो कसा थांबणार? शेवटी पुण्यही संपून जाते. जगाचा नियम आहे की पुण्य संपल्यावर काय होते? तर पापाचा उदय होतो. हा तर अंतरदाह आहे पण पापाचा उदय होतेवेळी जेव्हा बाह्य दाह उत्पन्न होईल तेव्हा तुझी काय दैना होईल? म्हणून सावध हो, असे भगवंत म्हणतात.

## पाप-पुण्य याची यथार्थ समज

**प्रश्नकर्ता :** पाप आणि पुण्य हे आहेत तरी काय?

**दादाश्री :** असे आहे, या दुनियेला चालविणारा कोणी नाही, जर कोणी चालविणारा असता तर पाप-पुण्याची काही गरज पडली नसती. पाप आणि पुण्य याचा अर्थ काय आहे? काय केले म्हणजे पुण्य मिळेल? जगातील लोक, जीवमात्र, भगवंत स्वरूपच आहेत. ही जी झाडे आहेत, त्यांच्यातही जीव आहे. लोक पण म्हणतात, की सगळे भगवंत स्वरूप आहेत, पण खरोखर तशी त्यांची श्रद्धा नाही. म्हणून झाडे तोडतात, कापतात, सर्व काही करतात. उगाचच झाडे तोडत असतात, म्हणजे सगळे नुकसानच करत असतात. जीवमात्राचे कोणत्याही

प्रकारे नुकसान करण्याने पाप बांधले जाते आणि कोणत्याही जीवाला कोणत्याही प्रकारे सुख देण्याने पुण्य बांधले जाते. तुम्ही बागेत पाणी शिंपडता तेव्हा जीवांना सुख होते की दुःख? ते जे सुख देता त्याने पुण्य बांधले जाते. कोणत्याही जीवाला थोडा जरी त्रास दिला तरी पाप बांधले जाते. बस, एवढेच समजून घेण्याची गरज आहे.

संपूर्ण जग भगवंत स्वरूपच आहे. आता हे जे शत्रू आणि मित्र वाटतात, ती सर्व भ्रांती आहे. ते भ्रांत ज्ञान दूर झाले तर सगळीकडे शुद्धात्माच आहेत. बाय रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंट तो गाढव आहे आणि बाय रिअल व्ह्यू पॉइंट तो शुद्धात्मा आहे. म्हणून कोणत्याही जीवाला किंचितमात्र सुख किंवा दुःख दिले तर आपल्यावर पुण्य किंवा पापाचा परिणाम होतो आणि तो परिणाम मग आपल्याला भोगावा लागतो.

**प्रश्नकर्ता :** परंतु मी पाप केले की पुण्य असे ज्ञान जर नसेल तरी पाप-पुण्य बांधले जाते का? जर त्याला असे ज्ञानच नसेल की मी हे पाप केले आणि हे पुण्य केले, तर त्याचा परिणाम होणारच नाही ना?

**दादाश्री :** निसर्गाचा नियम असा आहे की तुम्हाला ज्ञान असो वा नसो, तरी त्याचा परिणाम झाल्याशिवाय राहत नाही. तुम्ही हे झाड कापले आणि त्यात तुम्हाला जरी पाप-पुण्य समजत नसले, तरी पण झाडाला दुःख तर झालेच ना? म्हणून तुम्हाला पाप लागले. तुम्ही साखरेची पिशवी घेऊन चालले असाल, आणि पिशवीला भोक असेल आणि त्यातून साखर पडत राहिली, तर ती साखर कुणाच्या तरी कामाला येईल की नाही? खाली मुंग्या असतात त्या साखर घेऊन जातात. तर याला तुम्ही दान केले असे म्हटले जाते. जरी नकळत केले, पण दान तर झाले ना? तुम्हाला त्याची जाणीव नाही, तरी दान होत राहते ना? आणि मुंग्यांना सुख होते ना? त्याचे पुण्य तुम्हाला मिळते.

म्हणजे पुण्य आणि पाप या दोन्हींचा परिणाम होत राहतो. पुण्य असेल तर त्याचा परिणाम काय होतो? तुमच्या इच्छेनुसार सर्व होत राहते. पुण्याचा परिणाम काय आहे? तर आपल्या इच्छेनुसार सर्व होत राहते आणि पापाचा परिणाम काय होतो? तर जी इच्छा असेल त्याच्या

विरूद्धच सर्व होत राहते. असे काही उलटे फासे पडले होते? त्यात फासे टाकणाऱ्याची काही चूक आहे का? टाकणाऱ्याची चूक नाही. फासे टाकणारा तर तोच होता, पण जेव्हा पुण्याचा परिणाम होता तेव्हा फासे सरळ पडत होते आणि पापाचा परिणाम येतो तेव्हा सर्व फासे उलटे पडत जातात. जेव्हा पुण्याचा परिणाम असतो तेव्हा लोक 'या, या, या चंदुभाई, या चंदुभाई शेठ' म्हणतात आणि पापाचा परिणाम असतो तेव्हा 'जाऊ द्या, त्यांच्याबद्दल बोलूच नका!' असे म्हणतात. अर्थात चंदुभाई तर तेच आहेत, पण त्यांच्या पाप-पुण्याचा परिणाम लोकांवर पडत असतो!

## पाप-पुण्यापासून मुक्ती कशी मिळेल?

**प्रश्नकर्ता :** पाप धुवून टाकता येत असेल तर?

**दादाश्री :** असे धुता येत नाही. जोपर्यंत 'ज्ञानी पुरुष' मार्ग दाखवीत नाहीत, तोपर्यंत पाप धुता येणे शक्य नाही. पाप धुणे म्हणजे काय? तर प्रतिक्रमण करणे. अतिक्रमणाला पाप म्हणतात. व्यवहाराला सोडून कुठलीही क्रिया केली तर त्याला पाप म्हणतात. अतिक्रमण म्हणतात. म्हणून त्याचे प्रतिक्रमण करावे लागेल. त्यामुळे ती सर्व पापे धुतली जातील, नाही तर पापे धुतली जाणार नाहीत.

## पापाच्या उदयाच्या वेळी काय करावे?

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण केल्यामुळे कदाचित नवीन पाप बांधले जाणार नाही, पण जुनी पापे तर भोगावीच लागतील ना?

**दादाश्री :** तुमचे म्हणणे बरोबर आहे की प्रतिक्रमणाने नवीन पाप बांधले जाणार नाही पण जुनी पापे तर भोगावीच लागतात. पण ते भोगणे कमी होऊ शकते, त्यासाठी मी उपाय सांगितला आहे की तीन मंत्र एकत्रित म्हणावे. त्यानेही भोगण्याचे दु:ख हलके होईल. एखाद्याच्या डोक्यावर दीड मणाचे ओझे असेल आणि बिचारा त्रासून गेला असेल, पण त्याला एकदम अशी काही गोष्ट दिसली आणि त्याची नजर त्यावर पडली तर तो आपले दु:ख विसरतो, ओझे आहे तरी पण त्याला कमी

दु:ख वाटते. तसेच हे जे त्रिमंत्र आहेत, ते म्हटल्याने ओझे वाटणारच नाही, हे मंत्र हेल्पिंग (मदत करणारे) आहेत. तुम्ही कधी त्रिमंत्र म्हटले होते? एक दिवसच म्हटले होते? मग जरा जास्त म्हणा ना, म्हणजे सर्व हलके होऊन जाईल. आणि तुम्हाला भीती वाटत असेल तर ती पण बंद होऊन जाईल.

पुण्याचा उदय काय काम करतो? तर सर्व काही स्वत:च्या इच्छेनुसार होऊ देतो. पापाचा उदय काय करतो? सर्व काही आपल्या इच्छेच्या विरुद्ध करून टाकतो.

## तिथे वजाबाकी होत नाही

**प्रश्नकर्ता :** मनुष्य जर पुण्याच्या मार्गाने जात असेल तर मग पाप का येते?

**दादाश्री :** हा तर नेहमीचाच नियम आहे ना की, तुम्ही कोणतेही कार्य केले, समजा पुण्याचे कार्य केले तर तुमच्या खात्यात शंभर रुपये जमा होतील, आणि पापाचे कार्य केले, तेही थोडेसेच जरी एकच रुपयाचे असेल तरीही ते तुमच्या खात्यात उधारीत लिहिले जाईल. म्हणजे त्या शंभरातून एकही रुपया कमी होत नाही. असे जर कमी होत गेले असते तर कोणतेही पाप लागलेच नसते ना! म्हणजे दोन्ही वेगवेगळेच राहतात आणि दोन्हींची फळे देखील वेगवेगळीच येतात. पापाचे फळ येते तेव्हा कडू लागते.

## त्यात कोणाला दोष कसा देता येईल?

अशी कोणतीही वस्तू नाही की जी या पुण्यशालींना मिळणार नाही, पण असे पुरेसे पुण्य त्यांनी आणलेले नाही. नाही तर प्रत्येक वस्तू जशी हवी तशी मिळेल असे आहे, परंतु लोक लौकिक ज्ञानाच्या मागे लागले आहेत तोपर्यंत कधीही कोणतीही गोष्ट प्राप्त होऊ शकत नाही. हे लोक एकतर डोक्याने जरा तापट असतात, त्यात त्यांना *'बूधे नार पांसरी'* (अर्थात पत्नीला धमकावून मारपीट करूनच ताब्यात ठेवता

येते) असे ज्ञान मिळाले म्हणजे त्याला हवे तेच मिळाले! असे जे ज्ञान मिळाले ते ज्ञान त्याला फळ देईल की नाही? मग काय होणार? ज्या स्त्रीच्या पोटी तीर्थंकर जन्मले, त्या स्त्रीची तुम्ही काय अवस्था करून ठेवली आहे, ते तरी पाहा? किती अन्याय आहे हा? ज्या स्त्री जातीच्या पोटी चोवीस तीर्थंकर जन्म घेतात, बारा चक्रवर्ती जन्म घेतात, वासुदेव जन्म घेतात, तिथेही तुम्ही असे वागता? तुम्हाला जरी कडू अनुभव आला असेल पण त्यामुळे संपूर्ण स्त्री जातीची निंदा का करता? तुम्ही बारा रुपये डझनाचे आंबे आणता, पण ते आंबट निघतात आणि तीन रुपये डझनवाले आंबे चांगले गोड निघतात. म्हणजे बरेच वेळा वस्तू त्याच्या किमतीवर आधारित नसते, तर तुमच्या पुण्यावर आधारित असते. आपले पुण्य जर जोरदार असेल तर आंबे खूप गोड निघतील. आणि जे आंबट निघाले, त्यात तुमचे पुण्य जोरदार नव्हते, मग त्यात कुणाला दोष कसा देता येईल?

म्हणजे ही तर पुण्याची कमतरता आहे, दुसरे काय? मोठा भाऊ मिळकत देत नसेल तर काय तो मोठ्या भावाचा दोष आहे का? आपलेच पुण्य कमी पडले. त्यात दोष कोणाचाही नाही. पण हा तर पुण्य सुधारत नाही आणि उलट मोठ्या भावाशी पापेच बांधतो! मग पापाचे ढीग जमा होतात.

## आणि पुण्य अशा तऱ्हेने बांधले जाते

**प्रश्नकर्ता :** पुण्य कसे सुधारता येते?

**दादाश्री :** जो येईल त्याला 'या भाऊ बसा' असे म्हणून त्याचा सत्कार करावा. आपल्याकडे चहा असेल तर चहा, नाही तर जे असेल ते, भाकरीचा तुकडा असेल तर तो त्याला द्यावा. त्याला विचारावे 'भाऊ, भाकरी खाणार?' असे प्रेमाने वागाल तर पुण्य खूप मिळेल. परक्यांसाठी काही करणे, हेच पुण्य! घरच्या मुलांसाठी तर सगळेच करतात.

### पुण्याची साथ मोक्षापर्यंत

**प्रश्नकर्ता :** पुण्याचे भाव आत्मार्थासाठी हितकर आहेत?

**दादाश्री :** पुण्य आत्मार्थासाठी हितकर आहे ते यासाठी की, पुण्य असेल तर इथे सत्संगात 'ज्ञानी पुरुषां'जवळ येऊ शकाल ना? नाही तर या मजुरांना पाप आहे म्हणून ते बिचारे इथे कसे येऊ शकतील? दिवसभर कष्ट करतात तेव्हा कुठे संध्याकाळी जेवणासाठी पैसे मिळतात. या पुण्यामुळेच तर तुम्हाला घर बसल्या जेवायला मिळते आणि थोडाफार वेळ देखील मिळतो. म्हणजेच पुण्य आत्मार्थासाठी हितकर आहे, पुण्य असेल तर सवड मिळते, आपल्याला असे संयोग लाभतात, थोड्या मेहनतीने पैसे मिळतात, शिवाय पुण्य असेल तर दुसरी पुण्यशाली माणसेही भेटतात, नाही तर नालायक माणसे भेटतात.

**प्रश्नकर्ता :** आत्म्यासाठी ते जास्त हितकर आहे का?

**दादाश्री :** जास्त हितकर नाही, पण त्याची आवश्यकता तर आहेच ना? आणि कधी 'एक्सेप्शनल' (अपवादात्मक) केसमध्ये पापही खूप हितकर ठरते, पण पुण्यानुबंधी पाप असले पाहिजे. पुण्यानुबंधी पाप असेल तर जास्त हितकर होईल. पण आता तर सर्व पापानुबंधीच पुण्य आहे. बंगला आहे, मोटार आहे, सर्व काही आहे, तरी पण दिवसभर 'कोणाकडून मिळवू, कोणाचे हिसकावून घेऊ, कोणाचे लुटू' असेच वाटत राहते. हे तर तिर्यंचच्या स्टेशनवर जाण्याचे पुण्य आहे.

**प्रश्नकर्ता :** पुण्य बंधनामुळे संसार वाढतो, असाच भावार्थ आहे ना?

**दादाश्री :** पुण्य तसे हितकर नाही, पण पुण्य एक प्रकारे मदत करते. पाप असेल तर ज्ञानी पुरुष भेटतच नाहीत. त्याला ज्ञानी पुरुषाला भेटायचे असते पण दिवसभर मिलमध्ये नोकरी करत असेल तर कसे भेटता येईल? म्हणजे पुण्य अशा प्रकारे मदत करते.

**प्रश्नकर्ता :** जसा पापामुळे संसार वाढतो तसा पुण्यामुळेही संसार वाढतो ना?

**दादाश्री :** पुण्यामुळे देखील संसार वाढतो, पण जसजसे पुण्य

वाढते, तसतसे संसार वाढतो, आणि तसतसे मनुष्यात वैराग्य उत्पन्न होते, नाही तर खरे वैराग्य उत्पन्नच होणार नाही. हे तर जोपर्यंत मिळत नाही तोपर्यंत तसे वाटत राहते, पण जर मिळाले तर परत जसा होता तसाच बनतो. म्हणून त्याला सगळे एक्सपिरियन्स (अनुभव) मिळाले पाहिजेत. इथून जे मोक्षाला गेले, ते सर्व जबरदस्त पुण्यशाली होते. पाहायला जावे तर त्यांच्या आसपास दोनशे-पाचशे तर राण्या असत आणि खूप मोठे राज्य असायचे. सूर्यनारायण कधी उगवत आणि कधी मावळत हे त्यांचे त्यांना समजतच नसे. अशा थाटामाटात तर पुण्याशाली जन्माला येतात. खूप साऱ्या राण्या असतात, थाटमाट असतो तरी ते कंटाळलेले असतात की, या संसारात सुख तरी काय आहे बरे? पाचशे राण्यांपैकी पन्नास राण्या त्यांच्यावर खुश असतात, बाकीच्या तोंड फुगवून फिरत राहतात, कित्येक राण्या तर राजाला मारून टाकण्यासाठी प्रयत्नात असत. म्हणजे हे जग फारच अडचणींचे आहे. यातून मुक्त होणे फारच कठीण आहे. 'ज्ञानी पुरुष' भेटले तर तेच एकमेव आपली मुक्ती करू शकतात, नाही तर दुसरा कोणी मुक्त करू शकत नाही. ज्ञानी पुरुषांची मुक्ती झालेली असते त्यामुळे ते आपली मुक्ती करू शकतात. ते तारणहार झालेले आहेत. म्हणून ते मुक्त करू शकतात.

## पाप-पुण्य, किंमती की भ्रांती?

**प्रश्नकर्ता :** जे पुण्यशाली असतात त्यांना सगळे 'या, बसा' असे म्हणतात, तर त्यामुळे त्यांचा अहम् वाढणार नाही का?

**दादाश्री :** असे आहे ना की, ही गोष्ट ज्याला 'ज्ञान' आहे त्याच्यासाठी नाही. ही तर संसारी गोष्ट आहे. ज्याच्याजवळ ज्ञान आहे त्याच्यासाठी तर आता पुण्यही राहिले नाही आणि पापही राहिले नाही! त्याला तर दोन्हींचा निकाल करणेच शिल्लक असते. कारण पुण्य आणि पाप दोन्हीही भ्रांती आहेत. पण जगाने त्याला खूप किमती मानले आहे. म्हणजे हे तर आम्ही जगातील लोकांबद्दल बोलत आहोत.

पण या जगात लोक उगाचच हात पाय मारत असतात. एक

माणूस तर पन्नास-बावन वर्षाचा झाल्यावर मला म्हणाला, 'आता माझे ग्रह बदलतील असे वाटते.' अरे, आतापर्यंत तर काही ठिकाणा नव्हता आणि आता तुझ्याजवळ लक्ष्मी कशी काय येईल? उगाच गोंधळ घालतोय ना! कसली आशा करत आहेस? जे आहे ते सांभाळ आणि झोप ना गुपचुप. जी आशा, निराशेमध्ये बदलते अशी आशा काय कामाची? आशा कशी असली पाहिजे? आशा अशी असावी की जी परिपूर्ण होईल.

पुण्य तर फार मोठी गोष्ट आहे, पण या काळात एवढे पुण्य नसते. आणि हे तर पापानुबंधी पुण्य आहे. चार-चार गाड्या असतात, पण जेव्हा ते शेठ येतात तेव्हा लोक म्हणतात, 'जाऊ द्या, यांच्याबद्दल बोलूच नका.'

## जिथे अज्ञान, तिथेच पाप-पुण्य याचे बंधन

तरीही सर्व जग असेच्या असेच चालत राहील!

जोपर्यंत अशी मान्यता आहे की, 'मी चंदुलाल आहे', तोपर्यंत कर्मबंधन होतच राहील. दोन प्रकारची कर्मे बांधली जातात. पुण्य केले तर सद्भावाचे कर्म बंधन होते आणि पाप केले तर दुर्भावाचे कर्मबंधन होते. जोपर्यंत हक्काचे आणि बिनहक्काचे याचे विभाजन होत नाही, तोपर्यंत इतर लोकांचे पाहून तोही शिकतो. मनात काहीतरी वेगळे असते, वाणीने काही तिसरेच बोलतो, आणि वर्तन तर काही वेगळ्याच प्रकारे असते. आता हे मन, वाणी आणि वर्तन जोपर्यंत एकाकार होत नाहीत तोपर्यंत कधीही पुण्य बांधले जाणार नाही, म्हणजे फक्त पापेच बांधली जाणार. म्हणून तर सध्या लोकांची पापाचीच कमाई आहे.

## पुण्य तर पुण्यानुबंधीच असावे

एक प्रकारचे पुण्य असे असते की ते भटकायला लावत नाही, असे पुण्य या काळात फारच कमी असते आणि तेसुद्धा आता काही काळानंतर संपून जाईल, त्याला पुण्यानुबंधी पुण्य म्हणतात. आणि आता

हे जे सर्व पुण्य दिसत आहे त्याला पापानुबंधी पुण्य म्हणतात, आणि असे पुण्य भटकायला लावते.

**प्रश्नकर्ता :** पुण्यानुबंधी पुण्याचे उदाहरण द्यावे.

**दादाश्री :** समजा आज कोणाकडे मोटर-बंगला वगैरे सर्व काही आहे, पत्नी चांगली आहे, मुले चांगली आहेत, नोकर चांगले आहेत, तर हे जे सर्व चांगले मिळाले आहे, त्याला काय म्हणतात? लोक तर म्हणतील की 'पुण्यशाली आहे.' पण आता हा पुण्यशाली काय करत आहे हे जर आपण पाहिले तर तो दिवसभर साधु-संतांची सेवा करत असतो, लोकांची सेवा करत असतो, आणि मोक्षासाठी तयारी करत असतो. असे सर्व करत करत त्याला मोक्षाचे साधन मिळून जाते. म्हणजे असे करत असेल तर आपण समजू की हे पुण्यानुबंधी पुण्य आहे, आताही पुण्य आहे आणि नवे पुण्य बांधत आहे. नाही तर त्या (पापानुबंधी) पुण्यात तर निव्वळ पापाचेच विचार येतात की, 'कोणाचे हिसकावून घेऊ आणि कोणाचे लुटू आणि कोणाचे गोळा करून ठेऊ.' तो असे बिनहक्काचे उपभोग घेतो. त्याला पापानुबंधी पुण्य म्हणतात.

## तर मग पुढील जन्मही बिघडेल

**प्रश्नकर्ता :** सध्याचा काळ असा आहे की माणूस स्वत:चे भरणपोषणही पूर्णपणे करू शकत नाही. ते पूर्ण करण्यासाठी त्याला काहीतरी खरे-खोटे करावे लागते, तर तसे करू शकतो का?

**दादाश्री :** असे आहे की, हे तर उधारी करून दारू पिण्यासारखे आहे, तसा हा व्यापार आहे. काही चांगले केले तर पुण्य मिळते आणि (पूर्वी) जे चुकीचे केले होते त्यामुळेच तर आता कमी पडत आहे. आता कमी पडते, त्याचे कारण काय? तर ते पाप आहे, आणि म्हणून आज कमी पडत आहे, भाजी नाही, दुसरे काही नाही. तरी पण जर आता चांगले विचार येत असतील, धर्माचे-देवळात जाण्याचे, उपाश्रयात जाण्याचे विचार, काही सेवा करण्याचे विचार येत असतील तर ते

पुण्यानुबंधी पाप आहे. आज पाप आहे, पण तरी तो पुण्य बांधत आहे. पण पाप आहे आणि पुन्हा पापच बांधणे, असे होता कामा नये. पाप आहे, कमी पडत आहे आणि पुन्हा तसेच चुकीचे केले तर मग आपल्याकडे उरलेच काय?

**प्रश्नकर्ता :** हे तर पूर्ण सर्कलच आहे ना, ब्लॉक, मुलांचे शिक्षण, जगण्यासाठीच्या सर्व गरजा, यासाठी काही चुकीचे केल्याशिवाय पुरे भागणारच नाही, मग चुकीचे करावे की नाही?

**दादाश्री :** पुरे पडो वा ना पडो, तरी पण चुकीचे काम तर करूच नये.

**प्रश्नकर्ता :** मग घरी पत्नी म्हणेल, 'यांच्यात कमावण्याचे सामर्थ्य नाही.'

**दादाश्री :** मग तुम्ही म्हणा की माझ्यात सामर्थ्य नाही, म्हणून तर ही सर्व फजिती झाली आहे. माझ्यात सामर्थ्य नाही, मग तुला दुसऱ्या कोणाबरोबर लग्न करायचे असेल तर कर.

**प्रश्नकर्ता :** असे म्हटल्यामुळे समोरच्याला वाईट वाटले तर?

**दादाश्री :** तर माफी मागून घ्यावी.

**प्रश्नकर्ता :** पण पाप तर लागेल ना?

**दादाश्री :** निव्वळ पापेच तर बांधली जात आहेत ना? सकाळी उठल्यापासून सायंकाळपर्यंत फक्त पापेच बांधत आहे! मोक्षाचा मार्ग तर सोडा पण नुसती पापेच बांधत आहे.

## वास्तविक ज्ञानच समस्या सोडवील

लोकांना जे माहीत आहे ते लौकिक ज्ञान आहे. खरे ज्ञान तर वास्तविक असते आणि जेव्हा वास्तविक ज्ञान असते तेव्हा कोणत्याही प्रकारची अस्वस्थता वाटत नाही. ते आत कोणत्याही प्रकारचे कोडे निर्माण होऊ देत नाही. आणि या भ्रांती ज्ञानामुळे तर फक्त कोडीच

निर्माण होत असतात. आणि ती कोडी मग सुटतच नाहीत! गोष्ट खरी आहे पण ती समजली पाहिजे ना? हे सगळे नीट समजल्याशिवाय तर कधीच उलगडा होणार नाही. नीट समजून घेतले पाहिजे. नीट समजण्यासाठी पापे धुवावी लागतात. जोपर्यंत ही पापे धुतली जात नाहीत तोपर्यंत काहीही जाग्यावर येत नाही. ही सर्व पापेच गोंधळात टाकतात. यात जे पापरूपी आणि पुण्यरूपी अडथळे आहेत, तेच माणसाला गोंधळात टाकतात!

अनंत जन्म भटकूनही या भौतिकच्याच मागे लागले आहेत. भौतिकमुळे अंतर शांती मिळत नाही. पैशांचे अंथरूण अंथरल्याने काय झोप येणार आहे? अशाने तर स्वतःच्या अनंत शक्ती वाया गेल्या!



# [ 12 ]
# कर्तेपणामुळेच थकवा

## मी जात आहे की गाडी जात आहे?

इथे तर उपयोग आणि जागृतीशिवाय वेळ निघून जात असतो. उपयोगपूर्वक म्हणजे ॲलर्टनेस (सतर्कता) असला पाहिजे. अशाच गप्पा मारणे आणि डुलक्या घेत राहणे याला उपयोग नसणे असे म्हणतात, त्याने आपल्याला काय मिळणार? गाडी चालू असताना गाडीत गप्पा मारतो, त्यापेक्षा गाडीत ॲलर्ट राहू शकतो की नाही? आपण सेन्ट्रल स्टेशनवर जाऊन गाडीत बसावे. असे म्हणू नये की, 'मला आणंदला जायचे आहे.' आपण गाडीत बसायचे आणि गाडी आणंदला जाईल. आणि आणंद स्टेशनवर लोक 'आणंद आले, आणंद आले' म्हणतील, तेव्हा आपण आणंदला उतरायचे.

गाडी आणंदला जात असते, तर लोक काय म्हणतात? गाडीत बसल्या बसल्या बोलतात की, 'मी आणंदला चाललो आहे, परत भेटू.' 'अरे, पण तू कुठे चालला आहेस? गाडी चालली आहे.' असे आपण म्हटले तरी पण तो म्हणेल, 'नाही, मी चाललो आहे.' लोकांचा व्यवहार हा असा आहे. त्याला नाकारूनही चालणार नाही ना! चुकीचेही म्हणता येणार नाही. पण आपल्याला समजले पाहिजे की, 'गाडी चालली आहे.' आपण असे म्हणू नये की 'मी आणंदला चाललो आहे.' नाही तर

गाडीत बसल्या बसल्या थकवा लागेल. म्हणून आपण ही गोष्ट नीट समजून घ्यायची आणि गाडीत बसून राहायचे.

**प्रश्नकर्ता :** मोटारीतून जात असू तरीही 'मी जात आहे' असे बोलू नये?

**दादाश्री :** कुठेही जात असाल तरी असे बोलू नये. कारण मोटर जात असते. 'मी जात आहे' म्हटले की थकवा वाटेल. आता जर तो गाडीत झोपून राहिला असेल तरी आणंद येईल की नाही? आणि बसून राहिला असेल तरी पण आणंद येईलच ना? आणि कोणी गाडीत घाई करत असेल आणि सारखे पाहत असेल की 'हे भरूच आले की बडोदा?' तरीही आणंद येईल की नाही? म्हणजे आपल्याला फक्त समजून घ्यायचे आहे की गाडी आली आहे, आपण नाही. आपण तर तिथल्या तिथेच होतो! नाही तर उगाचच थकवा येईल! गाडीत बसूनही थकवा येत असेल, तर याला काय म्हणावे?

आम्हाला कुठेही थकवा वाटत नाही. का वाटत नाही? कारण मी कुठे जात किंवा येत आहे? गाडी जाते किंवा येते. मग मला थकवा का यावा? लोक जाणूनबुजून असे बोलत असतील? की मग हे सगळे उलटेच आहे? हा व्यवहार उलटा आहे, पण तरी आपण का उलटा व्यवहार करावा? आता आपल्याला सरळ व्यवहार समजला आहे, तर मग कोणी उलटा व्यवहार करेल का? व्यवहार हा स्वभावतःच उलटा आहे, त्याचे नावच रिलेटिव्ह आहे! हे रिलेटिव्ह आहे. रिलेटिव्ह म्हणजे काय की कोणत्या तरी आधारावर असे म्हणतात की, 'मी जात आहे.' कसला आधार ? तर म्हणतील, लोक पण असेच म्हणतात की 'मी जात आहे' हा आधार आहे, म्हणून आपणही म्हणतो की, 'मी जात आहे.' पण आता आपल्याला त्या आधाराची गरज नाही, आपल्याला आता दुसरा आधार हवा आहे की, 'वास्तवात मी जात नाही, वास्तवात तर गाडी जाते.' गाडीत जर कोणी घाई-गडबड केली तर काय तो लवकर पोहोचेल?

**प्रश्नकर्ता :** नाही पोहोचणार.

**दादाश्री :** का? मी आज फार घाईत आहे, गाडीतून उतरलो की सरळ कोर्टात जाईन. अशी घाई-गडबड करून त्रास करून घेतला तर? आणि कुणी गाडीत आरामात झोपला तर? दोघेही मुंबईला पोहोचतील की नाही? त्रास करून घेणारा तर मुंबईला पोहोचता पोहोचता अर्धा होऊन गेलेला असतो.

**प्रश्नकर्ता :** जीवन व्यवहार करताना येणाऱ्या संयोगाशी सामना करताना जो थकवा येतो, त्याचे हेच कारण आहे का?

**दादाश्री :** तुमचा शोध बरोबर आहे! आपल्याकडे लोक गाडीने मुंबईहून येतात आणि बडोद्याला उतरतात. आणि मग म्हणतात, 'मी खूप थकलो आहे.' अरे, तुम्ही खूप धावाधाव केली ना! रात्रभर धावत होतात म्हणून थकलात ना? गाडीचे भाडे दिले की गाडीवाला पण त्याला म्हणतो 'तुम्ही झोपून जा.' मग जर तुम्हाला बसून जायचे असेल तर बसून जा, तुम्हाला आवडेल तसे जा. पण तरीही तो काय म्हणेल, 'मी बडोद्याला जात आहे.' म्हणजे 'मी जात आहे', असे म्हटल्यामुळे थकवा येतो. फक्त 'सायकॉलॉजिकल इफेक्ट' (मानसिक परिणाम) यामुळेच थकवा येतो. आम्ही तर आरामात बडोद्याला उतरतो. कोणी विचारले, तुम्हाला गाडीत थकवा आला का? तेव्हा मी म्हणतो, 'मला कसला थकवा? मी गाडीत बसलो होतो, मग तिथेच आराम केला. झोपून गेलो आणि झोपूनच इथपर्यंत आलो.' सर्व जण ओरडले 'बडोदा आले, बडोदा आले' तेव्हा मी उतरलो. त्यात मला कशाला थकवा येईल? 'मी जात आहे' अशी या लोकांची चुकीची समजूत आहे, म्हणून शरीरावर त्याचा परिणाम होतो.

## अनुभव आल्यानंतर सावध झालो

कोणी व्यक्ती मुंबईहून बडोद्याला जात असेल, झोपण्याची व्यवस्था होण्याची वाट पाहत असेल आणि पालघर आल्यावर गाडीत थोडी जागा रिकामी झाली की, त्याने बिस्तरा पसरला तर आपल्याला हे समजणारच ना की हा किती मूर्ख माणूस आहे? आता तासाभरात तर उतरायचे

आहे, मग हा कशाला बिस्तरा पसरत आहे? मला ज्ञान झाले नव्हते तेव्हा मी देखील म्हणत असे की 'केस पांढरे झाले तरी कशाला बिस्तरा पसरत आहात? बिस्तरा पसरवून आता काय मिळणार आहे?' जग हे असे आहे!

या लोकांना पाहून मलासुद्धा बिस्तरा सोबत नेण्याची वाईट सवय लागली होती. लोक मोठे-मोठे बिस्तरे घेऊन जात, म्हणून मीही मुंबईतून एक बिस्तरा खरेदी केला आणि आत गादी घालून प्रवासाला जाऊ लागलो. नेहमी हमाल मिळत, पण एकदा हमाल मिळाला नाही आणि मला काही बिस्तरा उचलता येईना. मग माझी काय अवस्था होणार? उचलता उचलता माझा दम निघाला आणि उचलणारा कोणी मिळाला नाही. तेव्हापासून शपथ घेतली की यापुढे जेवढे उचलता येईल तेवढेच सामान गाडीत बरोबर घेईन. म्हणून आता फक्त इतकी लहानशी बॅग ठेवतो आणखी काही भानगड नाही. आणि अंथरण्यासाठी चादर. ती चादर अंथरून बॅगला उशीसारखे ठेवून झोपून जातो. बॅग जर टोचू लागली तर बॅगेतून टॉवेल काढून डोक्याखाली ठेवला की कटकट मिटली. बिस्तरा उचलून तर माझा दम निघाला होता, तेव्हा मला समजले की, या लोकांच्या स्पर्धेत मी कसा काय पडलो? जर हमाल मिळाला नाही तर आपली काय अवस्था होईल? बिस्तरा स्टेशनवर थोडेच टाकून येणार? तो तर घरी आणावाच लागेल ना? आत चिडचिड होते की, 'चला आता, हमाल नाही, त्यापेक्षा याला इथेच सोडून द्यावा!' पण स्वभाव असा होता की सोडू शकत नव्हतो. कारण ममतेचा स्वभावच असा असतो की ती काहीच सोडत नाही.

मला ज्या ज्या गोष्टी समजत गेल्या त्या गोष्टी मी लगेच सोडून देत असे. जिथे मार खावा लागे तिथे लगेच सोडून देत असे. मग निश्चय करत असे. पण या सर्व गोष्टी मला ज्ञान होण्यापूर्वीच्या आहेत. ज्ञान होण्यापूर्वी माझ्यात अशा सर्व दृष्टी उत्पन्न झाल्या होत्या.

## ...तेव्हा दोन्ही बाजूंनी मुक्त झालो

ज्ञान होण्यापूर्वी, सर्वजण मला सोडण्यासाठी स्टेशनवर येत,

गाडीत बिस्तरा पसरून देत. आणि गाडी सुरू झाली की म्हणत 'परत भेटू अंबालाल काका! या.' मग गाडी पुढे गेली की ते सर्व दिसेनासे होत, म्हणजेच बडोद्याशी अजून बांधले गेलो नाही आणि मुंबईतून मुक्त झालो, मग आता कशात राहायचे? मोक्षात राहायचे. म्हणजे ज्ञान होण्यापूर्वी मी असा मोक्षात राहत असे. इथून सुटलो आणि तिथे अजून बांधलो गेलो नाही याला कुठला काळ म्हणायचा? याला तर मुक्तीच म्हणायची ना! तर आम्ही असा लाभ करून घेत असू. आणि लोक काय करतात की, मुंबई सोडली तरी मुंबईबरोबरच घेऊन जातात आणि बडोदा येण्यापूर्वी आत बडोदा घेऊन बसतात, म्हणून गोंधळलेलेच असतात. आणि मी तर ठरवलेलेच असते की मुंबईतून मुक्त झालो आणि बडोदा अजून आले नाही, म्हणजे आतून मुक्त. मधला काळ तो मोक्ष काळ! सोपी गोष्ट आहे ना? आम्हाला ज्ञान होण्यापूर्वी आत असे वेगवेगळे विचार स्फुरत असत. याला एक चांगले स्फुरण म्हणता येईल ना!

याप्रमाणेच तू झोपताना, स्वतःच्या खोलीत पलंगावर झोपतोस, तेव्हा कोणी तुझ्या पलंगात घुसते का? नाही ना? तर त्यावेळी तू असे म्हण की मी घरापासून, सर्वांपासून मुक्त झालो आणि पलंगाशी बांधलो गेलेलो नाही. कारण पलंग थोडेच आपल्याला बांधतो? अशी मुक्त दशा मिळाली, तर काय वाईट आहे?



# [ 13 ]
# लक्ष्मीचा भोगवटा

## कमावण्यात घालवले आयुष्य

**दादाश्री :** धोराजीहून कलकत्याला तुम्ही कशासाठी आलात?

**प्रश्नकर्ता :** उदरनिर्वाहासाठी

**दादाश्री :** उदरनिर्वाह तर जीवमात्र करतच असतात. कुत्रे, मांजरी सगळे आपापल्या गावी राहूनच उदरनिर्वाह करतात. ही मथुरेची माकडेसुद्धा तिथल्या तिथेच, कोणाकडूनही चणे घेऊन आपला उदरनिर्वाह करत असतात. ते काही दुसऱ्या शहरात जात नाहीत, मथुरेतच राहतात आणि आपले लोक तर सगळीकडे जातात!

**प्रश्नकर्ता :** लोभी दृष्टी आहे ना, त्यामुळे.

**दादाश्री :** हो, हा लोभ त्रास देतो, निर्वाह त्रास देत नाही. निर्वाह त्रास देईल असा नाहीच. निर्वाह तर माणूस जिथे असेल तिथे त्याला मिळेलच. मनुष्यत्व तर महान सिद्धी आहे, त्याला प्रत्येक गोष्ट मिळते. पण तो लोभामुळे सतत भटकत राहतो. 'इथून घेऊ की तिथून घेऊ, इथून घेऊ की तिथून घेऊ' असे करत राहतो. इथे कलकत्यापर्यंत आले पण कोणी असे म्हणत नाही की 'मी आता संतुष्ट आहे!'

**प्रश्नकर्ता :** संतोष असेल तर मग दुःख कसले?

**दादाश्री :** नाही, नाही, संतोषाचे काही नाही. कमावण्यासाठी

इथपर्यंत आले होते, तर आता कमावल्यावर कोणी असे म्हणत नाही की, 'माझ्याकडे पाच अरब रुपये जमले आहेत, आता मला आणखी काही गरज नाही.' असे म्हणणारा मला कोणी भेटला नाही. पाच अरब नाही तर 'एक अरब जमले आहेत' असे जरी कोणी म्हणाला तरी मी समजू शकतो की बाबा, हे कलकत्याला आले होते तेच आहेत. शाबास! बँकेत तुमचे किती पैसे आहेत? पन्नास एक लाख रुपये आहेत?

**प्रश्नकर्ता :** काय सांगू साहेब?

**दादाश्री :** काय सांगता शेठ? जर धोराजीहून इथे आला आहात, तरी बँकेत काही नाही? पाहा तरी, किती लाजिरवाणे झाले आहे, तिथून इथे आलात आणि इथे अडकून पडलात! म्हणजे तुम्ही इथलेही राहिले नाहीत आणि तिथलेही राहिले नाहीत.

भगवंताच्या भाषेत संपत्ती कशाला म्हणतात? तर जी संपत्ती गुणाकारवाली असते तिला. गुणाकारवाली संपत्ती बरोबर घेऊन जातात आणि स्वतःला संतोषही होतो. जी संपत्ती भागाकारवाली असते, तिला भगवंताने संपत्ती मानलेलेच नाही. भागाकारवाली संपत्ती तर तो जेव्हा इथे मरतो, तेव्हा ती संपत्तीही निघून जाते.

## ...ते धन जमा होते

पैशाचा स्वभाव कसा आहे? चंचल आहे, म्हणून येतात आणि परत एक दिवस निघूनही जातात. म्हणून पैसे लोकहितासाठी खर्च केले पाहिजेत. जेव्हा तुमचा वाईट उदय येतो तेव्हा तुम्ही जे लोकांना दिलेले असते तेच तुम्हाला मदत करते. म्हणून आधीच समजून घेतले पाहिजे. पैशांचा सद्व्यय तर केलाच पाहिजे ना?

समंजस चारित्र्य झाले की संपूर्ण जग जिंकले. मग भले जे खायचे ते खा-प्या आणि जास्त असेल तर दुसऱ्यांना खाऊ घाला. दुसरे काय करायचे मग? सोबत थोडेच घेऊन जाता येते? जे धन दुसऱ्यांसाठी खर्च होते तेवढेच धन आपले, तेवढीच पुढील जन्मासाठीची शिल्लक (जमापुंजी). म्हणजे जर कोणाला पुढील जन्मासाठी शिल्लक जमा

करायची असेल तर दुसऱ्यांसाठी धन खर्च करा. मग परका जीव म्हणजे कोणताही जीव, मग तो कावळा का असेना, तो जरी इतकेच चाखून गेला तरी पण तुमची शिल्लक जमा होते. कावळ्याला थोडे खायला दिले आणि त्याने खाल्ले, तर ती तुमची शिल्लक, पण तुम्ही आणि तुमच्या मुलांनी खाल्ले तर ती काय तुमची शिल्लक नव्हे, ते सर्व गटारात गेले. तर काय असे गटारात जाणे बंद करता येते? नाही, ते तर अनिवार्य आहे, गत्यंतरच नाही? पण हेही समजले पाहिजे की जे परक्यांसाठी खर्च केले नाही ते सर्व गटारातच जाते.

माणसांना खाऊ घातले नाही तर शेवटी कावळ्यांना खाऊ घाला, चिमण्यांना खाऊ घाला, सर्वांना खाऊ घाला. तरी ते परक्यांसाठी खर्च केले असे मानले जाईल. माणसाच्या जेवणाच्या थाळीची किंमत तर आता खूप वाढली आहे ना? पण चिमण्यांच्या थाळीची किंमत फार नाही ना? मग जमा पण तेवढे कमीच होणार ना?

## दानाच्या हेतूनुसार फळ प्राप्ती

**प्रश्नकर्ता :** काही जण असे म्हणतात की दान केल्यामुळे आपण देवता बनतो, ते खरे आहे ना?

**दादाश्री :** दान देऊनही नरकात जातात, असेही आहेत. कारण ते दान कुणाच्यातरी दबावाखाली देतात. असे आहे की या दूषमकाळात दान देता येईल अशी लक्ष्मीच नसते. दूषमकाळातील जी लक्ष्मी आहे ती अघोर कर्तव्यवाली लक्ष्मी आहे. म्हणून त्या लक्ष्मीचे दान दिले तर उलट नुकसानच होईल, तरी पण कुणा दुःखी माणासाला दिली, दान देण्याऐवजी त्याच्या अडचणी दूर करण्यासाठी काही केले तर ते चांगले आहे. दान तर नाव कमावण्यासाठी करतात, त्याला काय अर्थ आहे? जो भुकेला आहे त्याला खायला द्या, कपडे नसतील तर कपडे द्या. नाही तर या काळात दान देण्यासाठी पैसे कुठून आणणार? सगळ्यात चांगले म्हणजे दान–बीन देण्याची गरजच नाही. आपले विचार चांगले ठेवा. दान देण्यासाठी धन कुठून आणायचे? खरे धन आलेच नाही ना! आणि खरे धन सरप्लस राहतच (उरतच) नाही. हे जे मोठे मोठे दान

देतात ना, ते वहीखात्या बाहेरचे, म्हणजे वरचे धन आले आहे, ते आहे. तरीही जे दान देतात, त्यांच्यासाठी ते चुकीचे नाही. कारण चुकीच्या मार्गाने मिळवले आणि चांगल्या मार्गाने दिले, तरी पापातून मुक्त तर झाला! शेतात बी पेरले, म्हणून ते जेव्हा उगवले तेव्हा तेवढे फळ तरी मिळेल!

**प्रश्नकर्ता :** कविराजांच्या भक्तीपदात एक ओळ आहे ना की, *'दाणचोरी करनाराओ, सोयदाने छुटवा मथे.'* (तस्करी करणारे, सुई एवढे दान करून सुटू पाहतात.) तर यात एका ठिकाणी तस्करी केली आणि दुसऱ्या ठिकाणी दान दिले तर त्याने तेवढे तरी प्राप्त केले, असे म्हणू शकतो का?

**दादाश्री :** नाही, प्राप्त केले असे म्हणता येणार नाही. ती तर नरकात जाण्याची निशाणी आहे. त्याची दानत वाईट आहे. तस्कराने चोरी केली आणि सुईचे दान दिले, त्यापेक्षा जरी दान दिले नाही पण सरळ वागला असता तरी बरे झाले असते. असे आहे की, सलग सहा महिन्यांची जेलची सजा बरी, मध्येच दोन दिवस बागेत घेऊन जातील याला काय अर्थ आहे?

या कवीला काय सांगायचे आहे की, हे सर्व काळा बाजार, तस्करी, वगैरे सर्व केल्यानंतर स्वत:चे नाव खराब होऊ नये, स्वत:चे वाईट दिसू नये, म्हणून पन्नास हजार दान देतात. त्याला सुईचे दान म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे आज तर तसे सात्विक लोक नाहीतच ना?

**दादाश्री :** संपूर्ण सात्विकतेची आशा तर ठेवूच शकत नाही ना! पण हे कोणासाठी आहे की जे मोठे लोक करोडो रुपये कमावतात आणि इथे लाख रुपयांचे दान देतात, ते कशासाठी? तर स्वत:चे नाव खराब होऊ नये म्हणून. आता या काळातच हे असे सुईचे दान होत आहे. हे सर्व नीट समजून घेण्यासारखे आहे. इतर लोक दान देतात, त्यात काही गृहस्थही असतात, साधारण परिस्थितीचे असतात, त्यांनी दान दिले तर हरकत नाही. पण हे मोठे लोक सुईचे दान देऊन स्वत:चे नाव बिघडू देत नाहीत, स्वत:ची अब्रू झाकण्यासाठी कपडे बदलून टाकतात! फक्त देखावा करण्यासाठी असे दान देतात!

## ...पण पाटीमुळे सर्व नष्ट झाले

सध्या तर संपूर्ण जगाचे धन गटारात जात आहे. या गटारांचे पाइप रुंद केले आहेत, ते कशासाठी? तर धन जाण्यासाठी जागा हवी ना? कमावलेले सर्व धन खाऊन-पिऊन गटारात वाहून जाते. एक पैसा देखील योग्य मार्गाला जात नाही आणि जे पैसे कॉलेजला दान देण्यात वगैरे खर्च होतात, ते सर्व इगोइजम (अहंकार) आहे! इगोइजमशिवाय जो पैसा दिला जातो त्याला खरा पैसा म्हणतात. नाही तर त्यामुळे तर अहंकाराचे पोषण होते, कीर्ती मिळते, आरामात! पण कीर्ती मिळाल्यावर त्याचे फळ मिळते. नंतर जेव्हा ती कीर्ती उलटते तेव्हा काय होते? अपकीर्ती होते. तेव्हा मात्र त्रास आणि त्रासच होतो. त्यापेक्षा कीर्तीची आशा ठेवूच नये. कीर्तीची आशा ठेवली की अपकीर्ती पण येईलच ना? ज्याला कीर्तीची आशा नाही, त्याची अपकीर्ती होईलच कशी?

कोणी धर्मदानात लाख रुपये देतो आणि स्वत:च्या नावाची पाटी लावायला सांगतो आणि कोणी एकच रुपयाचे दान करतो, पण गुप्तपणे देतो, तर गुप्तपणे दिलेल्याची खूप किंमत आहे. मग जरी त्याने फक्त एकच रुपया दिला असेल तरी. आणि ही नावाची पाटी लावून घेतली, म्हणजे तर बॅलेन्सशीट (हिशोब) पूर्ण झाली. तुम्ही मला शंभराची नोट दिली आणि मी त्याचे तुम्हाला सुटे दिले, त्यात मग मला काही घेणे राहिले नाही आणि तुम्हाला देणेही राहिले नाही! तसेच हे लोक धर्मदान करून स्वत:च्या नावाची पाटी लावून घेतात, त्यामुळे काही देणेघेणे उरतच नाही ना? कारण जे धर्मदान दिले, त्याचा परतावा त्याने पाटी लावून परत घेतला. आणि ज्याने एकच रुपया गुप्तपणे दिला असेल त्याचे काही घेणे-देणे झाले नाही, म्हणून त्याचे बॅलेन्स (शिल्लक) राहिले.

आम्ही मंदिरात वगैरे सगळीकडे फिरलो आहोत, तिथे काही ठिकाणी सगळ्या भिंती पाट्या आणि पाट्यांनीच भरलेल्या होत्या! त्या पाटयांची व्हॅल्युएशन (किंमत) किती? पाटी अर्थात कीर्तीसाठीच! आणि जिथे कीर्तीच्या हेतूने ढीगभर पाट्या असतील तिथे कोणी बघतही नाही, की यात काय वाचायचे आहे? अख्ख्या मंदिरात एकच पाटी असेल

तर कोणीतरी वाचेल, पण इथे तर सगळ्याच्या सगळ्या भिंती पाट्यांनीच भरलेल्या असतील तर काय होईल? तरीही लोक म्हणतात की माझ्या नावाची पाटी लावा! लोकांना पाट्याच आवडतात ना!

## शेवटी धर्माचीच साथ

खरोखर गरज असेल तेव्हा तर धर्मच तुम्हाला मदत करील, म्हणून लक्ष्मीजीला धर्माच्या मार्गाने जाऊ द्या. फक्त सुषमकाळातच लक्ष्मीजीचा मोह होणे योग्य होते. ती लक्ष्मी तर आली नाही! हल्ली या शेठ लोकांना हार्टफेल आणि ब्लडप्रेशर कोण करवितो? या काळातील लक्ष्मीच करविते.

**प्रश्नकर्ता :** जीवनात आर्थिक परिस्थिती खालावलेली असेल तर काय करावे?

**दादाश्री :** एक वर्ष पाऊस पडला नाही तर शेतकरी काय म्हणतात? 'आमची आर्थिक परिस्थिती खराब झाली!' असे म्हणतात की नाही? मग पुढल्या वर्षी पाऊस पडला की त्यांची परिस्थिती सुधारते. म्हणजे जर आर्थिक परिस्थिती खालावली तर धीर धरायला पाहिजे, खर्च कमी केले पाहिजेत आणि कसेही करून मेहनत आणि प्रयत्न जास्त केले पाहिजेत. हलाखीची परिस्थिती असेल तेव्हा हे सर्व केले पाहिजे, कारण परिस्थिती चांगली असेल तेव्हा तर गाडी आपोआप चालतच राहते. सध्या तुमची परिस्थिती नाजूक आहे का? कसली अडचण आहे?

**प्रश्नकर्ता :** कुठलीही इच्छित वस्तू मिळवायची असेल तर वेळ लागतो.

**दादाश्री :** ओहोहो! इच्छित वस्तू!! पण या शरीराला काय पहिजे हे तुम्हाला माहीत आहे?

**प्रश्नकर्ता :** तसे तर भगवंताची प्राप्ती हीच मुख्य गोष्ट आहे.

**दादाश्री :** भगवंताच्या प्राप्तीसाठी हे शरीर आहे, पण त्याला काय-काय आवश्यक आहे? रात्री थोडी खिचडी दिली असेल तर

तुम्हाला रात्रभर ध्यान करता येईल की नाही? म्हणजे हे शरीर फार काही मागत नाही, बाकी सगळ्या गोष्टी म्हणजे मनातील वादळे आहेत! दोन वेळचे जेवण मिळते की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, मिळते.

**दादाश्री :** या शरीराला आवश्यक असेल इतके भोजन देण्याचीच गरज आहे. त्याला आणखी काही देण्याची गरज नाही. आणि नाही तर मग हा त्रिमंत्र रोज एक-एक तास म्हणा ना! तो म्हटल्याने आर्थिक स्थिती सुधारेल. म्हणजे त्यासाठी असा उपाय केला पाहिजे, उपाय केला तर सुधारेल. तुम्हाला हा उपाय आवडेल ना?

## लक्ष्मी, मेहनतीचे फळ की बुद्धीचे?

हे सर्व तर समजून घेतले पाहिजे ना? असे खोटे नाटे कधीपर्यंत चालणार? आणि उपाधी आली तर आवडत नाही. हा मनुष्य देह उपाधीतून मुक्त होण्यासाठी आहे, फक्त पैसे कमावण्यासाठी नाही. पैसा कशाने कमावत असतील? मेहनतीने की बुद्धी?

**प्रश्नकर्ता :** दोन्हींनी.

**दादाश्री :** जर पैसे मेहनतीने कमावता आले असते तर या मजुरांकडे खूप पैसे असते. कारण हे मजूरच जास्त मेहनत करतात ना! आणि पैसे बुद्धीने कमावता आले असते तर हे सर्व पंडित आहेतच ना! पण त्यांची चप्पल अर्धी घासून गेलेली असते. अर्थात पैसे कमावणे हा बुद्धीचा खेळ नाही, किंवा मेहनतीचे फळही नाही. ते तर तुम्ही पूर्वी जे पुण्य केलेले आहे त्याचे फळस्वरूप तुम्हाला मिळत असतात, आणि नुकसान, हे पूर्वी केलेल्या पापाचे फळ आहे. लक्ष्मी पुण्य आणि पापाच्या आधीन आहे. म्हणून जर लक्ष्मी पाहिजे असेल तर आपल्याला पाप-पुण्याकडे लक्ष द्यावे लागेल.

## लक्ष्मीबद्दल प्रीती! तर भगवंताबद्दल?

संपूर्ण जग लक्ष्मीलाच मुख्य मानते ना! प्रत्येक कामात लक्ष्मीच

मुख्य आहे. म्हणून लक्ष्मीवर जास्त प्रेम आहे. जोपर्यंत लक्ष्मीवर जास्त प्रेम राहील तोपर्यंत भगवंतावर प्रेम करता येणार नाही. भगवंतावर प्रेम जडल्यावर लक्ष्मीवरील प्रेम नष्ट होते. दोघांपैकी एकावरच प्रेम करता येईल. एक तर लक्ष्मीबरोबर किंवा नारायणाबरोबर. तुम्हाला आवडेल तिथे राहा. लक्ष्मी दु:ख देईल. जी सुख देते ती दु:खही देईल! याउलट नारायण सुख पण देत नाहीत आणि दु:ख पण देत नाहीत, निरंतर आनंदात ठेवतात, मुक्त भावात ठेवतात!

ज्ञानी पुरुषांकडे एकदा अगदी मनापासून हसलात की मग आत भगवंताशी तार जोडली जाते. कारण तुमच्या आत भगवंत बसले आहेत, आमच्या आतही भगवंत बसले आहेत. पण आमच्या आत भगवंत संपूर्ण व्यक्त झाले आहेत, आणि तुमच्या आत व्यक्त झाले नाहीत, बस एवढेच. पण कसे व्यक्त होतील? जोपर्यंत भगवंताच्या सन्मुख होत नाही, तोपर्यंत कसे व्यक्त होतील? तुम्ही कधी भगवंताच्या सन्मुख झाला आहात का?

**प्रश्नकर्ता :** तसे तर आम्ही लक्ष्मीच्या सन्मुख झालो आहोत!

**दादाश्री :** सारे जगच लक्ष्मीच्या सन्मुख झालेले आहे ना! आणि शेठ तुम्ही लक्ष्मी सन्मुख झाले आहात की विमुख?

**प्रश्नकर्ता :** मी तर त्याबाबतीत उदासीन आहे!

**दादाश्री :** असे होय? म्हणजे तुम्ही सन्मुखही नाही आणि विमुखही नाही असे? उदासीन आहात ही तर फार मोठी गोष्ट आहे. लक्ष्मी आली तरी ठीक, नाही आली तरी ठीक.

## हे कसले भोगणे?

लोकांना लक्ष्मी सांभाळणेही जमत नाही आणि उपभोगणेही जमत नाही. उपभोगताना म्हणतील, 'इतके महाग? इतके महाग घेतात का?' अरे, चुपचाप उपभोग ना! पण उपभोगतानाही दु:ख, कमावतानाही दु:ख! लोक त्रास देतात, अशा परिस्थितीत कमावयाचे. काही जण तर उधार घेतलेले पैसे परत करत नाहीत. म्हणजे कमावतानाही दु:ख आणि

सांभाळतानाही दुःख. कितीही सांभाळून ठेवले तरी बँकेत शिल्लक राहतच नाहीत ना! बँकेच्या खात्याचे नावच क्रेडिट आणि डेबिट, पूरण आणि गलन! लक्ष्मी जाते तेव्हाही खूप दुःख देते. 'हे एवढे महाग आंबे घेतात का कधी? इतकी महाग भाजी का घेतली?' अरे, सगळ्या गोष्टीत तू महाग महाग करत राहतोस? तू महाग कशाला म्हणत आहेस? तर मग स्वस्त कशाला म्हणशील? ही तर एक प्रकारची वाईट सवय लागली आहे. त्याची दृष्टीच अशी बसली आहे. तर काय करणार? आम्ही तर म्हणतो 'जे आले, जे महाग भावाने आले, ते सर्व करेक्टच आहे, 'व्यवस्थित' आहे. पण हे त्याला समजत नाही ना! त्याची दृष्टी आधीपासूनच बसली आहे, ती सुटत नाही ना!

काही जण तर इन्कमटॅक्स पचवून बसलेले असतात, पंचवीस-पंचवीस करोड रुपये दाबून ठेवलेले असतात. पण त्यांना माहीत नसते की हे सर्व पैसे संपून जाणार आहेत. मग इन्कमटॅक्सवाले नोटीस देतील तेव्हा पैसे कुठून आणतील? ही तर केवळ फसवणूकच आहे! या उंच चढणाऱ्या (श्रीमंत) लोकांना तर खूपच धोका आहे, पण त्यांना हे माहितच नाही ना! उलट दिवसभर इन्कमटॅक्स कसा वाचवू याचेच ध्यान! म्हणूनच आम्ही म्हणतो की, हे तर तिर्यंचगतीचे रिटर्न तिकीट घेऊन आलेले आहेत.

पैशांचा नियम असा आहे की ते काही दिवस टिकतात आणि मग निघूनच जातात. रुपया तर फिरत राहतो, मग तो फायदा करतो, नुकसान करतो किंवा व्याज आणतो, पण तो फिरतच राहतो, स्थिर बसून राहत नाही. तो स्वभावतःच चंचल आहे. म्हणजे तो वर चढला असेल तर वर त्याला अस्वस्थ वाटते. उतरताना उतरू शकत नाही, वर जाताना अगदी हौशीने, असे धरून धरून वर चढतो, पण उतरताना मात्र मडक्यात तोंड घातलेल्या मांजरीसारखे करतो. मांजर मडक्यात जोराने तोंड घालते पण मग तोंड बाहेर काढताना काय परिस्थिती होते? तसे याचे होते.

## सहज प्रयत्नाने संधान मिळेलच

म्हणून आम्ही म्हणतो की स्वतःच्या पुण्याने मिळालेले खा. पुण्य

कशाला म्हणतात? कोणीतरी पहाटे साडेपाच वाजता आपल्याला उठवून सांगेल की, 'साहेब आम्हाला बंगला बांधायचा आहे आणि त्याचे कॉन्ट्रॅक्ट तुम्हाला द्यायचे आहे!' असे 'व्यवस्थित' असते. म्हणजे स्वत: धावाधाव करत नसेल तरी पण 'व्यवस्थित' त्याला उठवायला येते, आणि जर स्वत: बंगला बांधण्यासाठी धावाधाव करत असेल तर व्यवस्थित काय म्हणेल, 'होईल नंतर आरामात!'

'व्यवस्थित'शक्तीच्या बाहेर तर काहीच होऊ शकत नाही. तरीही आपण 'व्यवस्थित'चा अर्थ असा लावू नये की 'मी झोपून जातो, सर्व काही होऊन जाईल.' जर 'व्यवस्थित' म्हणायचे असेल तर आपले प्रयत्न असले पाहिजेत. तरीही प्रयत्न देखील 'व्यवस्थित' करवून घेईल तेवढेच करायचे असतात, पण आपली इच्छा काय असावी? तर प्रयत्न करण्याची. मग 'व्यवस्थित' जेवढे करवेल तेवढेच प्रयत्न. दहा वाजल्यापासून वसुलीसाठी जातो, त्याला तो माणूस भेटत नाही की मग परत बारा वाजता जातो, तरी तो भेटला नाही, मग घरी येऊन परत दीड वाजता जातो, असे करू नये. प्रयत्न म्हणजे एकदा जाऊन यावे, मग परत विचार करू नये. पण हे तर इतका प्रयत्न करतात की सतत फेऱ्या मारत राहतात. प्रयत्न तर सहजपणे व्हायला हवेत. सहज प्रयत्न कशाला म्हणतात की आपण जे शोधत असतो ते समोर येऊन उभे राहावे. तसे त्याच्या घरी गेले तर भेटत नाही, पण परत येताना समोर भेटतो. माझे सर्व काही सहज प्रयत्नाने होते. सहजपणेच असा हिशोब सेट होऊन गेला आहे. कारण आम्ही कशातही दखल देत नाही!

## हिशोबाची रक्कम, कमी जास्त होत नाही

लक्ष्मीला पुढे-मागे करणारा कोणीही नाही, कमी-जास्त करणाराही कोणी नाही. फक्त अहंकारच करतो की, 'हे सर्व मी कमावले आहे.' लक्ष्मी तर तुमचा हिशोब आहे आणि तुम्ही ज्याप्रकारे मागाल त्याप्रकारे तो तुम्हाला मिळेल. कोणी तुम्हाला विचारले की, 'तुमचे टेंडर कशा प्रकारचे आहे?' तर तुम्ही म्हणता की, 'साहेब, सर्व प्रकारची चोरी करूनच कमावायचे आहे.' तर म्हणतील 'तुझी रक्कम तुला त्या प्रकारे

मिळेल.' तुम्ही म्हणालात की, 'साहेब, मला एक पैशाचीही चोरी करायची नाही.' तरीही तेवढीच रक्कम मिळेल. रक्कम इज दी सेम (सारखीच). पण इथे तुमची टेस्ट (परीक्षा) होत असते. आणि चोरी करून जर रक्कम वाढत असेल तर कधी कोणाचे नुकसान झालेच नसते.

**प्रश्नकर्ता :** सध्या लोभामुळे हा अधर्म घुसला आहे ना?

**दादाश्री :** हो, लोभामुळेच हे सर्व नुकसान होत आहे. लोभच माणसाला फसवतो. 'असे केले ना, तर दहा हजार वाचतील.' म्हणूनच लोभाला दुश्मन म्हटले आहे ना! लोभ उलटेच शिकवून माणसाला आंधळा करून टाकतो, 'खोटे लिहिल्याने दहा हजार वाचतील, म्हणून लिहा ना खोटे!'

**प्रश्नकर्ता :** आणि लोभ वाढविणारे आपले सरकारच आहे ना?

**दादाश्री :** सरकार म्हणजे शेवटी आपणच ना, ते आपलेच स्वरूप आहे. म्हणजे लोभामुळे झालेले नुकसान आपल्याच डोक्यावर बसते, मग कोणाला शिव्या देणार? सरकार तर आपलेच प्रतीक आहे. मग आपण कोणाला सांगायचे? म्हणजेच चूक स्वतःचीच आहे. सगळ्या बाबतीत जर स्वतःचीच चूक पाहिली तर चुका संपून जातील, नाही तर चुका संपणार नाहीत.

**प्रश्नकर्ता :** आम्हाला आज असे वाटते की आमची मुले किती पैसे खर्च करतात, पण आमच्या जमान्यात एक रुपया मण बाजरी होती, आणि आता?

**दादाश्री :** खरी गोष्ट आहे! असे आहे ना, मी तुम्हाला खरे सांगतो, हे समजण्यासारखे आहे की जर महागाई इतकी वाढली तर 'पब्लिक'ला खाण्या-पिण्यासाठी काही मिळणार नाही. म्हणून मग मी ज्ञानाने पाहिले की, 'हे काय आहे? हे लोक तेल कसे आणून खातात? दहा रुपये भावाची साखर कशी आणतात? इतक्या महाग वस्तू हे लोक कसे खात असतील?' असा सर्व हिशोब काढला. तर शेवटी ज्ञानाने पाहिले तेव्हा कळले की तिथे पैशांची भानगड नसते. तुम्हाला किती

तूप, किती तेल, किती भाजी, किती वेजिटेबल तूप, किती शुद्ध तूप, किती दूध मिळणार याचा हिशोब तुमच्यासोबत 'जॉइंट' झालेला (जोडला गेलेला) असतो. त्यामुळे या सर्व वस्तू मिळतात, नाही तर या गोष्टी कोणाला मिळाल्याच नसत्या, श्रीमंतांनाही मिळाल्या नसत्या.

## निंदा बंद केली की अपार लक्ष्मी येते

आपला हा देश पैसेवाला केव्हा बनेल? लक्ष्मीवंत आणि सुखी केव्हा होईल? तर जेव्हा निंदा आणि तिरस्कार बंद होतील तेव्हा. या दोन्ही गोष्टी बंद झाल्या की देशात अपार पैसे आणि लक्ष्मी असेल.

**प्रश्नकर्ता :** निंदा आणि तिरस्कार कधी बंद होतील?

**दादाश्री :** जेव्हा लोभ वाढतो तेव्हा निंदा आणि तिरस्कार दोन्ही बंद होतात.

**प्रश्नकर्ता :** लोभ वाढला तर कपट वाढते ना?

**दादाश्री :** हो, पण लोकांचा तिरस्कार आणि निंदा करणे तर बंद होईल ना! लोभी माणसाकडे कधीच वेळ नसतो, तो आपल्याच धुंदीतच असतो, म्हणून त्याला लक्ष्मीचे अंतराय पडत नाहीत. लक्ष्मीचे अंतराय कोणाला पडतात? तर ज्यांना असे वाटत राहते की, 'मगनलाल असे आहेत, तमके भाई तसे आहेत.' जिथे अशी निंदा आहे, तिथे लक्ष्मी नसते. 'हा खालच्या जातीचा आहे, हा उच्च जातीचा आहे, हा असा आहे, तो तसा आहे.' अशी काही कटकट लोभी माणसाला नसते. एखादा गावंढळ माणूस जरी त्याचा ग्राहक असेल ना, तरी तो त्याला म्हणेल, 'या बसा शेठ, इथे गादीवर बसा ना!'

**प्रश्नकर्ता :** पण मग लोभी माणसाला कुठलाही अंतराय बाधक होत नाही का?

**दादाश्री :** लोभी म्हणजे फक्त पैशाचाच लोभ नाही, तर सुखाचाही लोभ असतो.

**प्रश्नकर्ता :** मानाचाही लोभ असतो का?

**दादाश्री :** मानाचा लोभ म्हणत नाहीत, सुखाचा लोभ म्हटला जातो. मानाच्या लोभात तर निंदा घुसते.

**प्रश्नकर्ता :** मग या मुंबईत लोक मानाच्या लोभात नाहीत का?

**दादाश्री :** नाही, खरे तर तो मानाचा लोभ नाही, तर सुखाचा लोभ आहे. दुसऱ्यांची निंदा करायला त्याला वेळ मिळाला तर त्याला मानाचा लोभ म्हणतात. मुंबई शहरात लोकांना विचारून पाहा की, 'तुमच्याकडे दुसऱ्यांची निंदा करायला वेळ आहे का?' तर म्हणतील 'नाही.' म्हणजे घटकाभराचाही रिकामा वेळ यांच्याकडे नसतो आणि तिथे वढवाणला (गुजरात मधील एक गाव) गेले तर?

**प्रश्नकर्ता :** तिथे तर सगळीकडे हेच असते.

**दादाश्री :** तरीही आम्ही काय म्हटले आहे की या हिंदुस्तानात निंदा आणि तिरस्कार कमी होऊ लागले आहेत आणि लोभ वाढला आहे. सुखाचा लोभ वाढला आहे म्हणून हिंदुस्तानचे चांगले होईल. लक्षणावरून मला हे समजले आहे. मोह जरा वाढेल पण निंदा आणि तिरस्कार वगैरे तर कमी होतील ना?

जो लोभी असतो आणि त्याच्याकडे आपले काही पैसे अडकले असतील आणि आपण त्याला शिव्या दिल्या तरी तो हसतो! अरे, मी तुला शिव्या देतोय आणि तू हसतोस? तेव्हा शेजारी-पाजारी आणि रस्त्यातील लोक आपल्याबद्दल म्हणतात की 'हा चिडत आहे म्हणजे हाच नालायक आहे.' पाहा ना, तो तर बिचारा हसतो आहे, म्हणजे हे सर्व आपल्याच अंगाशी येते! एक तर आपले पैसे जातात आणि वर लोभी माणसासमोर आपण चुकीचे ठरतो. समजले ना की, लोभी कसा असतो?

**प्रश्नकर्ता :** लोभी स्वत:च्या सुखातच रमलेला असतो.

**दादाश्री :** तो समजतो की हा तर आता थकून निघून जाईल, आणि मला तर हे पैसे मिळाले ना!

लोकांना हे समजले तर ते सुखी होतील ना!

हा निसर्ग आपल्याला 'हेल्प' (मदत) करतो, हे पक्के आहे. म्हणून मी सांगून ठेवले आहे की 2005 साली हिंदुस्तान जगाचे केंद्र बनेल. म्हणून ही गोष्ट नीट समजून घेतली पाहिजे. लोक दु:खी का होते, हे मी शोधून काढले, आणि आता गाववाले का दु:खी आहेत? कारण अजूनही ते निंदा करण्यातच गुंतलेले आहेत. आजकालचे हे लोक बाकी काही नाही तर रेडिओ-टी.व्हीच्याच नादात रमलेले असतात! हे लोक कोणाची निंदा करण्याच्या भानगडीत पडत नाहीत. हे सर्व तर टी.व्ही पाहतात, आणखीही काही पाहतात, ते सुद्धा स्वत:चे डोळे खराब करून पाहतात, ते इतर लोकांचे डोळे थोडेच बिघडवतात? त्यांची स्वत:चीच जबाबदारी आहे ना! आपला संपूर्ण देश निंदेमुळे, भयंकर निंदेमुळे नष्ट झाला होता. शास्त्रकारांनी नियम सांगितला आहे की तुम्ही टीका अवश्य करा. टीका-टिपण्णी केली नाही तर लोक सुधारणार नाहीत. पण त्या टीकेचे 'एक्झॅगरेशन' (अतिरेक) झाले आणि त्यातून निंदा सुरू झाली. जे व्हिटॅमिन होते, तेच नष्ट करून टाकले!

मी तर पॉजिटिव्ह करू इच्छितो, निगेटिव्ह सेन्स येऊच द्यायचा नाही. जर कोणी चांगले करत असेल तर त्या चांगल्या गोष्टीला प्रोत्साहन देतो. म्हणजे चांगले इतके अधिक प्रमाणात प्रकाशमान होईल, इतके विस्तृत होईल की निगेटिव्ह उडूनच जाईल. आतापर्यंत या जगात निगेटिव्हमुळेच संघर्ष होत होते! लक्ष्मी आल्यानंतरही जर सुख नसेल, अंतरदाह होत असेल तर ती सर्व पापानुबंधी पुण्याची लक्ष्मी आहे, कारण खरी लक्ष्मी अजिबात क्लेश होऊ देत नाही. म्हणजे लक्ष्मीचे तर किती चांगले गुण आहेत!

## 'कारणा'शिवाय 'क्लेम' होत नाही

**प्रश्नकर्ता :** अकारण तर काही होतच नाही ना?

**दादाश्री :** जग अकारण नाहीच. अकारण झाल्यावर मोक्ष होतो! जेव्हा काहीही 'कारण' उरत नाही, जेव्हा कोणताही क्लेम उरत नाही, तेव्हा या जगाचा अंत होतो! इथे तर घरातील सर्वांचा क्लेम, ग्राहकांचा क्लेम! 'अरे, पण माझे नाव का घेतोस?' तर म्हणतात 'आपल्याला

जरा भेटायचे होते!' म्हणजे सगळेच क्लेम करतात. आणि मग इन्कमटॅक्सवाला बोलावतो, घाबरवतो सुद्धा! का? तर क्लेम आहे म्हणून. तुम्ही इथे आलात त्याला काही कारण असेल की अकारण आलात? म्हणजे कारणाशिवाय तर येणे होणारच नाही, अकारण तर काहीच होत नाही. काहीतरी कारण तर असणारच! तुमच्या लक्षात हे येत नाही ही गोष्ट वेगळी आहे, पण कारणाशिवाय कार्य होत नाही.

## बंधन, वस्तूचे की राग-द्वेषाचे?

कसेही करून सर्व हिशोब चुकते करायचे आहेत. हा पूर्ण जन्म हिशोब चुकते करण्यासाठी आहे. जन्म झाल्यापासून मृत्यूपर्यंत सर्व काही अनिवार्य आहे.

**प्रश्नकर्ता :** इथे दिवाळे काढले आणि पैसे चुकते केले नाहीत तर त्याला पुढच्या जन्मात चुकते करावे लागतात?

**दादाश्री :** पुन्हा त्याला पैसे दिसणारच नाही, मग त्याच्या हातात पैसे येणारच नाहीत. आपला नियम काय आहे? की पैसे परत देण्याच्या बाबतीत तुमचा भाव बिघडायला नको, तर मग एक दिवस नक्कीच तुमच्याकडे पैसे येतील आणि कर्ज फेडून टाकता येईल. कितीही पैसे असू द्या, पण शेवटी पैसे काही सोबत येत नाहीत, म्हणून (मोक्षाचे) काम करून घ्या. कारण आता परत मोक्ष मार्ग मिळणार नाही. एक्क्याऐंशी हजार वर्षांपर्यंत मोक्षमार्ग हाती लागणार नाही. हा शेवटचा 'स्टॅन्ड' (स्थानक) आहे, आता या पुढे 'स्टॅन्ड' नाही.

संसाराचे कर्ज, पैशांचे किंवा इतर कशाचे नसते, तर राग-द्वेषाचे कर्ज असते. पैशांचे कर्ज असते तर काय आम्ही म्हटले असते की, 'बाबा, पाचशे पुरे मागत आहे तर पाचशे देऊन टाक, नाही तर तुझी सुटका होणार नाही!' आम्ही तर म्हणतो की, याचा निकाल करून टाक, पन्नास देऊनही तू त्याचा निकाल कर! त्याला विचार की 'तू खुश आहेस ना?' जर तो म्हणाला की 'हो, मी खुश आहे.' म्हणजे सर्व निकाल झाला!

जिथे जिथे तुम्ही राग-द्वेष केले असतील, ते राग-द्वेष तुम्हाला परत मिळतील.

## हिशोबाचे बंधन, पैशांमुळे की भावामुळे?

**प्रश्नकर्ता :** भाव शुद्ध असला पाहिजे ना? भावच जर बिघडला असेल तर मग कसे परत करता येईल?

**दादाश्री :** जर भाव शुद्ध नसेल तर त्यावरून आपण समजू शकतो की हे परत दिले जाणार नाहीत, आणि भाव शुद्ध असेल तर समजून जावे की हे परत दिले जातील. आपणच आपला अंदाज घेतला पाहिजे.

आपल्याला जरी अडचण असेल तरी पण आपला भाव शुद्ध आहे की नाही हे पाहिले पाहिजे. मग नक्कीच परत दिले जातील, मग चिंतेचे काही कारणच नाही.

तुम्ही कोणाकडून पैसे घेतले असतील आणि तुमचा भाव शुद्ध असेल तर समजावे की हे पैसे तुमच्याकडून परत केले जातील, मग त्यासाठी चिंता-वरीज् करू नका. भाव शुद्ध आहे की नाही, तेवढेच पाहायचे आहे, हीच त्याची लेव्हल आहे. समोरच्याचे भाव शुद्ध आहेत की नाही, यावरून तुम्ही समजू शकता. त्याचा भाव शुद्ध नसेल तर समजून चला की हे पैसे परत मिळणार नाही.

भाव तर चोख असायलाच हवा. चोख भाव म्हणजे तुमच्या अधिकाराने तुम्ही काय कराल? तुम्ही म्हणाल की 'आज पैसे असतील तर आजच सगळे देऊन टाकीन!' याला म्हणतात शुद्ध भाव. भाव तर असाच असला पाहिजे की कधी मला लवकरात लवकर परत करून टाकेन.

## हा तर एकस्ट्रा आइटम

एक घेणेकरी एका व्यक्तीला त्रास देत होता. तो मला सांगत होता की 'हा घेणेकरी मला खूप शिव्या देत होता.' मी म्हटले, 'तो

आला की मला बोलवा!' मग तो घेणेकरी आला तेव्हा त्या माणसाचा मुलगा मला बोलवायला आला. मी त्याच्या घरी गेलो. मी बाहेर बसलो आणि आत तो घेणेकरी त्या माणसाला ओरडत होता, 'तुम्ही असा नालायकपणा करता? ही तर बदमाशी आहे.' अशा-तशा खूप शिव्या देऊ लागला. म्हणून मग मी आत जाऊन विचारले, 'तुम्ही घेणेकरी आहात ना?' तर म्हणाला, 'हो, मी घेणेकरी आहे.' मी म्हणालो ''आणि हा देणारा आहे. तुम्हा दोघांमध्ये ॲग्रीमेन्ट (करार) आहे. त्यांनी देण्याचे ॲग्रीमेन्ट केले आहे आणि तुम्ही घेण्याचे ॲग्रीमेन्ट केले आहे. आणि तुम्ही ज्या शिव्या देत आहात तो 'एक्स्ट्रा आइटम' (अतिरिक्त वस्तू) आहे, तर त्याचे पेमेंट तुम्हाला करावे लागेल. शिव्या देण्याची अट ॲग्रीमेंटमध्ये ठेवलेली नाही. प्रत्येक शिवीचे चाळीस रुपये कापले जातील. विनयाला सोडून तुम्ही जे बोललात ते 'एक्स्ट्रा आइटम' आहे, कारण तुम्ही ॲग्रीमेन्ट सोडून वागला आहात.'' असे म्हणाले तर तो चक्रम सुद्धा सरळ होईल आणि परत अशा शिव्या देणार नाही ना! आम्ही तर खूप काही सुनावतो त्यामुळे तो काही बोलूच शकत नाही, आणि सरळ होतो.

आम्ही तर या देहाला सट्ट्यात लावले आहे. ज्याने सट्ट्यात ठेवले असेल, त्याला कसली भीती वाटेल का? आम्ही खूप काही सुनावतो पण ते त्याच्या हिताचे असते. आमचे स्वत:चे हित तर झालेले आहे, सर्वस्व हित झाले आहे. तुमच्या हितासाठी मला असे बोलावे लागते. मग घेणेकरी सरळ चालेल ना? शिव्या म्हणजे काय हे त्याला समजत नाही. हा 'एक्स्ट्रा आइटम' आहे. याने दिले पाहिजे ही अट आहे, तुला घेणे आहे ही अट आहे आणि मग हा 'एक्स्ट्रा आइटम' कुठून आला? या 'एक्स्ट्रा आइटम'चे पैसे द्यावे लागतील! मग तू 'एक्स्ट्रा' का बोललास?

## दृष्टीच्या अनुसार जीवन व्यतीत होते

या लोकांना पत्ते खेळण्यापूर्वी ज्ञान असते की हे मनोरंजनासाठी खेळायचे आहे. खेळल्यानंतर आपण विचारले की कसे वाटत आहे?

तर म्हणतील 'मनोरंजनासाठी खेळत होतो.' पण पत्ते खेळताना मात्र राग-द्वेष करतात, घोटाळे करतात सर्व काही करतात. असा जीवाचा स्वभावच आहे. जर मनोरंजनासाठी खेळत असाल तर मनोरंजनच करा ना! मग त्यात घोटाळा करण्याची गरजच काय आहे? मनोरंजन करायला बसले तर मनोरंजनच करा ना? पण त्यात घोटाळे करून समोरच्याला 'टोपी' घालतात. म्हणजे जीवाचा स्वभाव मुळातच वाकडा आहे आणि त्यामुळेच तो सतत मार खातो. वीतरागांसारखे समंजस झालेत ना, तर काही नुकसान होणार नाही.

## उपयोगमय जीवन कशाप्रकारे?

जर ही (कापलेली) नखे बाहेर रस्त्यावर फेकली तर त्यांना ओढण्यासाठी किती मुंग्या येतात! आणि त्यांच्यावर कोणाचा पाय पडला तर त्या सर्व मुंग्या मरून जातील. आणि नखे टाकणारा यात निमित्त बनतो.

म्हणून खूप उपयोगपूर्वक, विचारपूर्वक, जीवन जगायचे आहे की, 'याचा परिणाम काय होईल? याचा परिणाम काय होईल?' असे म्हटले तर म्हणतील, 'त्या परिणामांचा विचार करून करून आत्माही तसाच होईल का?' तर 'नाही, त्या परिणामांच्या विचारांना जो जाणतो तो आत्मा आहे.' पण परिणाम तर सरळच असले पाहिजेत ना?

तुम्ही नखाचा तुकडा टाकून तर पाहा, मुंग्यांना वास येतोच, त्यामुळे त्या लगेच गोळा होतात, पण केसाचा तुकडा टाकला तर गोळा होत नाही. केसांनाही वास असतो आणि नखांनाही वास असतो, पण केसांजवळ त्या जात नाहीत.

म्हणजे असे बारकाईने जीवन जगले पाहिजे, हो की नाही?



# [ 14 ]
# प्राकृतिक गुणांची पसंती

## जगासंबंधी यथार्थता...

जर ज्ञान नसेल आणि तांब्याचा हंडा हरवला तर स्त्रियांचे काय होते? आतून असेच वाटत राहते जणू आत्माच हरवला आहे, रात्री झोपेतही असेच वाटत राहते! आणि मडके फुटले तर? तर म्हणेल, 'फुटू दे, फुटले तर! दोन आण्यांचे तर होते!' म्हणजे तेव्हा तिला काहीच वाटत नाही. तसेच जेव्हा हे जग 'मडक्या'सारखे दिसेल तेव्हा आत्म्याची किंमत कळेल! परंतु जोपर्यंत जग तांब्यासारखे वाटते, तोपर्यंत सर्व त्रास आहे. खरे तर हे जग गुंतागुंतीचे नाहीच. ही तर केवळ भ्रांती आहे, गाठ बनून राहिली आहे. डोळ्यांच्या खाली असे बोटाने दाबले तर दोन दिवे दिसतात. अरे, हात सोड ना चुपचाप! ज्ञानींच्या सांगण्यावरून तरी सोड. तर म्हणेल, 'नाही साहेब, हे दोन आहेत त्यांच्या ऐवजी आत काही तरी वेगळेच झाले तर!' अरे, एकच आहे, तुला दोन वाटतात, हीच तुझी भ्रांती आहे!

ही दुनिया जशी आहे तशी यथार्थपणे समजून घेतली तर जीवन जगण्यासारखे आहे. यथार्थपणे समजून घेतले तर चिंता-उपाधी राहणार नाहीत. आणि मग जीवन जगण्यासारखे वाटेल!

**प्रश्नकर्ता :** मनुष्याचा जगाबरोबर आणि परमात्म्याबरोबर कशा प्रकारचा संबंध आहे?

**दादाश्री :** जगाबरोबरचा त्याचा संबंध भ्रांतीमय आहे आणि परमात्म्याबरोबरचा संबंध खरा संबंध आहे, परंतु जोपर्यंत हा (भ्रांतीमय) संबंध आहे तोपर्यंत परमात्म्याबरोबरचा संबंध होणार नाही. आणि परमात्म्याबरोबर संबंध झाल्यावर भ्रांतीमय संबंध राहणार नाही. तुम्हाला दोन्ही संबंध एकत्र ठेवायचे आहेत का? दोन्ही संबंध ठेवायचे असतील तर परमात्म्याची भक्ती करा, पण पारखून भक्ती करा. नाही तर तुम्ही भक्त आणि ते भगवंत, असे समजून 'तू ही, तू ही' करत राहाल तर काहीही निष्पन्न होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** भगवंताला सर्व काही समर्पण करणे, हा खरा आणि सुखी होण्याचा मार्ग आहे ना?

**दादाश्री :** हो, पण भगवंताला कोणी समर्पण केलेच नाही, या दुनियेत! तोंडावर तर बोलतात की भगवंताला समर्पण! पण सर्वांनी पत्नीला समर्पण केलेले असते. व्यवहारात बोलतात की भगवंताला समर्पण केले आहे, भक्ती करतात तेव्हा भगवंताला समर्पण असे म्हणतात, परंतु जर भगवंताला समर्पण केले असेल तर मग त्याला दुःख नसणारच ना?

## ...तर अहंकार ठिकाणावर राहील

**प्रश्नकर्ता :** इच्छा पूर्ण व्हाव्यात म्हणून काय केले पाहिजे?

**दादाश्री :** असे आहे ना, हे कलियुग आहे, यात ज्या इच्छा होतात त्यांची प्राप्ती झाली तर आपला अहंकार वाढेल आणि मग गाडी उलटी चालेल. म्हणून या कलियुगात तर नेहमी माणसाला ठोकर बसली तरच चांगले. म्हणजे प्रत्येक युगात हे वाक्य वेगवेगळ्याप्रकारे असते. म्हणून या युगाच्या संदर्भात हे वाक्य असे म्हटले जाते. सध्या जर इच्छेनुसार सर्व मिळत गेले तर त्याचा अहंकार वाढत जाईल. मिळते सर्व पुण्याच्या हिशोबानुसार आणि वाढते काय? तर अहंकार, 'मी आहे.' म्हणूनच जितक्या इच्छा होतात त्यानुसार जर झाले नाही तर माणसाचा अहंकार ठिकाणावर राहील आणि त्याला काही समजू लागेल. ठोकर लागते तेव्हाच समजते, नाही तर समजतच नाही ना! इच्छा झाली आणि

मिळाले, त्यामुळेच तर हे लोक वर चढून गेले आहेत. इच्छेनुसार मिळाले म्हणून तर ही दशा झाली आहे या बिचाऱ्यांची! जे पुण्य होते ते तर खर्च झाले आणि उलट तो अडकला आणि अहंकार वेडा झाला! अहंकाराला वाढायला वेळ लागत नाही. फळ कोण देते? पुण्य देते, आणि मनात काय समजतो की, 'मीच करत आहे.' अशा अहंकारी व्यक्तीला मार खावा लागणे हेच योग्य आहे. ठोकरा खात खात त्याला जे प्राप्त होईल, त्यातच फायदा आहे.

इच्छा झाली आणि मिळाले तर घरात पाय वरच ठेवतो, वडिलांनाही जुमानत नाही, कुणालाच जुमानत नाही. म्हणून इच्छा होताच लगेच मिळत असेल तर अधोगतीला जाणार असे समजून जावे, त्याचे डोके चढत-चढत चक्रमच होऊन जाते. काही थोड्या लोकांनाच सध्या इच्छेनुसार मिळाले आहे, आणि ते तर आता पाच-दहा लाखांच्या फ्लॅटमध्ये राहतात आणि त्या सर्वांची स्थिती जनावरांसारखी झाली आहे. फ्लॅट दहा लाखांचा असतो, पण त्यांच्यासाठी ते हितकर नाही. त्यांची स्थिती तर दयनीय आहे.

## कठीण परिस्थितीत लालच कशाला?

आयुष्यभर भय नाही, कसलीच धास्ती नाही. संसारात जे काही व्हायचे असेल ते व्यवस्थितच्या बाहेर तर काही होणार नाही. कोणी हात पाहून सांगितले की, 'तुमच्या जीवनात घात आहे.' तर म्हणा, 'एक असो, दोन असो किंवा चार असोत, त्यात मला कसली हरकत असणार?' कारण आपल्याला माहीत आहे की घात 'व्यवस्थित शक्ती'च्या हातात आहे, त्यात तो काय करणार? आणि ज्याला 'व्यवस्थित' बद्दल माहीत नाही तो तर 'घात आहे' असे ऐकल्यावरच आतून दचकेल की कोणत्या वयात घात आहे? या ज्योतिषी लोकांची दुकानदारी तर योजनाबद्ध असते, जरा चेहरा उतरलेला दिसला की लगेच घात आहे असे म्हणून मोकळे होतात. नंतर म्हणतात, 'लक्ष्मी मिळेल असे दिसते.' तेव्हा तो खिशात सहा रुपयेच असले तरी पाच रुपयाची नोट काढून देईल. अरे, सहा रुपयेच आहेत आणि पाच कशाला देतोस? आता त्या ज्योतिषीच्या

पायाकडे पाहिले तर चप्पलही घातलेली नसते. अरे, ज्याच्या पायात चप्पलही नाही तो काय तुझे भविष्य पाहणार आहे? काही मोठे शेठ असतात, त्यांना ज्योतिषीकडे जाण्याची लाज वाटते, म्हणून ते ज्योतिषीलाच आपल्या बंगल्यावर बोलावतात. आता त्या ज्योतिषीच्या पायात धड चप्पल नाही, काही बरकतही नाही, चेहेऱ्यावर नूरही नाही, तो तुझे भविष्य काय पाहणार? एखाद्या नूर असलेल्या व्यक्तीकडे जा ना, पण हे लोक लालचमुळे मिळेल तिथे हात मारतात. ज्योतिषी पण खूप हुशार असतात, चेहऱ्यावरूनच त्यांना कळते की हा किती पाण्यात आहे. समोरचा मनुष्य काही देणारा नसेल तर तेही त्यांना समजते, म्हणून अशांकडे जायला ते घाबरतात. म्हणजे यांना माणसाची चांगली पारख असते. असे डोळे पाहतात, कान पाहतात, तोंड पाहतात सर्व काही पाहून मग सुरुवात करतात. अशी सामग्री तर शोधतीलच ना? त्यांना लक्षणांची माहिती असते, सर्व माहीत असते, फार पक्के असतात, कारण त्यांनी खूप लोकांना पाहिले असते ना! संध्याकाळपर्यंत पाच-दहा ग्राहक मिळूनच जातात. लोक बिचारे लालचमुळे काय नाही करत! घाबरून तो जे सांगेल ते करतात. अरे, वर कोणी बापही बसलेला नाही. तू असे ज्योतिषी वगैरे शोधू नकोस. एकांतात जाऊन बस, एकटाच! ज्ञान मिळाले नसेल तरी कोणाच्या सांगण्यानुसार तरी कर ना! सगळ्यात मोठा 'बाप' तर आत बसलेला आहे! त्या आत बसलेल्याला 'बाप, बाप' म्हणालास तरी ते त्याच्यापर्यंत पोहोचेल पण लालची लोक तर बाहेर फसतातच ना! त्यांना लुटतातच ना लोक चारी बाजूंनी!

लालच नसणे हा सर्वात मोठा गुण आहे, अस्सल, खरा! आणि यांच्याकडे कसली लालच? हे दोन हात असलेले माणूस! यांच्याकडे काय मिळणार आहे? आज जरी पंचवीस कोटी रुपये असतील, तरी कधी भिकारी होतील याचा काही भरवसा नाही. यांच्याकडून काय लालच करायची? त्यापेक्षा आतील भगवंताचे नाव घे, नाहीतर वरच्या भगवंताचे नाव घे. वरच्या भगवंताला सांगितले तरी आतील भगवंताला पोहोचेल!

## स्वार्थी प्रेमाने, वाढविला संसार

*घाट विनाना निर्‌मळ प्रेमनी*
*पंदरे क्षेत्रोमां फेली जो सुवास...* – नवनीत
(नि:स्वार्थी निर्मळ प्रेमाचा सुगंध पंधरा क्षेत्रात पसरला आहे)

नि:स्वार्थ प्रेम शिकून घ्या सगळ्यांनी, ते शिकण्यासारखे आहे. तसे तर प्रेम सर्वच करतात पण नि:स्वार्थी प्रेमाची गोष्टच वेगळी आहे ना! हे सर्व जे प्रेम करतात ना, ते प्रेम करीत नाहीत? पण आता त्यातला फक्त स्वार्थ बाहेर काढला तर काय होईल? पंधरा क्षेत्रात सुगंध पसरेल असे कविराज म्हणतात. कविराजांनी हे काही बुद्धीपूर्वक लिहिलेले नाही, ते तर सहज भावाने निघालेले आहे. जे सत्य होते ते बाहेर आले आहे, पूर्ण सत्यच बाहेर आले आहे.

आतला सर्व स्वार्थ काढून टाकला तर मग उरले काय? निर्मळ प्रेम उरले! 'हा माझ्या कामाचा आहे.' असा विचार येतोच कसा? काही लोकांना तर काहीही झालेले नसते, पण कोणी डॉक्टर आला तर लगेच उभे राहून म्हणतील, 'या डॉक्टर या!' आणि मनात म्हणतील की, 'कधी तरी उपयोगी पडतील.' अरे, तू आजारी पडणार केव्हा आणि तुला हा भेटणार केव्हा? कुठपर्यंत हा तुझ्या उपयोगी पडेल? अरे, स्वंयपाकी रस्त्यात दिसला तर त्याला 'अरे, इकडे ये, इकडे ये' करतात! त्यांना विचारले की 'काय हो, तुम्ही त्यांना का बोलावताय्?' तर म्हणतील 'कधी काम पडेल तर स्वंयपाक्याला बोलावता येईल ना!' किती मतलबी! जसे काही इथून कधी जायचेच नसेल, असे बोलतात. यांची तिरडी कधी निघणारच नसेल असे बोलतात ना!

तिरडी निघणार आहे तर मग स्वार्थ कशाला ठेवता? जर तिरडी निघणार आहे तर मग स्वार्थ कशाला ठेवला पाहिजे? 'कधी तरी उपयोगी पडेल.' अरे, जिथे तिरडी निघणार असते, त्या देशात 'कधी तरी' असे काही असते का? काही दिवसानंतर तिरडी निघणार आहे! ज्या डॉक्टरवर आशा लावली आहे, तो डॉक्टर तर इथून निघून जातो. तरी पण लोक

असे पाहतात की 'डॉक्टर कामाचा आहे, वकील कामाचा आहे', असे बघतात ना, लोक? कोणी शेठ आले तरी म्हणतील, 'हे, कामाचे आहेत', आणि मग 'या शेठ, या शेठ' करतात. कधी शंभर रुपये मागितले तर मिळतील! लोक स्वार्थापोटीच बोलावत असतात ना! सगळे स्वार्थी प्रेम, पण असे असू नये.

शुद्ध निर्मळ प्रेम! याशिवाय त्याच्यापासून काहीही अपेक्षा ठेवू नये. या दोन हाताच्या माणसांकडून काय अपेक्षा ठेवायची? कुठेही पाच हात असलेले लोक पाहिले आहेत का? हे लोक तर संडासाला लागली की पळत सुटतात. यांच्याकडून काय अपेक्षा ठेवायची! अरे, जुलाबाची गोळी घेतली असेल ना, तर मोठा कलेक्टर असेल तरी धावपळ करील. अरे, तू कलेक्टर आहेस, तर जरा हळू चाल ना! तर म्हणेल, 'नाही जुलाब झाले आहेत!' म्हणजे यांच्याकडून अपेक्षा करण्यासारखी नाहीच, अपेक्षा करण्यासारखा तू माणूसच नाही. अशांकडून काय अपेक्षा ठेवायची? स्वार्थ राखण्यासारखा आहे का? तुम्हाला काय वाटते?

**प्रश्नकर्ता :** जसे दादा म्हणतात, तसेच आहे.

**दादाश्री :** हो, म्हणून जर अजूनही काही मळलेले असेल तर स्वच्छ करून टाका ना! घरही स्वच्छ ठेवा. मतलबी प्रेम असता कामा नये. 'हे मला कसे उपयोगी पडतील' असे वाटू देऊ नका.

शुद्धात्म्याकडे दृष्टी तेच प्रेम! मग बायकोच्या चेहऱ्यावर गाठी आल्या तरी तुमच्या मनाला क्लेश होणार नाहीत! नाहीतर जोपर्यंत चेहरा छान दिसतोय तोपर्यंत चांगला भाव आणि चेहेऱ्यावर गाठी आल्या तर मनात सतत खटकत राहते. असे होते की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, होते, असा दुर्भाव होतो.

**दादाश्री :** अरे, अभाव होतो, अभाव!

आता सर्व स्वार्थमय झाले आहे. तेव्हा सोडा आता, कुठल्याच गोष्टीचा हव्यास करू नका. जर कोणी आपणहून दिले तर ठीक आहे,

नाहीतर असेच चालवून घ्या ना! या भौतिक गोष्टींचा हव्यास का धरावा? स्त्रीवर कुदृष्टी ठेवणे आणि हव्यास करणे या दोन्ही गोष्टी सारख्याच आहेत. बाप मुलाकडून काही मिळण्याची लालसा करत असतो आणि मुलगा बापाकडून काही मिळण्याच्या लालसेत असतो! म्हणजे घरातसुद्धा स्वार्थ आहे. नाही का?

हा सगळा संसार निव्वळ स्वार्थमय आहे. फक्त आपले हे एकच ठिकाण स्वार्थरहित आहे, म्हणून इथे सर्वांना एकता वाटते. जिथे काही स्वार्थ नसतो तिथे परमात्मा अवश्य असतात, स्वार्थापासून भगवंत दूर असतात! म्हणून इथे सर्वांना आनंद वाटतो, सर्वांना किती एकता वाटते! आता जर इथे पाच कप चहा आणला तर हे सर्व पाच कप चहातच भागवून घेतील. आणि बाहेर तर तीस लोकांसाठी पस्तीस कप चहा आणला तरी तो त्यांना कमी पडतो, कारण त्यांच्यात पाच-सात लोक दोन-दोन कप चहा पिणारे निघतात, म्हणून मग दुसऱ्यांना कमी पडतो.

तुम्ही मतलबी लोकांना भेटले आहात का? आणि जे मतलबी लोक आहेत, ते तर आपला उपयोग भाजीसारखा करू पाहतात! त्यांच्या सुरीने भाजी चिरून खातील. अशा मतलबींबरोबर राहता कसे येईल? सगळेच मतलबी आहेत ना? त्यांच्या स्वार्थाची लिमिट किंवा मतलबीपणाची लिमिट आपण 'एक्सेप्ट' (मान्य) करतो. पण जेव्हा ती लिमिट पार केली जाते, तेव्हा त्यांच्या व्यवहारावर निंदा होते!

सख्ख्या काकाचा मुलगा घरी आला आणि तो जरा गरीब स्थितीत असेल, तर घरी आल्यावर त्याला 'या' पण म्हणत नाहीत, पण एक डॉक्टर घरी येताना लांबूनच दिसला, तरीही उभे राहून 'या, यावे, यावे साहेब' म्हणतात. असे का बरे? तो डॉक्टर गेल्यावर त्यांना विचारले की, 'काय बाबा! त्या डॉक्टरबद्दल तुमचे भाव चांगले होते आणि काकाचा मुलगा आला तर त्याच्याबद्दल चांगले भाव का नव्हते?' तर म्हणतील 'हा डॉक्टर कधीतरी कामी येईल, हा भाऊ काय कामाचा?' अरे, ही तर तुझ्या मनात भावना तयार झाली की, 'माझे शरीर बिघडेल', म्हणजे तू हे रोगाचे बीज पेरलेस.'

## गरज आहे, म्हणूनच फसगत होते

स्वत:ची स्वत:वरच श्रद्धा नसते की 'मी कोणीतरी आहे.' आता, 'मी कलेक्टर आहे' अशी श्रद्धा असते, पण हे कलेक्टर पद जाऊ शकते. तू असा आहेस की तुझे कायमस्वरूपी पद आहे, तर मग तेच शोधून काढ ना! कलेक्टर पद तर निघून जाईल. लोकांनी उद्या उठाव केला तर? तुला काढून टाकले तर? किंवा तुझ्यावर काही तरी आरोप ठेवून जेलमध्येही पाठवू शकतात.

म्हणून कोणाचे नाव घेऊ नका आणि कोणाचे ऐकूही नका. नाव तर कुणाचेच घेऊ नये, पण ऐकायचेही नाही. कारण तेही जीवच आहेत ना! पण आपल्यातच लालच असते ना की 'हा माणूस माझ्या कामाचा आहे.' हे लोक तर गरज असेल तर गाढवालाही बाप म्हणतील असे आहेत. गाढवालाही बाप म्हणतील? 'हो, गरज आहे म्हणून म्हणावेच लागेल ना!' अरे, मग तुम्ही जा, गाढवांकडेच जा. अशी काय गरज आहे की गाढवालाही बाप म्हणता? बापाला बाप म्हणणे ही गोष्ट वेगळी आहे. कधी काकांकडून काही काम काढायचे असेल तर त्यांनाही बाप म्हणू शकतो, पण म्हणून काय गाढवाला बाप म्हणाल? पण या लोकांना अशी सवयच लागली आहे, त्यांना गरज इतकी गोड वाटते त्या गोडव्यासाठी ते काहीही करायला तयार होतात. गरज कशी लागते? तर साखरेपेक्षाही गोड लागते.

## वेड्याला गाव द्याल तर सुटाल...

आपल्याकडे एक म्हण आहे की *डाह्याने डाम अने गांडाने गाम.* (शहाण्याला डाग देणे आणि वेड्याला गाव देणे) पण ते खरे आहे. कारण वेड्याबरोबर जे बांधले गेले आहेत ते सुटू शकत नाहीत. त्याला तर सगळी संपत्ती देऊन टाकूनही सुटणे चांगले, नाही तर वेडा चावायला धावेल. म्हणून तो जे मागेल ते देऊन केस बंद करून टाकली पाहिजे. मी तर जीवनभर हीच पद्धत वापरली. शहाण्या माणसाला तर समजावता येते की, 'बाबा तुझे काम तर नंतरही होऊ शकेल पण आता हे सोड आणि त्याच्याशी वाद न करता विषय संपव!'

**प्रश्नकर्ता :** म्हणजे शहाणा पुण्य बांधतो आणि वेडा पाप बांधतो असेच ना?

**दादाश्री :** अरे, निव्वळ पापच बांधतो. तो स्वत: वेडेपणा करून लोकांकडून मालमत्ता हडप करतो, तेही पापाने घेतो आणि पाप बांधून घेतो. आणि शहाणा तर स्वत:ची मालमत्ता देऊन पुण्य बांधतो. म्हणजे वेड्या माणसाला समजच नसेल तर काय होणार? म्हणूनच ही म्हण पडली ना? आणि पूर्वीपासूनच हे असे आहे. म्हणून तर लोक म्हणतात ना की, 'वेडा आहे, त्याला हवे ते देऊन टाका ना!' वेड्यापासून तर कशी तरी सुटका करून घेतली पाहिजे ना? नाही तर तोच म्हणेल, 'माझ्या बागेत कशाला आलात?' उलट तो मारेलसुद्धा. एखादा वेडा तुम्हाला भेटला की मग समजेल तुम्हाला. चार भावांमध्ये एखादा जर वेडा असला की बाकी सर्वांना खूप त्रासदायक होतो! शेवटी त्रासून (त्यातला एखादा भाऊ) म्हणतो की आता कोणत्याही जन्मात मला भाऊच नको. अरे, पण बाकीचे तीन भाऊ तर चांगले आहेत ना? असे म्हटले तर तो म्हणेल 'नाही, आता मला भाऊच नको.' म्हणजे वेड्याच्या बाबतीत तर कसेही करून निपटारा करून टाकावा. शहाण्यासोबत काही हरकत नाही, पण वेड्याशी वागणे खूप कठीण आहे! पूर्वी आपण पाहिले आहे की, वेड्यांना तर पूर्ण गावे दिलेली आहेत. ते बिचारे जन्मत:च वेडे, पण खरे तर ते डोक्याने वेडे नसतात, तर खूप हुशार असतात, पण जगातील लोकांना ते वेडे वाटतात. असे का होते? कारण ते अतिशय स्वार्थी असतात, म्हणून लोक त्यांना वेडे म्हणतात, ते वेडे नसतातच, पण त्यांच्या अति स्वार्थामुळे जर त्यांना काही दिले नाही, किंवा कमी दिले तर ते भांडतात आणि मामला खेचून धरतात. मग काही उपयोग होत नाही. हे कुत्रे सुद्धा कधी भुंकायला लागले आणि त्यांना भाकरीचा तुकडा टाकला तर भुंकणे बंद करतात. तसेच आपला वाटा सोडून देऊन त्यांना द्यावा लागतो म्हणजे ते भांडायचे थांबतात.

तुम्हाला जर ही कला साधली तर तुम्ही सर्व काही जिंकाल, नाही तर या जगात जिंकता येणार नाही. कितीतरी प्रकारचे लोक आहेत आणि प्रत्येकाची वेगवेगळी डोकी, मग कुठेही ताळमेळ बसणार नाही ना!

## ...आणि वीतरागींबरोबर भांडले तरी सुटका होईल

तसे तर भगवंताला देखील 'आपण असे का केले?' असे विचारणारे लोक भेटले होते. अरे, मलाही विचारतात ना! कारण त्यांना अधिकार आहे. कोणीही काहीही विचारू शकतो. अरे, वेडेपणाही करतात. मला तर असेही म्हणतात की, 'तुम्हाला अक्कल नाही.' त्यांना मी म्हणतो, 'आधीपासूनच नव्हती, तुला तर आज कळले पण मला आधीपासूनच माहीत आहे!' आता तो स्वत:च्या जबाबदारीवर बोलतो ना! पण मला त्याला समजावून वळवून घ्यावे लागते, नाहीतर त्याला फार मोठा दोष लागेल ना! जसे एखादा कुत्रा फार भुंकत असेल तर त्याच्या पाठीवर हात फिरवला की तो शांत होतो! असे हे मनुष्यसुद्धा भुंकत असतील तर त्यांच्या पाठीवर हात फिरवला की ते शांत होतात! खूप उग्र स्वभावाचा असेल तरच तो बिचारा असे करील ना? दु:खामुळे करतो ना! सुखामुळे काय कोणी दुसऱ्यांवर कषाय करील? सुखी व्यक्ती दुसऱ्यांवर कषाय करतो का? पण तो दु:खी आहे म्हणूनच समोरच्यावर कषाय करतो, म्हणून आम्ही आधी त्याला शांत करतो आणि मग त्याची विराधना तोडून घेतो! कारण हे त्याने जाणूनबुजून केलेले नाही, समज नसल्यामुळे केले आहे.

म्हणजे आजकालच्या लोकांनी जाणूनबुजून काही गुन्हा केलेलाच नाही, इतके चांगले आहेत हे लोक! हे सर्व गुन्हे अज्ञानामुळेच झाले आहेत. जाणूनबुजून एकही गुन्हा केलेला नाही, असे आहेत आजकालचे लोक, खूपच चांगले लोक आहेत, पण फक्त समज थोडी उणी पडली आहे! आणि पूर्वी तर जाणूनबुजून गुन्हा करीत असत. 'मी जाणतो, मी *बुझतो* (समजतो) की तू महावीर आहेस, तू सर्व ब्रह्मांडाचा नाथ आहेस, तेही मला माहीत आहे, तुला करायचे ते कर!' असे जाणूनबुजून करणारे लोकही होते. पण ती मोठी माणसे होती. कारण एवढा मोठा गुन्हा, इतक्या मोठ्या माणसांशी करणे ते काय लहान मुलांचे काम आहे? नाही. मग इथून सरळ सातव्या नरकात जातात! तिथून मग देवलोकात जातात, आणि नंतर परत इथे येऊन वीतराग धर्म प्राप्त करून मोक्षाला

जातात. कारण वीतरागींशी भांडले ना! भगवंतांनी सांगितले होते की भांडायचे असेल तरी वीतरागींशी भांडा, पण शिव्या मात्र देऊ नका. तुम्हाला जर भांडायची इच्छा असेल तर वीतरागींशी भांडा, चांगले व्यवस्थित भांडा, मारामारी करा, मग त्यांच्याशी हिशोब बांधला जाईल, पण इतर लोकांशी तर भांडूच नका. जर तुम्ही अमेरिकन माणसाशी भांडलात तर तुम्हाला तिथे जावे लागेल. 'मेरी' शी लग्न करावे लागेल आणि मग 'मेरी' जेव्हा डायवोर्स घेईल, तेव्हा तुमची काय दशा होईल? म्हणजे असे आहे हे सगळे! कर्मांची गती समजतच नाहीत.

आम्ही कठोर बोलतो. ज्ञानींचे शब्द कठोर का असतात? कारण ते निर्भयतेने बोलतात आणि सारे जग भीत भीत बोलते. वर 'बाप' आहे त्याची भीती वाटते. कर्म बांधले जाईल याची भीती वाटते. पण 'ज्ञानी पुरुषा'ला मात्र कसलीच भीती नसते. ज्यांची कर्मे बांधली जातात त्यांना भीती असते. ज्ञानी तर जगाला फॅक्ट (तथ्य, वस्तूस्थिती) सांगतात, जगातील कोणत्याही व्यक्तीला जी फॅक्ट आहे तीच सांगतात. कारण त्यांना काही नकोच आहे, मग काय? ज्याला काहीतरी हवे आहे त्याला लालचेमुळे भ्यावे लागते. 'ज्ञानीं'ना तर जगातील कोणतीच गोष्ट नको असते, मग त्यांना कसली भीती? ते तर जगाचे मालक आहेत.

## अहाहा! ज्ञानींची करुणा!

हे जग तर फार भयंकर आहे, महावीर भगवंतांनाही हैराण, हैराण करून टाकेल असे आहे.

**प्रश्नकर्ता :** मलाही असा अनुभव आलाच आहे ना!

**दादाश्री :** तुम्हाला जे अनुभव आलेत ते वेगळ्या प्रकारचे आले आहेत आणि भगवंतांना जे अनुभव आलेत ते वेगळ्या प्रकारचे आले आहेत. भगवंत तर सर्वसत्ताधारी होते तरी पण गत्यंतरच नाही ना! जिथे परसत्ता आहे तिथे स्वसत्ता चालत नाही आणि स्वसत्ता आहे तिथे परसत्ता काही करू शकत नाही. तुमच्यात अजून स्वसत्ता आणि परसत्ता वेगळ्या झाल्या नाहीत, म्हणून तुमची केस यात गणली जाणार नाही ना?

**प्रश्नकर्ता :** कमी-अधिक शक्तीच्या अनुसारच अंतराय (विघ्न, बाधा) येतात ना?

**दादाश्री :** हो, शक्ती जास्त असेल तर अंतराय जास्त येतात. या दुनियेत सरळ माणसांच्या बाबतीत खूप चांगले असते, सरळ माणसांना काही स्पर्श करू शकत नाही. मुळात आम्ही आधीपासूनच सरळ स्वभावाचे आहोत ना, म्हणून आम्हाला काही स्पर्श करू शकत नाही. आम्ही सरळ आहोत पण समजून-उमजून सरळ आहोत. *'वांक-सरळता'* (अज्ञान सरळता) तर खूप जीवांमध्ये असते. आम्हाला समजले की या माणसाचे बिलकुल 'करेक्ट' आहे, तर आम्ही त्याच्याशी अगदी सरळ, दुसरे काही नाही. आणि जर कोणी वाकडा चालला तरी आम्ही सोडून देतो, पण समजून-उमजून जाऊ देतो. आम्ही करुणा करतो, तीही समजून-उमजून करुणा करतो. आम्हाला कळते की हा वाकडा वागतो आहे, कारण याची शक्ती कमी आहे, म्हणून वाकडा वागतोय हा! पण अशी करुणा आम्ही समजून-उमजूनच करतो.

एकदा जो 'ज्ञानी पुरुषा'कडे आला आणि त्यानंतर जर त्याने अहंकाराने वेडेपणा केला तर तो मारला जाणारच ना? नाही तर इथे येऊच नकोस, वीतराग रहा, दूरच रहा. जर लांबचे असलेले लोक बोलले तर ते त्यांना जास्त धोक्याचे नाही, पण इथे आल्यावर जर उलटा बोलला तर त्याला वेडा अहंकार म्हणावे लागेल. हा वेडा अहंकार त्याला स्वतःलाच खूप खूप त्रास देतो. तरीही आम्ही त्याला वाचवतच राहतो! एकच भाव ठेवतो, करुणाच करतो त्याच्यावर!

## परक्या बाजारात गुन्हेगार कोण?

एक व्यक्ती मला विचारत होती की, 'दादा, तुमच्यामध्ये लोकांना न सांगण्यासारखे काही आहे का?' मी म्हटले, 'नाही, नाही, इथे बिलकुल गोलमाल नाही, एवढीशी देखील गोलमाल चालत नाही. रात्रंदिवस माझ्यासोबत राहिलात, निरंतर राहिलात तरीही माझी थोडीशी देखील चूक किंवा इंसिन्सियारिटी तुम्हाला सापडणार नाही. आत काही

असेल तरच चूक दिसेल ना!' आम्ही संसारात राहतच नाही. क्षणभर देखील संसारात राहिलेलो नाही. संसारात राहणे याला पर-परिणती म्हणतात. आम्ही स्व-परिणामातच राहतो, निरंतर मोक्षातच राहत असतो, उघड्या डोळ्यांनीच राहतो. सारे जग बंद डोळ्यांने आहे. संसारात दुःख आणले कुठून? दुःख तर बंद डोळ्यांमुळे आहे. बंद डोळे म्हणजे काय? पती पत्नीबद्दल म्हणेल की, 'ही वाईट आहे.' तर पत्नी म्हणेल, 'मी चांगली आहे.' याला म्हणतात उघड्या डोळ्यांनी आंधळे. भगवंताच्या भाषेत कोणती गोष्ट बरोबर आहे? तर भगवंत म्हणतात, 'दोघेही आंधळे आहेत, म्हणून असे करत आहेत.' जर भगवंताची भाषा समजायची असेल तर भगवंताच्या भाषेत या जगात कोणतीही व्यक्ती अजिबात गुन्हेगार नाही. या दुनियेत मला कोणीच गुन्हेगार वाटत नाही. खिसा कापेल तोही गुन्हेगार नाही आणि फुलहार घालेल तोही गुन्हेगार नाही. तुम्हाला गुन्हेगार वाटतो तोच तुमचा गुन्हा आहे, तुमच्या दृष्टीचा रोग आहे. जेव्हा दृष्टीचा हा रोग जाईल तेव्हा काम होईल. कोणी गुन्हेगार आहे असे वाटणे यालाच मिथ्यात्व म्हणतात. तो दृष्टीरोग आहे. जेव्हा 'ज्ञानी पुरुष' दृष्टीरोग काढून टाकतात, त्यानंतर गुन्हेगार दिसणे बंद होते.

कोणी 'कंप्लीट' (पूर्णपणे) गुन्हेगार असेल, आपल्याला कापून टाकण्याच्या तयारीत असेल, असा गुन्हेगार असेल, तरी देखील आपण त्याच्याबद्दल समता ठेवली पाहिजे. तो काय कापणार आहे? आपले कापणारच नाही. जे काही कापायचे असेल ते पुद्‌गलाचे (शरीराचे) कापेल. या दुनियेत पुद्‌गल बाजारातच नुकसान होते. आणि लोक पुद्‌गल बाजारालाच स्वतःचा व्यापार मानून बसले आहेत.

## सरळपणा ही तर महान ठेव

**प्रश्नकर्ता :** दुनिया वाकडी आहे आणि आपण आपल्या स्वभावानुसार सरळतेने वागतो म्हणून मूर्ख मानले जातो. मग सरळता सोडून वाकडे बनावे की मग मूर्ख मानले जावे?

**दादाश्री :** असे आहे की, कितीतरी जन्मांची कमाई असते तेव्हा

कुठे सरळता उत्पन्न होते. आणि जो वाकडा आहे तो तर तुमची ही कमाई कशी वाया जाईल हेच बघत असतो. म्हणून काय आपण आपली कमाई वाया जाऊ द्यावी? आपण आपली ही कमाई गमावली तर आपणही वाकडे होऊन जाऊ, मग आपल्याकडे काय उरणार? सर्व सामान संपले की मग दिवाळेच निघेल!

**प्रश्नकर्ता :** मग काय त्यापेक्षा मूर्ख बनून राहणे हेच चांगले आहे का?

**दादाश्री :** नाही, या जगात कोणी मूर्ख नाही असे नाहीच. जिथे सगळेच मूर्ख आहेत, तिथे तुम्हालाही मूर्ख म्हणाले तर म्हणू द्या ना! तुमच्या मनात मात्र 'हे मला मूर्ख समजतात!' असे वाटू देऊ नका. मग काय अडचण आहे? सरळता तर खूप जन्मांच्या कमाईतून मिळत असते. म्हणून ती कमाई वाया जाऊ देणे म्हणजे फार मोठी जोखीम आहे. आणि तुम्ही तर वकील आहात, तुम्ही कधीच तुमची कमाई वाया जाऊ देणार नाहीत. विचार करून पाहा की इतकी मोठी कमाई काय अशीच वाया जाऊ द्यायची? म्हणूनच थोडेफार असे काही मिळाले तरी हरकत नाही. तुम्हाला मूर्ख मानतो ती त्याची जोखीमदारी आहे. त्याला दोष लागेल. जो असे मानतो ती त्याची जोखीमदारी आहे, त्यात तुमचे काय देणेघेणे? तुम्ही तर सरळपणेच वागता, सरळपणा ही तर उत्तम गोष्ट आहे! वाकड्या माणसांशी सरळ वागणे ही काही अशी तशी गोष्ट नाही, ते सोपे नाही. तर आता तुम्ही जी कमाई केली आहे, आणि ती जर तुम्हाला वाया घालवायची असेल तर तुम्ही या लोकांशी भांडाभांड करा.

## प्रकृती बदलणार नाही, ज्ञान बदला

प्रत्येक व्यक्ती इतकी तयार झाली पाहिजे की तिला कुठल्याही ठिकाणी ओझे वाटणार नाही. ठिकाण्याला कंटाळा येईल पण स्वतःला मात्र कंटाळा येणार नाही, इतकी तयारी व्हायला हवी. अन्यथा ठिकाणे तर अनंत आहेत. अनंत क्षेत्र आहेत, क्षेत्रांना अंत नाही.

सत्य त्याला म्हणतात की ज्यामुळे तुमचे आणि माझे, दोघांचे

समाधान होत असेल. मग ते कायदेशीर असो वा बेकायदेशीर, परंतु जर दोघांचेही समाधान होत नसेल अशा गोष्टीला सत्य म्हणताच येणार नाही ना! जर तुमचे बरोबर असेल तर लोक तुमचा दोष काढणार नाहीत. ज्यांचे तुमच्याशी पटत नाही असे काही लोक असतात, ते कदाचित तुमचे दोष काढतील पण सज्जन लोक तसे करणार नाहीत.

**प्रश्नकर्ता :** मनुष्य अशी प्रकृती (प्रकृती स्वभाव) घेऊनच आला असेल, तर ती प्रकृती कशी बदलेल?

**दादाश्री :** नाही, पण त्याचबरोबर अशा व्यक्तीने स्वत:च ठरविले पाहिजे की, माझी ही प्रकृती दु:खदायक आहे, म्हणून जी सुखदायक होईल अशीच वागणूक मी ठेवली पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** प्रकृतीस्वभाव बदलू शकतो का?

**दादाश्री :** प्रकृतीस्वभाव बदलत नाही पण स्वत:चे ज्ञान तर बदलू शकते ना! प्रकृती तर आपला स्वभाव सोडत नाही, पण स्वत:चे ज्ञान बदलते आणि ज्ञान बदलल्यामुळे सर्व समस्या सुटतात.

## विश्वासघातासारखा दुसरा दोष नाही

**प्रश्नकर्ता :** विश्वासघात करणे हे सर्वात वाईट आहे ना? सर्व दोषांमध्ये विश्वासघात हा सर्वात वाईट दोष आहे ना?

**दादाश्री :** विश्वासघात तर फारच वाईट आहे. जे तुमच्या हक्काचे नाही, त्याचा उपभोग घेणे हा सर्व विश्वासघातच आहे. भेसळ करणे हा ही विश्वासघात आहे. ही सर्व विश्वासघाताचीच स्वरूपे आहेत. कोणी तुम्हाला विश्वासात घेऊन विश्वासघात करत असेल तर त्याला प्रत्यक्ष विश्वासघात म्हणतात, तो फार भयंकर दोष आहे. आणि बिनहक्काचे उपभोगणे, भेसळ करणे हा देखील विश्वासघात आहे.

**प्रश्नकर्ता :** करणे, करविणे आणि अनुमोदन देणे यातील सर्वात जास्त नुकसानकारक काय आहे?

**दादाश्री :** नुकसानकारक? करणे हेच नुकसानकारक आहे ना!

ज्याने केले तोच पकडला जाईल. आणि अनुमोदन ज्या भावाने केले असेल, त्याप्रमाणे त्याचे फळ त्याला भोगावे लागेल. जगात आपली अडवणूक का होते? गुप्त स्वरूपातले गुन्हे केले आहेत म्हणून. माझे असे काही गुन्हे नाहीत, त्यामुळे माझी कुठेच अडवणूक होत नाही. 'मला का अडविले' असे म्हटले तर मग पुढचे काही दिसणारच नाही.

लोक म्हणजे आपलाच आरसा आहे. स्वत:चे प्रतिबिंब पाहण्याचे साधन आहे. या बंधूंना माझ्यामुळे काहीही दु:ख झाले तर समजावे की माझी काहीतरी चूक झाली आहे, आणि मग मी ती चूक सुधारल्याशिवाय राहणार नाही. काही व्यावहारिक चूक झाली असेल तर ती सुधारली तर पाहिजे ना? पण यात करायचे काहीच नसते, फक्त जाणायचेच असते. जे ज्ञान क्रियेत येते, तेच खरे ज्ञान आहे. क्रियेत आले नाही तर समजून जावे की हे ज्ञान चुकीचे आहे.



# [ 15 ]
# दु:ख दूर करण्याचे साधन

## आपलेच हिशोब...

या जगात काहीच चुकीचे नसते. कोणी तुम्हाला काही देत असेल तर ते तुम्ही दिलेलेच तो परत करत असतो. तुम्ही काही दिलेले असल्याशिवाय कोणी तुम्हाला द्यायला येणारच नाही ना? जेवढे तुम्ही दिले असेल तेवढे परत येते, पण कधी दिले होते ते तुम्हाला माहीत नाही, म्हणून तुम्ही आजची खातेवही पाहता, की यात तर दिलेले दिसत नाही, म्हणून तुम्हाला वाटते की हा काहीतरी नवीन द्यायला आला आहे. खरे तर, नवीन कधीही कुणीही देत नसतो. हे सर्व मागील कर्जच आहे, ते तुम्ही लगेच जमा करून घेतले पाहिजे. आणि जर तुम्ही पुन्हा काहीतरी दिले तर व्यापार चालूच राहील.

मागील जन्मात तुम्ही कोणाला दोन शिव्या दिल्या असतील तर या जन्मात तुम्हालाही दोन शिव्या खाव्या लागणार. मग त्यावेळी तुम्हाला वाईट वाटते म्हणून पुन्हा तुम्ही त्याला पाच शिव्या देता. दोन शिव्या परत आल्या तर इतके वाईट वाटते तर पाच शिव्या परत आल्या तर काय दशा होईल? म्हणून तुम्ही आता नवीन उधार देणे बंद करा. ज्या व्यापारात नुकसान झाले होते आणि दु:ख वाटत आहे, त्या व्यापारात पैसे गुंतविणे बंद करा. आपल्याला जर कोणी दोन दोन शिव्या दिल्या तर आपण त्या शांतीपूर्वक जमा करून घेतल्या पाहिजेत, कारण पूर्वी

जे दिलेले होते तेच परत आले आहे, म्हणून आता जमा करून घ्या आणि पुन्हा देऊ नका. म्हणजे या दुनियेत जे मिळते ते सर्व पूर्वी दिलेले तेच परत येत असते, हे जर समजले तर कोडे सुटेल की नाही? म्हणून कसेही करून आपण हे कोडे सोडवायलाच हवे!

चुकीची समजूत हे दु:ख आहे आणि योग्य समजूत हे सुख आहे. त्याला कुठली समजूत मिळत आहे हे पाहिले पाहिजे. चुकीची समजूत असेल तर दु:ख, दु:ख आणि दु:खच मिळेल, आणि ही गाठ योग्य समजुतीमुळे सुटली की सुख, सुख आणि सुखच! आणखी कोणतेच सुख-दु:ख या दुनियेत नाहीच. चुकीच्या समजुतीमुळेच गाठ निर्माण होते. आणि थोडाफार दंड (शिक्षा) देहाला होतो. देह धारण केल्याचा दंड तर होईलच ना? दाढ दुखत असेल तर काय ते कोणी दिलेले दु:ख आहे का? यालाच देहाचा दंड म्हणतात. कोण्या नातेवाईकाचा हिशोब असेल आणि तो चुकता करत असेल तर तुम्ही त्याला थांबवू शकता का? जर तुम्ही म्हणालात की, 'दादा, आता हिशोब बंद करा.' तर दादा बंद करतील, पण खात्यात तर शिल्लकच राहणार ना? वसूली करणाऱ्याला घरी बोलावून चहा-पाणी पाजून 'अलीसाहेब', 'अलीसाहेब' म्हणून पाठवून दिले तरी पण तो परत येईलच ना? त्यापेक्षा एकदाचे देऊन टाका इथून! नाही तरी तो परत आल्याशिवाय राहणारच नाही. तो घेतल्याशिवाय सोडेल का? म्हणून प्रतिकूलतेत म्हणा की 'या घेऊन जा, घेऊन जा!' आपली दादाई बँक आहेच ना!

या दूषमकाळात जे लोक आपल्याला भेटतात, त्यातले बहुतेक सर्व दु:ख देण्यासाठीच आलेले असतात, काही थोडेसे आपल्याला सुख देणारेही असतात. पापोदयाच्या फलस्वरूप दु:ख देणारा भेटतो, पण ते चांगले आहे. कारण मुक्त होण्याचा मार्ग लवकर मोकळा झाला ना!

## जो ओढवून घेतो, त्याला दु:ख होते

**प्रश्नकर्ता :** आम्ही 'डे टु डे लाइफ'मध्ये (दैनंदिन जीवनात) काम करत असतो, शेठपणा करत असतो, कारखान्यात आल्यावर लोकांशी 'फ्रिक्शन' (घर्षण) होते. त्यावेळी त्या व्यक्तीचे जे परिणाम

(भाव) उत्पन्न झाले, आणि माझे जे परिणाम उत्पन्न झाले, तर तेव्हा त्या व्यक्तीचे परिणाम तर आपण बदलून चांगले करू शकलो नाही, तर तो माझा गुन्हा होईल ना?

**दादाश्री :** पण तुमचा भाव बदलत नाही, त्यामुळे तुम्हाला काहीच त्रास नाही.

**प्रश्नकर्ता :** पण माझ्या कृतीमुळे किंवा माझ्या बोलण्यामुळे समोरच्याचा परिणाम (भाव) बिघडतो त्याचे काय?

**दादाश्री :** मला हे सांगायचे आहे की जर तुम्ही कर्ता असाल तर हा दोष तुम्हाला लागू होईल. आणि जर तुम्ही कर्ता नाहीत तर हा दोष तुम्हाला लागू होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** पण आपली वागणूक सर्वांना चांगली वाटली पाहिजे ना?

**दादाश्री :** नाही, तसे काही नाही. तुमचे पांढरे केस कुणाला आवडले नाहीत, तर त्यात तुम्ही काय करणार? तुमचे पांढरे केस पाहून एखाद्याला चांगले वाटले नाही, तर त्यात तुमचा काय दोष?

ही खूप सूक्ष्म गोष्ट आहे. सर्वांना समजणार अशी नाही. लोक तर म्हणतील की, 'तुमच्यामुळे समोरच्याला दुःख झाले तर तुम्हाला दोष लागेल?' अरे, हे कधी बेचैन नसतात, ते सांगा? तुम्ही त्यांना म्हणालात, 'साहेब, चला जेवून घेऊ.' तर ते म्हणतील, 'मी रोज साडेबारा वाजता जेवणारा माणूस आहे, आणि तू मला साडे अकरा वाजता जेवायला सांगतोस?' म्हणजे यांना केव्हा दुःख होईल सांगता येत नाही. यांना दुःख होण्याची कारणे काय कमी आहेत का? दुःखाच्या कारणांनीच तर हे घेरले गेले आहेत. तुमचे पांढरे केस पाहून जर त्यांना दुःख होत असेल तर त्याला तुम्ही काय करणार? म्हणून आम्ही काय म्हटले आहे? की तुम्ही कर्ता नाहीत, म्हणून तुम्ही जोखीमदार नाही. आणि जर तुम्ही कर्ता आहात, जोपर्यंत तुम्हाला 'मी चंदुलाल आहे' असे वाटते, तोपर्यंत जोखीमदारी तुमची आहे.

**प्रश्नकर्ता :** तर मग महावीर स्वामींकडून गोशालाला दु:ख कसे होऊ शकते? कारण गोशाला तर भगवंतांच्या अगदी उलट दिशेने चालत होता ना?

**दादाश्री :** असे आहे की, महावीर स्वामींमुळे गोशाला खूपच दु:खी होत असे, कारण 'हे महावीर आहेत त्यामुळे माझी अब्रू निघून जाते, म्हणून ते नसलेलेच बरे.' असे त्यांना वाटत असे. तर महावीर स्वामी काय म्हणत असत की, 'हे त्याने ओढवून घेतलेले दु:ख आहे, मी दिलेले दु:ख नाही.' जसे हे खाण्या-पिण्याच्या वस्तू मागून घेतात ना? तसेच दु:ख देखील मागून घेतात. आता अशा ओढवून घेतलेल्या दु:खाला कोणी काय करणार? म्हणून महावीर स्वामी म्हणतात की 'त्याने दु:ख ओढवून घेतले आहे, त्याला मी काय करू?' महावीर स्वामींच्या उपस्थितीत गोशाला खूपच दु:खी होत असे. महावीर स्वामींना तर माहीत होते की, हा बिचारा दु:खी आहे आणि त्या दु:खामुळेच तो बोलत असे की 'हे महावीर असे आहेत, तसे आहेत!' आता त्याला महावीर स्वामी काय करणार? त्यांनी काय उपवास करायचा? पण भगवंत तर म्हणतात की, 'हे त्याने ओढवून घेतलेले दु:ख आहे. हे दु:ख माझ्याकडून दिले गेलेले नाही.' मी दिलेले आणि त्याने ओढवून घेतलेले दु:ख, यात खूप फरक आहे.

**प्रश्नकर्ता :** कसे ते समजवावे?

**दादाश्री :** ओढवून घेतलेले दु:ख म्हणजे काय? समजा तुम्ही रोज साडेबारा वाजता जेवता, आणि एखाद्या दिवशी घरी जेवण जरा लवकर तयार झाले, आणि तुम्हाला बोलवायला आले की, 'चला चंदुभाई, जेवणाची वेळ झाली आहे, चला जेवायला, इतका वेळ काय करताय?' त्यावर तुम्ही म्हणता की, 'अहो, मला आता जेवायचे नाही, तुम्ही मला आता का त्रास देत आहात?' तर तुम्हाला हे जे दु:ख झाले ते ओढवून घेतलेले दु:ख आहे. तो काय तुम्हाला दु:ख द्यायला आला नव्हता. तो तर म्हणत होता की 'चला, साहेब, जेवायला चला!'

**प्रश्नकर्ता :** जर आम्हाला दुसऱ्यांना सुख देण्याची इच्छा झाली तर?

**दादाश्री :** दुसऱ्यांना सुख देण्याची इच्छा करण्याची तुम्हाला काय गरज आहे? दुसऱ्यांना सुख देण्याची इच्छा आहे म्हणता, म्हणजे तुम्ही त्या सुखाचे दाता आहात, असेच ना?

**प्रश्नकर्ता :** आणि दुसऱ्यांच्या सुखामुळे मत्सर वाटत असेल ते काय आहे? त्यालाही ओढवून घेतलेले दुःख म्हणायचे का?

**दादाश्री :** मत्सर हे तर ओढवून घेतलेले दुःख आहे. ही सर्व ओढवून घेतलेली दुःखे आहेत. खरे तर जगात अजिबात दुःख नाही.

मला कोणीच दुःख देत नाही, कारण मी दुःख ओढवून घेत नाही. नाही तर दुःख तर होतच राहील, ठोकर तर बसतच राहील आणि जग बोलतच राहील. हे सर्व चालत राहील, पण जो ओढवून घेतो त्यालाच दुःख होते.

**प्रश्नकर्ता :** आणि जे हे दुःख देतात ते तर नवे बीजच टाकत असतात ना?

**दादाश्री :** ते आपण पाहायची गरज नाही, तो तर जगाचा क्रमच आहे. क्रम असा आहे की, सुख-दुःखाचा देण्या-घेण्याचा नैमित्तिक भाव आहे.

## स्वतःचेच दुःख दूर करा

**प्रश्नकर्ता :** समोरच्याला दुःख होत असेल तर आपल्यालाही दुःख होणारच ना?

**दादाश्री :** असे आहे की, लोकांना होणाऱ्या दुःखामुळे जर तुम्ही दुःखी होत असाल तर त्यावर तुम्ही उपाय करा, पण दुःखावर उपाय होत नाही आणि हे लोक फक्त इगोइजमच (अहंकारच) करतात की यांचे दुःख पाहून मला दुःख होते. अरे, पण तुला जर दुःख होत असेल तर तू त्यांचे दुःख दूर कर ना. त्यांच्या सुखासाठी नव्हे तर तुझ्या सुखासाठी तू त्यांचे दुःख दूर कर. आपल्या सुखासाठी आपण त्यांचे दुःख दूर केले पाहिजे, अशा वेळी खिशातून दहा रुपये काढून दिले पाहिजेत.

**प्रश्नकर्ता :** पण असे किती जणांना दहा रुपये काढून देऊ?

**दादाश्री :** यात बुद्धी वापरून मोजणी करायची नाही. तुम्ही द्यायचे ठरविले तर सर्वांना देऊ शकाल. ज्याला द्यायचेच नाही, तो कुणालाही देऊ शकणार नाही. कारण तुमच्याकडे ही सत्ता आहे आणि त्यामुळे सर्व काही होऊ शकते. पण एकीकडे आत दु:ख होत आहे आणि दुसरीकडे किती जणांना पैसे देऊ? असे वाटत असेल तर या दोन्ही गोष्टी एकाच वेळी शक्य होणार नाहीत ना!

निसर्ग म्हणतो की तुम्ही तुमचा खोटा इगोइजम (अंहकार) करू नका. जेवढे तुमच्याकडून होईल तेवढे ऑब्लाइज करा. फक्त ऑब्लाइज करायचे आहे, बाकी काहीही करायचे नाही. तुम्ही दुसऱ्या कुणाचे दु:ख घेऊ शकाल असे नाहीच. कारण तुम्ही स्वत:च दु:खी आहात ना! म्हणून ऑब्लाइज एवरीबडी, बस एवढेच करा. कोणी भुकेलेला तुमच्याकडे आला तर 'त्याच्या मुलांचे काय होत असेल? त्याच्या पत्नीचे काय होत असेल? याचे हिशोब मांडू नका. तो भुकेलेला असेल तर तुम्ही थोडी भजी विकत घेऊन त्याला द्या. बस, तुम्हाला जास्त खोलात जाण्याची गरजच नाही.

आणि दु:ख तर, 'ज्ञानी पुरुषां'ची भेट झाल्यावरच दूर होते. मग तर दु:खातही सुख जाणवू लागते, सध्या तर सुखातही दु:ख वाटत असते.

**प्रश्नकर्ता :** तसे तर मला स्वत:ला काहीही दु:ख नाही, मी दु:खी नाहीच.

**दादाश्री :** ते बरोबर आहे. पण मनुष्य स्वभाव असा आहे की, दुसऱ्यांचे दु:ख पाहून स्वत:ला दु:ख होते. स्वाभाविकपणे दु:ख होतेच.

असे आहे ना, हे जे तुम्हाला दु:खी वाटतात, ती तुमची दृष्टी आहे. त्या दु:खी माणसाला विचारले तर तो म्हणेल 'हे सर्व लोक दु:खी आहेत.' पण काय रे! तू दु:खी नाहीस? तर म्हणेल, 'मला काहीच दु:ख नाही.' म्हणजे ही तुमची दृष्टीच चुकीची आहे, त्यांना

विचारल्यावर तुम्हाला ते कळेल. अर्थात या सर्व लोकांची दृष्टी खरी नसते.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही म्हणता तशी ही गोष्ट माणसांसाठी बरोबर असेल, पण प्राणी दु:खी होत असतील तर त्याचे काय?

**दादाश्री :** माझे म्हणणे असे आहे की, प्राण्यांना जे दु:ख आहे, ते भुकेचे दु:ख आहे, त्यांना दुसरे काही दु:ख नाही.

**प्रश्नकर्ता :** भुकेचे दु:ख असह्य असते ना?

**दादाश्री :** हो, असह्य असते. पण मग आपण काय करणार? त्यावर इलाज काय? संपूर्ण जग आपण कसे चालवू शकतो? आणि हे जे प्राणी दु:खी होतात, ते दुसरे कोणी नाहीत, तर आपलेच जे काका, मामा वगैरे सर्व होते, तेच आता इथे आले आहेत. आपले स्वत:चेच जवळचे सगे-सोयरेच आहेत.

**प्रश्नकर्ता :** जगात सध्या असे खूप लोक आहेत की ज्यांना वाटते की गरीब लोकांना, आजारी व्यक्तींना, दु:खी लोकांना आपण कुठल्याही प्रकारे मदत करावी. असे करणे चांगले आहे की नाही?

**दादाश्री :** हो, पण प्रत्येकाला तसे वाटत नाही ना? जो स्वत: सुखी असेल, स्वत: पूर्णपणे सॅटिस्फाइड (समाधानी) असेल तोच दुसऱ्यासाठी काही करू शकतो, तसे थोडेफार तर सगळेच करतात. परंतु जो स्वत: कायम स्वरूपी सुखी असेल, तो सर्व प्रकारे लोकांसाठी सुखदायी कार्ये करू शकतो.

**प्रश्नकर्ता :** सध्या राजकीय परिस्थितीत जे काही होत आहे, ते पाहून दु:ख तर होणारच ना?

**दादाश्री :** तिथे जे होत आहे त्याच्याशी आपले काय देणेघेणे? आपला खिसा कापला गेल्यावर आपल्याला दु:ख होते की नाही, एवढेच पाहायचे आहे. आपल्याला गाडीत कोणी शिव्या दिल्या किंवा धक्का मारला तर तेव्हा खूप दु:ख होते की नाही, ते पाहायचे आहे. म्हणजे

तिथे जे व्हायचे ते होवो, त्याचे तुम्ही मालक नाही. त्याकरिता तर तुमची भावना अशी असायला हवी की जग असे असू नये, सुखीच असावे, अशी भावना असली पाहिजे. सामूहिक भावना असली पाहिजे. पण भगवंतांनी काय म्हटले आहे? अशी भावना कोणी केली पाहिजे! ज्याचे स्वत:चे दु:ख दूर झाले आहे, त्याच्यासाठी मग बाहेरचे हेच काम करण्याचे शिल्लक राहते. प्रथम स्वत:ची सर्वच प्रकारची दु:खे मिटली असतील, कोणी शिव्या दिल्या तर त्याचा परिणाम होत नसेल, खिसा कापला तरी काही परिणाम होत नसेल, अशी जर आपली स्थिती झाली असेल तर मग ती सर्व औषधे बरोबरच आहेत. (दु:ख दूर करण्याचे काम करणे ठीक आहे,) पण त्याने काही मर्यादेत फायदा होतो, आणि कधी नुकसानही होऊ शकते, असे हे लाभ-अलाभ करणारे आहे. फक्त फायदा करणारे औषध क्वचितच एखादे असते.

जनसेवा करतील असे हे लोक नाहीत. इथे तर त्यांच्या मनात कीर्तीचा लोभ असतो, नावाचा लोभ असतो, मानाचा लोभ असतो, असे वेगवेगळे लोभ दडलेले असतात, तेच त्यांच्याकडून जनसेवा करवितात. खरी जनसेवा करणारे लोक तर कसे असतात? ते अपरिग्रही पुरुष असतात. आणि बाकी लोक तर नाव कमाविण्यासाठी, 'हळूहळू कधीतरी मी मंत्री बनेन' असा विचार करून जनसेवा करतात, आतील दानत वाईट असते. म्हणून बाहेरच्या समस्या, अनावश्यक परिग्रह, वगैरे बंद करा, तर सर्वकाही ठीक होईल. आणि इथे तर एकीकडे परिग्रही, संपूर्ण परिग्रही राहणे आणि दुसरीकडे जनसेवा करणे, हे दोन्ही एकाचवेळी कसे शक्य आहे?

## सेवा-कुसेवा प्राकृत स्वभाव

तुम्ही जी सेवा करता, तो प्राकृत स्वभाव आहे, आणि कोणी कुसेवा करत असेल तर तोही प्राकृत स्वभाव आहे. त्यात तुमचा पुरुषार्थ नाही आणि त्याचाही पुरुषार्थ नाही, पण मनात असेच मानतो की, 'मी करतो.' आता 'मी करतो' हीच भ्रांती आहे. इथे 'हे' ज्ञान दिल्यानंतरही तुम्ही सेवा तर करालच, कारण तशी प्रकृती घेऊनच आला आहात. पण

ती सेवा मग शुद्ध सेवा होईल, आणि आता शुभ सेवा होत आहे. शुभ सेवा म्हणजे बंधन करणारी सेवा, सोन्याची बेडी, म्हणजे बंधनच ना! या ज्ञानानंतर समोरच्या व्यक्तीला काहीही झाले तरी तुम्हाला दुःख होणार नाही, आणि त्याचे दुःख दूर होईल. नंतर तुमच्यात करुणाभाव असेल. सध्या तर तुम्हाला त्याची दया येते की, बिचाऱ्याला किती दुःख होत असेल, किती दुःख होत असेल! त्याची तुम्हाला दया येते. ती दया नेहमीच आपल्याला दुःख देते. जिथे दया आहे तिथे अहंकार असतोच. दयाभाव असल्याशिवाय प्रकृती सेवा करतच नाही. आणि या ज्ञानानंतर तुमच्यात करुणाभाव निर्माण होईल.

## ...कल्याणाच्या श्रेणी वेगळ्याच

हे जे समाजकल्याण करतात, त्याला जगाचे कल्याण केले असे म्हणत नाहीत. तो तर एक सांसारिक भाव आहे, आणि त्याला समाजकल्याण म्हणतात. ते ज्याला जितके जमेल तितके करतात, ती सर्व स्थूल भाषा आहे. आणि जगत् कल्याण करणे म्हणजे सूक्ष्म भाषा, सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम भाषा आहे. फक्त असे सूक्ष्मतम भावच असतात किंवा त्याचे फक्त तुषारच असतात.

**प्रश्नकर्ता :** तर मग मानवसेवा ही एक व्यावहारिक गोष्ट आहे, असेच समजायचे ना? तो तर व्यवहार धर्म झाला ना?

**दादाश्री :** तो व्यवहारधर्मही नाही, तो तर समाजधर्म आहे. ज्या समाजाला अनुकूल असेल, त्यातील लोकांनाच ती अनुकूल होईल आणि तीच सेवा जर दुसऱ्या कुठल्यातरी समाजाला द्यायला जाल तर ती प्रतिकूल होईल. म्हणजेच व्यवहार धर्म कशाला म्हणायचे तर जो सर्वांना सारखा वाटेल त्याला! आतापर्यंत तुम्ही जे केले त्याला समाजसेवा म्हणतात. प्रत्येकाची समाजसेवा वेगवेगळ्या प्रकारची असते. प्रत्येक समाज वेगळ्या प्रकारचा असतो, तसेच सेवा देखील वेगळ्या प्रकारची असते.

**प्रश्नकर्ता :** पण व्यवहारात तर असेच होत असते ना, की

दयाभाव असतो, सेवाभाव असतो, कोणाबद्दल भावुकपणा असतो, आणि वाटते की यांच्यासाठी काही करावे. कोणाला नोकरी मिळवून देणे, आजारी माणसाला हॉस्पिटलमध्ये जागा मिळवून देणे, तर या प्रकारच्या सर्व क्रिया म्हणजे एक प्रकारचा व्यवहार धर्मच झाला ना?

**दादाश्री :** ही सर्व तर सामान्य कर्तव्ये आहेत. आणि समाज सेवा म्हणजे तर ज्याने समाजसेवेचा विडाच उचलला आहे, तो घरात जास्त लक्ष देत नाही पण बाहेरच्या लोकांची सेवा करण्यातच गुंतलेला असतो, ती समाजसेवा म्हटली जाते. आणि बाकी सर्व तर स्वत:चे आंतरिक भाव असतात, असे भाव तर स्वत:मध्ये येतच असतात. कोणाची दया येते, कोणाबद्दल भावुकता वाटते, आणि हे सर्व तर तो स्वत:च्या प्रकृतीत घेऊनच आलेला असतो. पण अखेर तर हा प्रकृतीधर्मच आहे. समाजसेवा हा देखील प्रकृतीधर्म आहे, त्याला प्रकृती स्वभाव म्हणतात की याचा स्वभाव असा आहे, त्याचा स्वभाव तसा आहे. कुणाचा दु:ख देण्याचा स्वभाव असतो तर कुणाचा सुख देण्याचा स्वभाव असतो. हे दोन्हीही प्रकृती स्वभाव आहेत, आत्मस्वभाव नव्हेत. प्रकृतीमध्ये जसा माल भरला आहे, तसाच माल बाहेर पडतो.

## शेवटी उपकार स्वत:वरच करायचा आहे

कधी कुणावर उपकार केले असतील, कोणाचा फायदा करून दिला असेल, कोणासाठी तरी जगले असाल, तर तेवढा स्वत:ला लाभ होतो, पण तो भौतिक लाभ असतो, त्याचे भौतिक फळ मिळेल.

**प्रश्नकर्ता :** कोणावर तरी उपकार करण्यापेक्षा स्वत:वरच उपकार केला तर?

**दादाश्री :** बस, स्वत:वर उपकार करण्यासाठीच हे सर्व करायचे आहे. जो स्वत:वर उपकार करील त्याचे कल्याण होईल. पण त्यासाठी स्वत: स्वत:लाच जाणले पाहिजे, तोपर्यंत लोकांवर उपकार करत राहावे, पण त्याचे फळ भौतिक मिळेल. स्वत:च स्वत:ला जाणण्यासाठी 'मी कोण आहे' हे जाणून घेतले पाहिजे. आतापर्यंत तर तुम्ही 'मी चंदुभाई

आहे' एवढेच जाणत आहात ना? की आणखीही काही जाणता? 'मीच चंदुभाई आहे' असे म्हणता. 'हिचा पती आहे, याचा मामा आहे, याचा काका आहे' अशी सर्व श्रृंखला! असेच आहे ना? हेच ज्ञान तुमच्यापाशी आहे ना? याहून पुढे गेलेला नाहीत ना?

## हा स्वार्थ आहे की परार्थ?

लोक ज्याला स्वार्थी म्हणतात त्याला वीतरागी परार्थी म्हणतात. परार्थी म्हणजे जो सतत दुसऱ्यांसाठीच धडपड करत असतो आणि भयंकर कर्मे बांधतो. एकतर परमार्थी बरा, नाहीतर स्वार्थी बरा. खरा स्वार्थ चांगला आहे. परार्थीचा स्वार्थ तर परार्थ आहे. बायको-मुलांसाठी उलट-सुलट खटाटोप करत राहतो, आणि मग स्वत:तर कर्म बांधून निघून जातो, आणि नंतर ते सर्व खातात-पितात त्याची मुले. तो तर बिचारा पाप बांधून निघून जातो. म्हणून अशा लोकांसाठी करुणा बाळगायला हवी.

**प्रश्नकर्ता :** स्वार्थ आणि नि:स्वार्थ, यातील फरक कसा समजावा?

**दादाश्री :** तुम्ही स्वार्थी माणूस पाहिला आहे?

**प्रश्नकर्ता :** सर्वांनाच स्वार्थ असतो ना?

**दादाश्री :** नाही, तो स्वार्थ नाही, परार्थ आहे. परार्थालाच लोक स्वार्थ म्हणतात. माझ्यासारखा स्वार्थी क्वचितच कोणी असेल, जो स्वत:चा स्वार्थ साधून निघून जातो. या लोकांचा तर परार्थ असतो, परक्यांसाठी जगतात, मेहनत पण परक्यासाठी करतात. लोक ज्याला स्वार्थ म्हणतात ते भ्रांतीच्या भाषेत म्हणतात. यथार्थ समज नसल्यामुळे फॉरेन डिपार्टमेन्टला होम डिपार्टमेन्ट म्हणतात. फॉरेनला होम म्हटले तर फायदा होणार का? म्हणजेच हे लोक परार्थालाच स्वार्थ समजतात आणि परक्यांसाठीच सर्व जोखीम पत्करतात. आपल्याला भ्रांतीमुळे वाटते की ही बायको माझी आहे, ही मुले माझी आहेत, आणि हे सर्व जे दिसत आहे ते भ्रांतीमुळे स्वत:चे वाटते, पण खरे तर ते स्वत:चे नाहीत. आणि ते स्वत:चे नाहीतच असेही नाही. ते स्वत:चे आहेत

पण ते ड्रॅमॅटिक (नाटकी) असायला हवे. तुम्ही त्याला ड्रॅमॅटिक ठेवत नाही ना?

**प्रश्नकर्ता :** तसे तर दुनियेच्या मंचावर सगळेच एक्टर (अभिनेते) आहेत ना?

**दादाश्री :** एक्टर आहेत पण सगळे गोंधळलेले आहेत ना! त्यामुळेच तर गोंधळ हा आहे ना! ज्याला स्वार्थ मानतात तो स्वार्थ नाही. स्वार्थ म्हणजे तर 'स्व'चा अर्थ करणे. होम डिपार्टमेन्टमध्ये राहून 'स्व'ला 'स्व' मानले तर तो होम डिपार्टमेन्टचा लाभ घेऊ शकतो. नाहीतर हे फॉरेनला होम मानतात, तो स्वार्थ नाही, परार्थ आहे.

जगातील लोक तर एक्सेस (गरजेपेक्षा जास्त) परिणामाला आग्रह म्हणतात. संसारात जे आवश्यक असेल त्याला आग्रह म्हणत नाहीत, तसेच जे आवश्यक असेल ते करण्याला स्वार्थ म्हणत नाहीत. आईला आणि मुलाला स्वार्थच असतो ना? पण जेवढे आवश्यक आहे त्याला स्वार्थ म्हणत नाहीत. एक्सेस झाले तरच त्याला स्वार्थ म्हणतात. तसेच जेव्हा आग्रह एक्सेस होतो तेव्हा त्याला आग्रह म्हणतात. आवश्यकतेप्रमाणे असेल तर कोणी हरकत घेणारच नाही ना? या आमटीत आवश्यकतेनुसार काही पदार्थ टाकले असतील तर कोणी हरकत घेईल का?

या जगातील सर्व लोकांना स्वार्थी म्हणत नाहीत. खरे तर हे सर्व जग स्वार्थीच आहे, पण हे त्यांच्या बिलीफमध्ये आहे म्हणून त्याला स्वार्थ म्हणतच नाहीत. पण एक्सेस झाले तर मात्र त्याला स्वार्थ म्हणतात. आणि खरा स्वार्थ कोणता? तर स्वत: स्वत:चाच स्वार्थ ठेवणे, स्वयं शुद्धात्म्याचा स्वार्थ, आणि ते सुद्धा 'मी शुद्धात्मा आहे' असे भान होईल तेव्हा त्याला खरा स्वार्थ म्हणावे. हा सगळा तर परार्थ आहे. स्वार्थासाठी सर्व काही गोळा करतो आणि शेवटी तिरडी निघते.

**प्रश्नकर्ता :** स्वार्थ, परार्थ आणि परमार्थ, ह्या गोष्टी जरा नीट समजावून सांगा.

**दादाश्री :** असे आहे की, इथे तुमच्या गावात कोणी स्वार्थी व्यक्ती आहे का?

**प्रश्नकर्ता :** खरे स्वार्थी मिळत नाहीत.

**दादाश्री :** नाही, ते देखील खरे स्वार्थी नाहीत. जोपर्यंत 'मी चंदुभाई आहे' असे वाटते, चंदुभाईच तुमचे स्वरूप आहे, तोपर्यंत तुम्हाला स्वार्थी मानता येणार नाही आणि तुम्ही जे जे कराल ते सर्व परार्थच समजले जाईल.

*'जो मरण आ जिंदगीनी छे अरे छेल्ली दशा,*
*तो परार्थ वापरवामां, आ जीवनना मोह शा?'*

(जर मृत्यू ही जीवनाची अंतिम दशा आहे, तर मग परार्थासाठी याचा उपयोग करण्यात या जीवनाचा मोह का असावा?)

हा स्वार्थ तर चुकीचा स्वार्थ आहे, पण परार्थात, म्हणजे अजूनही इतरांच्या, परक्यांचा फायद्यासाठी जीवन व्यतीत करणे. उदा. जशी ही मेणबत्ती जळते, ती काय स्वतःला प्रकाश मिळावा म्हणून जळते? समोरच्यासाठी, परार्थासाठी जळते ना? तसेच हे लोक समोरच्या व्यक्तीला फायदा होण्यासाठी जगत असतील तर त्यांचा स्वतःचा फायदा तर त्यात सामावलेला आहेच. नाही तरी मरायचे तर आहेच! म्हणून जर इतरांचा फायदा केलास तर तुझा फायदा त्यात सामावलेलाच आहे आणि दुसऱ्यांना त्रास दिलास तर त्यात तुला त्रास आहेच. म्हणून तुला जे करायचे ते कर. मग काय करायला हवे?

**प्रश्नकर्ता :** परोपकारासाठीच जगायला हवे.

**दादाश्री :** हो, परोपकारासाठीच जगायला हवे. पण आता जर लगेचच तुम्ही लाइन बदलली तर त्यामुळे मागील रिॲक्शन तर येतीलच, आणि मग तुम्ही वैतागून जाल आणि म्हणाल 'हे तर मला अजूनही सहन करावे लागत आहे!' पण काही काळापुरतेच तुम्हाला ते सहन करावे लागेल, त्यानंतर मात्र तुम्हाला कुठलेही दुःख राहणार नाही. ही

तर आता तुम्ही नवीन लाइन बनवत आहात म्हणून मागील रिॲक्शन्स तर येतीलच ना? आतापर्यंत जे चुकीचे केले होते त्याची फळे तर येतीलच ना?

परार्थ म्हणजे काय? दुसऱ्यांसाठी, मुलांसाठी, इतरांसाठी जगणे, पण त्यात तुला काय मिळाले? इथे करोडो रुपये गोळा करतो, बिनहक्काचे घेतो, बिनहक्काचे सर्व उपभोगतो आणि मग सर्वकाही मुलांसाठी सोडून निघून जातो. असे आहे हे जग!

## कार्याचा हेतू, सेवा की लक्ष्मी?

प्रत्येक कामाचा एक हेतू असतो की कोणत्या हेतूने हे काम केले जात आहे? त्यात जर उच्च हेतू निश्चित केला असेल, म्हणजे काय की आता हॉस्पिटल बनवायचे आहे, तर पेशंटला स्वास्थ्य प्राप्त होवो, ते सुखी होवोत, त्यांना आनंद वाटावा, त्यांची जीवनशक्ती वाढावी, असा उच्च हेतू निश्चित केला असेल तर आणि त्याच सेवाभावनेने काम केले असेल तर त्याचे बायप्रॉडक्शन काय? तर लक्ष्मी! म्हणजे लक्ष्मी ही बाय प्रॉडक्ट आहे, तिला प्रॉडक्शन समजू नका. जगात सर्वांनी लक्ष्मीला प्रॉडक्शन बनवून टाकले आहे म्हणून त्यांना बायप्रॉडक्शनचा लाभ मिळत नाही. आणि जर तुम्ही फक्त सेवाभावच निश्चित केला तर त्याच्या बायप्रॉडक्शनमध्ये अधिक प्रमाणात लक्ष्मी येईल. पण इथे तर लोक लक्ष्मीच्या हेतूनेच लक्ष्मी मिळवण्याचा प्रयत्न करतात, म्हणून लक्ष्मी येत नाही. म्हणूनच आम्ही तुम्हाला हेतू सांगत आहोत की 'निरंतर सेवाभाव' हाच हेतू ठेवा. मग बायप्रॉडक्ट आपोआपच येत राहील. जसे बायप्रॉडक्टसाठी काहीच मेहनत करावी लागत नाही, खर्च करावा लागत नाही, ते फ्री ऑफ कॉस्ट (मोफत) मिळते, तसेच ही लक्ष्मी देखील फ्री ऑफ कॉस्ट मिळते, तुम्हाला अशी लक्ष्मी हवी आहे की *ऑन* (मूळ किमतीपेक्षा जास्त किमतीने विकणे)ची लक्ष्मी हवी आहे? *ऑनची* लक्ष्मी नको आहे? मग ठीक आहे. जर फ्री ऑफ कॉस्ट मिळाली तर किती चांगले! म्हणून सेवाभाव निश्चित करा, मनुष्यमात्राची सेवा. कारण आपण हॉस्पिटल उघडले, म्हणजे जी विद्या आपण जाणतो त्या विद्येचा

सेवाभावासाठी उपयोग करण्याचा आपला हेतू असला पाहिजे. त्याच्या फलस्वरूपात इतर गोष्टी फ्री ऑफ कॉस्ट मिळत राहतील आणि मग लक्ष्मीची कमतरता कधीच भासणार नाही. आणि ज्यांनी लक्ष्मी मिळविण्यासाठीच काम केले त्यांचे नुकसान झालेले आहे. हो, कारण लक्ष्मीच्या हेतूने कारखाना काढला तर मग बायप्रॉडक्ट तर निर्माणच होणार नाही ना! कारण लक्ष्मी स्वत:च बायप्रॉडक्ट आहे, बायप्रॉडक्शनचे! म्हणून आपण प्रॉडक्शन ठरविले पाहिजे, ज्यामुळे बायप्रॉडक्शन फ्री ऑफ कॉस्ट मिळत राहील.

आत्मा प्राप्त करण्यासाठी जे काही केले जाते, ते प्रॉडक्शन आहे आणि त्याच्यामुळे मग बायप्रॉडक्ट मिळत असते आणि संसारातील सर्व गरजा पूर्ण होतात. मी माझे एकाच प्रकारचे प्रॉडक्शन ठेवलेले आहे, 'जगाला परम शांती मिळो आणि काहीना मोक्ष मिळो.' हे माझे प्रॉडक्शन आणि त्याचे बायप्रॉडक्शन मला मिळतच राहते. हे चहा-पाणी आम्हाला तुमच्यापेक्षा वेगळ्या प्रकारचे मिळते. त्याचे कारण काय? तर तुमच्या तुलनेत माझे प्रॉडक्शन उच्च कोटीचे आहे. तुमचे प्रॉडक्शनसुद्धा असे उच्च कोटीचे झाले तर बायप्रॉडक्शनही उच्च कोटीचे मिळेल.

बाकीचे सर्व प्रॉडक्शन बायप्रॉडक्ट असते, त्यात तुम्हाला जरूरीच्या सर्व वस्तू मिळत राहतील, आणि सहजपणे मिळत राहतील. पाहा ना! हे पैशांचे प्रॉडक्शन केले आहे त्यामुळे आज पैसा सहजपणे मिळत नाही, नुसती धावपळ, व्याकूळ अवस्थेत फिरतात. जणू चेहऱ्यावर एरंडीचे तेल चोपडले आहे, असे दिसतात! घरात चांगले खायला-प्यायला आहे, कितीतरी सोयी आहेत, रस्ते किती चांगले आहेत, रस्त्यावर चालले तर पायाला धूळ लागत नाही! म्हणून माणसांची सेवा करा, माणसांमध्ये भगवंत विराजमान आहेत. भगवंत आतच बसलेले आहेत. भगवंताला बाहेर शोधाल तर ते सापडणार नाहीत. तुम्ही माणसांचे डॉक्टर आहात म्हणून तुम्हाला माणसांची सेवा करायला सांगतो. जनावरांचा डॉक्टर असेल तर त्याला जनावरांची सेवा करायला सांगेन. जनावरांमध्येही भगवंत विराजमान आहेत. पण माणसांमध्ये भगवंत विशेषरूपात प्रकट झालेले आहेत!

**प्रश्नकर्ता :** कर्तव्य तर प्रत्येक व्यक्तीला असतेच, मग तो वकील असो वा डॉक्टर, पण कर्तव्य तर हेच असते की मनुष्य मात्राचे भले करावे ?

**दादाश्री :** हो, पण हे लोक तर 'भले करायचे आहे' असे ठाम न ठरवताच करत राहतात, काहीही निर्णय न घेताच. कुठलाही हेतू निश्चित न करता अशीच गाडी चालू असते. कोणत्या गावी जायचे आहे त्याचा पत्ताच नाही, आणि कुठल्या गावी थांबायचे आहे याचाही पत्ता नाही, वाटेत कुठे चहा-पाणी करायचे याचाही पत्ता नाही. बस, नुसते धावत राहतात. म्हणून सगळा गुंता होत जातो. हेतू निश्चित केल्यानंतरच कार्य केले पाहिजे.

लक्ष्मी तर बायप्रॉडक्शन आहे. तिचे प्रॉडक्शन होऊ शकत नाही. जर त्याचे प्रॉडक्शन होऊ शकत असते तर आपण कारखाना काढला असता आणि प्रॉडक्शन म्हणून त्यातून पैसे मिळाले असते. पण नाही, लक्ष्मी तर बायप्रॉडक्शन आहे. सर्व जगाला लक्ष्मीची गरज आहे. तर मग आपण अशी कोणती मेहनत केली पाहिजे की आपल्याला पैसे मिळतील! हे समजण्याची गरज आहे. लक्ष्मी बायप्रॉडक्ट आहे, म्हणून प्रॉडक्शनमधून आपोआपच मिळेल, सहजपणे मिळेल. पण लोकांनी तर लक्ष्मीचेच कारखाने काढले, तिला प्रॉडक्शनच बनवून टाकले.

आपल्याला फक्त हेतूच बदलायचा आहे, बाकी काहीच करायचे नाही. पंपाच्या इंजिनाचा एक पट्टा या बाजूला लावला तर पाणी निघेल, आणि त्या बाजूला लावला तर साळीमधून तांदूळ निघतील. म्हणजे फक्त पट्टा लावण्यातच फरक आहे. हेतू निश्चित करायचा आहे आणि तो हेतू कायम लक्षात ठेवायचा आहे. बस, आणखी काही नाही. लक्ष्मी लक्षात असता कामा नये.



# [ 16 ]
# बॉस-नोकरांमधील व्यवहार

## जे 'स्वतंत्र' बनवते ते शिक्षण खरे

खूप जन्मांपासून असे शिकत आलो आहोत आणि आता परत तेच तेच शिकायचे? हा लहान मुलगा मोठा होऊन ऐंशी वर्षांचा म्हातारा होतो आणि मग मरतो. मग परत इथे आल्यावर परत बे एके बे शिकतो! अरे, हे तर मागच्या जन्मातही शिकला होतास ना? पण विसरून गेलास ना? मातेच्या गर्भात आल्यावर सर्व काही विसरून जातो.

**प्रश्नकर्ता :** खरे शिक्षण तर तुमच्याकडेच आहे.

**दादाश्री :** खरे बोललात, खरे शिक्षण 'हेच' आहे. अस्सल शिक्षण 'हेच' आहे. म्हणून आपण जर इथे शिकलो ना, तर 'शाळेत' फारसे जावे लागणार नाही! जर माझ्याकडून काही गोष्टी शिकून गेला तर तो स्वतंत्र होईल, आणि हे केवढे मोठे स्वातंत्र्य आहे! जगात कोणीही *उपरी* (वरिष्ठ, बॉस, मालक) नाही, असे स्वातंत्र्य! कारण माझा कोणी *उपरी* नाही, म्हणून मग तुमचा *उपरी* फक्त मी असेन, पण मी तर अगदी बालकासारखा आहे. लहान बालकासारखा नाही का वाटत? लक्षणे, निर्दोषपणा हे सर्व दिसत नाही का? ज्ञानी पुरुष बालकासारखे असतात. ते तुम्हाला रागावून रागावून किती रागावतील? असे 'ज्ञानी पुरुष'च फक्त *उपरी* असतील तर मग काही हरकत नाही.

माझा कोणी *उपरी* नाही आणि तुमचा *उपरीही* कोणीच नाही. स्वत:चा *उपरी* स्वत:च्या चुका आहेत. चुका म्हणजे ब्लंडर्स आणि मिस्टेक्स, हे दोनच स्वत:चे *उपरी* आहेत. या जगात आणखी कोणीही दुसरा कोणीच *उपरी* नाही. प्रत्येकाचे जग स्वतंत्र आहे. आपापल्या कामांसाठी जोखीमदार स्वत:च आहे, म्हणून जोखीमदारी समजून घेऊन काम करा.

## त्रास देण्यात जबाबदारी कोणाची?

हे जग आपले आहे, यात इतर कोणाचीही जबाबदारी नाही. परमात्मा जर *उपरी* असता तर आपण गृहीत धरले असते की आपण पाप करू आणि परमात्म्याची भक्ती करू म्हणजे पाप धुतले जाईल, पण असे होत नाही. ही जबाबदारी तर आपलीच आहे. किंचितमात्र, एक जरी विपरीत विचार आला तर त्याला आपणच जबाबदार आहोत. 'होल एन्ड सोल रिस्पोन्सिबल' आपणच आहोत. वरती कोणीच नाही, तुमचा कोणीच *उपरी* नाही, कोणी असलाच तर तो तुम्ही स्वत:च आहात.

व्यक्ती रूपात मात्र सगळे वेगळे आहेत, पण आहेत आत्माच, म्हणजे ते सर्वही परमात्माच आहेत. म्हणून कोणालाही डिवचू कोणालाही त्रास देऊ नका. मदत करता आली तर करा, आणि करता येत नसेल तरी काही हरकत नाही, पण अजिबात त्रास देऊ नका. लोक वाघाला त्रास देत नाहीत, सापाला त्रास देत नाहीत, पण माणसांना त्रास देतात, त्याचे कारण काय? वाघ किंवा साप तर मारून टाकील, आणि माणूस फार तर काठीने मारील किंवा असेच काही तरी करील. म्हणूनच माणसांना त्रास देतात ना लोक? कुणालाही त्रास देऊ नये, कारण आत परमात्मा बसलेला आहे, माझे म्हणणे तुम्हाला समजत आहे का? तुम्ही कोणाला त्रास दिला होता का?

**प्रश्नकर्ता :** स्वत:च्या हाताखाली काम करणाऱ्यांना लोक त्रास देतात.

**दादाश्री :** जोपर्यंत तुम्हाला तुमच्या हाताखाली असलेल्या

लोकांना ओरडण्याची सवय आहे, त्यांना रागावण्याची सवय आहे, तोपर्यंत तुम्हालाही रागावणारा कोणीतरी भेटेलच. मी कोणावर रागावत नाही, म्हणून मलाही कोणी रागावत नाही. आपल्या हाताखाली काम करणारे रागावण्यासाठी नाहीत, त्यांना संतोष होईल अशा प्रकारे आपण आपले काम करून घेतले पाहिजे. या बैलाला रोज दहा रुपयांचे खायला देतात आणि तीस रुपयांचे काम करून घेतात. तसेच आपल्याकडे जे मजूर काम करतात त्यांना बिचाऱ्यांना फायदा होत असेल तरच आपल्याकडे राहतील ना? पण आपण त्यांना सतत खडसावत राहिलो तर ते कुठे जातील? जीवमात्रात भगवंत विराजमान आहेत, पण मनुष्यांमध्ये तर भगवंत व्यक्त रूपात आहेत, ईश्वर स्वरूपात आहेत, भले परमेश्वर स्वरूप झाले नाहीत. ईश्वर का म्हणायचे? कारण त्याने जर मनात ठाम ठरविले ना की यांना एकदिवस गोळी घालून ठार करायचे आहे, तर तो गोळी घालून ठार करू शकतो ना? अशा प्रकारे ते ईश्वर स्वरूप आहेत, म्हणून त्यांचे नावही काढू नये. म्हणूनच आम्ही म्हणतो ना, की या काळात ॲडजस्ट एवरीव्हेअर व्हा. कुठेही डिसॲडजस्ट होण्यासारखे नाही, इथून तर निसटून जाण्यासारखे आहे. 'हे' विज्ञान एक-दोन जन्मात मोक्षाला नेणारे आहे, म्हणून इथेच (मोक्षाचे) काम करून घ्यायचे आहे.

## त्यात चूक कोणाची?

**प्रश्नकर्ता :** माझा स्वभाव असा आहे की चुकीचे काही सहन होत नाही, म्हणून राग येतो.

**दादाश्री :** ते चुकीचे आहे, असा न्याय कोण करतो?

**प्रश्नकर्ता :** जेवढी माझी बुद्धी चालते, त्यानुसार करतो.

**दादाश्री :** हो, तेवढाच न्याय होतो.

**प्रश्नकर्ता :** पण असे आहे ना की, आपण कुणाला रोजचे पंचवीस रुपये पगार देतो, आणि ती व्यक्ती पाच रुपयांचे देखील काम करत नसेल तर मला असे वाटणारच की हे बरोबर नाही?

**दादाश्री :** पण तो काम का करत नसेल? कोणत्या कारणामुळे तो काम करत नसेल?

**प्रश्नकर्ता :** तो स्वभावत:च आळशी आहे, म्हणून.

**दादाश्री :** अशी माणसे सगळ्यांनाच मिळतात का?

**प्रश्नकर्ता :** सर्वांनाच मिळत असतील असे कसे म्हणता येईल?

**दादाश्री :** मग तुम्हालाच असा माणूस का मिळाला? त्याचे काही कारण तर असेल ना?

**प्रश्नकर्ता :** माझी मागील कर्मे तशी असतील म्हणून मला मिळाला.

**दादाश्री :** तर मग त्यात त्याचा काय दोष? मग त्याला रागावण्याचे कारणच काय? राग तर स्वत:वरच काढा की 'बाबा! मी अशी कशी कर्मे बांधली की मला असा माणूस मिळाला?' स्वत:चा कमकुवतपणा तर स्वत:चेच नुकसान करतो. 'भोगतो त्याची चूक' त्याने काम केले नाही आणि तुम्ही रागावलात तर दु:ख तुम्हाला होईल, म्हणून चूक तुमची आहे. तो तर तसाच्या तसाच राहील. उद्यादेखील तसेच करेल आणि वर तुमची नक्कल करेल. तुम्ही मागे वळलात की तुमच्या पाठीमागे चेष्टा करेल, म्हणेल हा तर चक्रमच आहे, जाऊद्या त्याला.

**प्रश्नकर्ता :** तर मग त्याला जवळ बसवून, समजावून सांगावे की, 'तुझ्याकडून एवढे काम का होत नाही? दुसरी माणसे तर किती चांगले काम करतात.' त्याला काम येत नसेल तर शिकवावे, असे करायचे का?

**दादाश्री :** हो, त्याला समजेल असे, त्याला आपुलकी वाटेल अशा तऱ्हेने समजाविले पाहिजे.

## अन्डरहँड देखील उपकारी बनतो

तुमच्याकडे कोणी नोकरी करत असेल तर कधीही त्याचा तिरस्कार

करू नका, त्याला त्रास देऊ नका, सर्वांना सन्मानाने वागवा. कारण कोणत्या व्यक्तीकडून आपल्याला काय लाभ होईल ते सांगता येत नाही! आज यांच्यामुळे तुम्हाला फार मोठा लाभ झाला. माझ्याशी ओळख झाली ना, तोच फार मोठा लाभ झाला. याला अपूर्व लाभ म्हणतात. कधी ऐकलाही नसेल, असा लाभ आहे. म्हणून कोणालाही त्रास देऊ नका. घरासमोर कुत्रा बसला असेल तर त्यालाही त्रास देऊ नका. तो कुत्रा जर कोणाच्या मागे लागला तर तो माणूस तुमच्या घरात घुसेल आणि तुम्हाला सत्संग घडवेल. कुत्रा जर 'ज्ञानी पुरुषा'च्या मागे लागला तर 'ज्ञानी पुरुष' आसरा घेण्यासाठी तुमच्या घरात शिरतील. म्हणजे पाहा, कुत्रा कामी आला ना? या जगात सर्व काही कामी येते असे आहे! सर्वांमध्ये परमात्मा विराजमान आहेत आणि जीवमात्र रात्रंदिवस तुमच्या सेवेतच आहेत. पण लोकांना सेवा घेता येत नाही, सेवेचा लाभ घेता येत नाही.

जिथे पाहाल तिथे बॉस, बॉस आणि बॉस! आणि तुम्हीही कोणाचे तरी बॉस. तर बॉस त्या बिचाऱ्या अंडरहँडला ओरडून ओरडून त्याची वाट लावून टाकतो, शांतपणे बसूही देत नाही. म्हणून आपण सर्वांनी इतके चांगले न्यायपूर्ण जीवन जगले पाहिजे की कोणालाही दुःख होणार नाही. बॉसला दुःख होणार नाही, अंडरहँडला दुःख होणार नाही, घरी पत्नीला दुःख होणार नाही, मुलांना दुःख होणार नाही, असे जीवन जगण्यासाठी तुम्हाला तुमची 'मशिनरी' 'ज्ञानी पुरुषां'कडून ओवरहॉल (मुळासकट दुरुस्त) करून घ्यावी लागेल. ओवरहॉल करण्याचे टेंडर घेऊन आला आहात का?

**प्रश्नकर्ता :** आपल्या वाणीतही कॉन्ट्रॅक्टरची भाषा निघते.

**दादाश्री :** हो. अशीच निघते! आम्ही कॉन्ट्रॅक्टर आहोत त्यामुळे टेंडर वगैरे सर्व माहीत आहे.

## उपरी कसा सहन होईल?

**प्रश्नकर्ता :** जेवढे या बॉससमोर वाकता, तेवढे जर भगवंतासमोर वाकलात तरी कल्याण होईल.

**दादाश्री :** हो, कल्याण होणारच. जर भगवंतांना तेवढे नमस्कार केले तरी निराकरण होईल. कारण भगवंताकडे काही कमी नाही. लोकांना बॉस समोर वाकायला आवडत नाही. पण एकीकडे संसार चालवायचा असतो आणि ते तर अनिवार्य आहे ना! मग काय करणार? म्हणून बॉस समोर वाकून, काम करून, दोन उलटे-सुलटे शब्द सहन करून घ्यावे लागतात. बॉस घरून चिडून आला असेल तर तो तुमच्यावर पण चिडणार.

म्हणून माझ्या मनात तेराव्या वर्षी विचार आला होता की डोक्यावर *उपरी* असेल तर ते कसे सहन होईल? मला त्यावेळी हा विचार फार खटकत असे. *उपरी* आपल्याला कारण नसताना ओरडत राहतात! त्यांचे ओरडणे न्यायसंगत असेल तर ठीक आहे, पण हे तर स्वतः चिडलेले असतात आणि मग आपल्यावरही चिडतात, म्हणून मला बॉस आवडत नसत. म्हणून मग मी ठरविले की भगवंताचाच शोध घ्यावा. हा बॉस कसा काय सहन होईल?

फक्त ह्या माणसांनाच शेवटपर्यंत कष्ट करावे लागतात. नाहीतर ह्या गायी-म्हशी म्हाताऱ्या झाल्या की त्यांना पांजरपोळात सोडून येतात. फक्त या माणसांनाच शेवटपर्यंत धावपळ करून राबराब राबावे लागते.

**प्रश्नकर्ता :** मग नोकरी सोडून देणे हेच चांगले आहे ना?

**दादाश्री :** नाही. नोकरी करणे हेही चांगले नाही आणि सोडून देणे हेही चांगले नाही. सोडून दिली तर घरातील सर्वांना खटकेल आणि केली तर तुम्हाला त्रास होईल. त्यापेक्षा गाडी जशी चालत आहे तशी चालू द्या ना! आपोआपच सुटली तर ठीक आहे!

आपले शरीर दुर्बळ झाले की आपली मुलेही आपल्यावर ओरडतात! त्यात कसले सुख आहे? ह्या सर्व वैराग्याच्या गोष्टी आहेत. पण आम्ही हे सर्व पाहिले आहे. म्हणूनच आम्हाला वाटते की खरोखर तर हे सर्व बंधनच आहे! आम्हाला तर अगदी लहानपणापासूनच हे

सर्व बंधन वाटत होते, *उपरी* आवडत नव्हते. आम्हाला *उपरी* अजिबात आवडत नसत, खूप त्रासदायक वाटत असत. मास्तरांना नाइलाजास्तव चालवून घ्यावे लागत असे. मास्तरांकडे शिकायला जावे लागत असे, त्यामुळे त्यांना कसेबसे चालवून घ्यावे लागे. कारण घरचे तर फुटबॉलसारखे किक मारत म्हणत 'जा शाळेत' आणि शाळेत मास्तर परत फुटबॉलला किक मारत असत, म्हणत 'जा घरी', अशी आमची फुटबॉलसारखी दशा होत असे. म्हणूनच *उपरी* कसे आवडतील? आता संपूर्ण जगात आमचा कोणीही *उपरी* नाही. *उपरी* कोणाला सहन होईल? आम्ही तर तुम्हालाही *उपरी* रहित बनवितो, पण तरीही मला कोणाचा *उपरी* व्हायचे नाही.

## अंडरहँडला 'डिसमिस' करू नये

**प्रश्नकर्ता :** दादा, माझी नोकरी पोलिस विभागात आहे, आमच्या विभागात करप्शन (भ्रष्टाचार) फार आहे, म्हणून मलाही करावे लागते.

**दादाश्री :** जे करप्शन करतात, ते तर सडलेल्या बिया पेरत असतात. त्या जेव्हा उगवतात तेव्हा त्यांची पानेही सडलेलीच असतात! तुमच्या पाहण्यात असे आले आहे का? पानात छिद्रे असतात. पाहा, आश्चर्य आहे ना! सध्या इमानदार माणसांना या लोकांकडून त्रास होत असतो. इमानदार माणूस आला तर त्याला हे जगूच देत नाहीत, त्यांना वाटते की अरे, हे भूत इथे कुठून आले? त्यांच्या *उपरींना* (वरिष्ठांनाही) त्यांची अडचण वाटते. सगळीकडेच इमानदार व्यक्तीला त्रास आहे, पण शेवटी देव आणि निसर्ग इमानदार व्यक्तीच्या पाठीशी उभे राहतात!

**प्रश्नकर्ता :** सरकारी नोकरीत मोठ्या पोस्टवर (पदावर) असताना आमचा कनिष्ठ जेव्हा खूप काही उलटेसुलटे करतो तेव्हा आम्ही ठरवितो की याच्यावर काही कारवाई करून त्याला डिसमिस करावे.

**दादाश्री :** डिसमिस करू नये. तुम्ही त्यांना सांगायला हवे 'बाबा रे, असे होता कामा नये.' आणि तुमचा तर हा सरकारी विभाग आहे,

त्यामुळे डिसमिस तर करूच नका. तुमच्यावर तुम्हाला डिसमिस करू शकणारा कोणी आहे की नाही?

**प्रश्नकर्ता :** आहे ना!

**दादाश्री :** मग डिसमिस करण्याचा धोका पत्कारायचाच नाही. तुमच्या वरिष्ठ ऑफिसरने सांगितले असेल तरीही त्याला शांत केले पाहिजे. शेवटी खोटे बोलून का होईना पण शांत केले पाहिजे. तुमच्या स्वत:वर डिसमिस होण्याची पाळी आली तर डिसमिस हा शब्द नुसता ऐकल्याबरोबरच तुमच्यावर त्याचा खूप परिणाम होईल ना?

**प्रश्नकर्ता :** हो, होईल! सर्वांनाच होतो.

**दादाश्री :** मग त्या बिचाऱ्यावर किती होईल? या जगात कोणालाही दु:ख द्यायचेच कशाला? तुम्ही नियमानुसार वागा, नियमातून वाट काढण्याचे अनेक मार्ग असतात. आणि माइल्ड (मृदु) भाषा असतेच ना? तुम्ही त्यांना विचारा की 'तुम्हाला डिसमिस का करू नये, याचे एक्सप्लनेशन (स्पष्टीकरण) द्या.' या वाक्यात आणि 'मी तुम्हाला डिसमिस करेन', या दोन वाक्यात फरक नाही का? म्हणून माइल्ड भाषेचा उपयोग केला पाहिजे. ही आपली जबाबदारी आहे. खूप मोठी जबाबदारी आहे, मग त्यासाठी आपल्याला चुकीचे करावे लागले तरी चालेल, पण कोणाचा जीव जाईल असे करू नका, कोणाच्या नोकरीवर किंवा पोटावर पाय ठेवू नका.

ब्रिटिश गवर्नमेंटनेही काही नियम केले होते की तीन वाजून पंचेचाळीस मिनिटांनी एखाद्याला फाशी द्यायची असेल तर त्यात एक सेकंदही पुढे-मागे होत नसे. आणि जर एक मिनिटही पुढे-मागे झाले तर फाशी थांबवावी लागत असे. वेळ म्हणजे वेळ. फाशी कोणीही थांबवू शकत नव्हते. तरीही त्या काळात असा नियम होता की, जे.पी. तिथून जात असतील आणि त्यांची नजर जर गुन्हेगारावर पडली तर त्या गुन्हेगाराला सोडून द्यावे लागे आणि असे किती तरी सुटतही असत. काही जण मुद्दामच जे.पीं.ना तेथे बोलवत असत. तर अशा प्रकारे कोणी

डिसमिस होत असेल तर खोटे बोलून का होईना, पण त्याला सोडविले पाहिजे. मग आपण ही खटपट केली आहे किंवा असे काही केले आहे हे पाहण्याची गरज नाही.

शिफारस थेट भगवंतापर्यंत होऊ शकते, अगदी भगवंताच्या दारापर्यंत, पण दरवाज्याच्या आत मात्र शिफारस नाही. लोक जे.पीं.ना बोलावून घेत असत आणि त्याची फाशी थांबवत असत. सरकारलाही हे माहीत असे की लोक जे.पीं.ना बोलावतात, खटपट करतात, पण नियम म्हणजे नियम! आता या जे.पीं.च्या नजरेमुळे जर एवढा फायदा होतो तर 'ज्ञानी पुरुषां'ची नजर पडल्यावर काय होऊ शकणार नाही का?



# [ 17 ]
# खिसा कापला गेला? तरीही समाधान!

## खिसा कापला गेला, तिथे वस्तुतः काय आहे?

निसर्ग नेहमीच न्यायी असतो. या जगात निसर्गाने एक क्षणभर देखील अन्याय केलेला नाही. कोर्टात अन्याय होऊ शकतो पण निसर्गात अन्याय होत नाही. म्हणून सध्या मोठी माणसे लूट करतात तेही बरोबरच आहे, लोक काळाबाजार करतात तेही बरोबर आहे, काळ्या बाजाराचे जे होईल तेही बरोबरच आहे, त्याचा जो परिणाम होईल तेही बरोबर आहे. म्हणजेच निसर्ग सर्व नियमपूर्वकच करत असतो, नियमाच्या बाहेर जात नाही. हा निसर्ग एका क्षणासाठी देखील अन्यायी झाला नाही!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे जो आता भोगत आहे, त्यालाच नंतर प्राप्त होईल असे?

**दादाश्री :** असे नाही. भोगावे लागले किंवा नाही, तरी निसर्ग तर शिक्षा करतच असतो. ज्याचा खिसा कापला जातो, त्याला लोक आश्वासन देतात की 'घ्या, चहा प्या, असे करा, तसे करा, असे आहे, तसे आहे.' पण निसर्ग काय म्हणतो? ज्याचा खिसा कापला गेला तोच गुन्हेगार आहे, तो आज पकडला गेला. दोघे जण एकत्र बसले होते, तर याचाच खिसा का कापला गेला? म्हणजे आधी जे केले होते, त्याचे आज फळ आले. तो चोर तर जेव्हा पकडला जाईल तेव्हा त्याला गुन्हेगार म्हणतील. आता तर तो जिलेबी खात आहे आणि ज्याचा खिसा कापला गेला तो आता भोगतो आहे. म्हणूनच भोगतो त्याची चूक.

'आता कोण रडत आहे' हे पाहायचे आहे. रडणाराच गुन्हेगार आहे हे समजून घ्यावे. जो भोगतो त्याची चूक. चोर जेव्हा भोगेल तेव्हा त्याची चूक. या जगाचा न्याय वेगळा आहे पण निसर्ग काय म्हणतो? भोगतो त्याची चूक. म्हणून तक्रार करू नका. कोण भोगतो आहे, त्याची चूक आहे हे समजून घ्या. ही खूप गहन गोष्ट आहे. ही जर नीट समजली तर ती सरळ मोक्षाला घेऊन जाईल. खोल विचार केला तर सरळ मोक्ष मिळवून देईल आणि जर बुद्धीने चूक शोधायला गेलात तर या संसारातून कधीच बाहेर निघू शकणार नाहीत. भोगतो त्याची चूक, यावरून तुम्ही समजून घ्या की हे तर आपणच भोगत आहोत म्हणून आपलीच चूक आहे आणि हाच मोक्षाला जाण्याचा मार्ग आहे.

या जगात कोणाचे बंधन नाही. लाखो चोरांसोबत राहावे लागले आणि रात्री तुम्ही झोपलात, तुमच्या खिशात खूप पैसे असले तरीही कुठलाही चोर तुमच्या खिशाला हातही लावू शकणार नाही, असे नियमाने चालणारे हे जग आहे. आणि या जगाचा रेग्युलेटर पण असा आहे की तो जगाला खूपच रेग्युलेशन मध्ये ठेवतो! म्हणजेच हे जग काही थापेबाजी नाही.

हे क्रोध-मान-माया-लोभ हेच दुःख देणारे आहेत. बाहेरचे कोणी दुःख देत नाही. हे क्रोध-मान-माया-लोभ आपल्याला असे शिकवतात की हे दुःख आहे, आणि अशा प्रकारे तुम्हाला उलटा रस्ता दाखवतात. खरे तर या जगात बाहेरचा कुणीही दोषी नसतोच.

**प्रश्नकर्ता :** आपले कर्म दोषी आहे, असेच ना?

**दादाश्री :** नाही, तुम्ही स्वतःच दोषी आहात, दोष इतर कुणाचा नाही. तुमचा खिसा कापला गेला तर खिसेकापूचा दोष नाही, तुमच्याच दोषामुळे खिसा कापला गेला आहे! पूर्वजन्मीचे सगळे हिशोब चुकते होत आहेत. यात तो खिसाकापू तर आता मजा करत आहे. पण तुम्ही मात्र आज पकडले गेले आहात.

**प्रश्नकर्ता :** कोणी आपल्याकडून पंचवीस हजार रुपये घेऊन

गेला आणि परत दिले नाहीत, तर तेही आपल्या पूर्वजन्मीचे ऋण चुकवणेच असेल ना?

**दादाश्री :** सर्व हिशोबच आहे, म्हणून वरीज (काळजी) करू नका. तो समोर भेटला तरी त्याच्यावर चिडू नका. नाही तर पैसे तर गेलेच शिवाय परत त्याच्याशी कर्मेही बांधली जातील.

**प्रश्नकर्ता :** 'बरे झाले तो घेऊन गेला' असे म्हणावे?

**दादाश्री :** 'बरे झाले तो घेऊन गेला' असेही बोलू नका, गप्प बसा. 'बरे झाले तो घेऊन गेला' म्हणालात तरी गुन्हा होईल. आतून समजून जा की आपल्याच चुकीचा परिणाम आहे, तोंडावर काहीच बोलू नका. नाहीतर ती व्यक्ती डोक्यावर चढून बसेल! तोंडावर तर असेच बोला की 'बाबा, तुम्हाला जमतील तेवढे तरी परत करा.' एवढेच म्हणा. आत समजून जा की मिळाले तर ठीक आहे, आणि नाही मिळाले तरी काही नाही, पण असे काही तरी बोलायला तर हवे.

हिशोबाशिवाय तर कोणी भेटतच नाही ना! तुम्ही इतर कोणाला दिले नाही, आणि यालाच का दिले? कारण हिशोब आहे. हिशोब असल्याशिवाय तर कोणी भेटणारच नाही.

आम्हाला सर्व जग निर्दोष दिसते. कोणीही दोषी नाही असे सर्व जग दिसते. जर कोणी दोषी दिसत असेल तर ती अजून आपली चूक आहे. कधी ना कधी तरी निर्दोष पाहावे लागेल ना? थोडक्यात एवढे जरी समजून घेतले की, आपल्या हिशोबामुळेच हे सर्व होत आहे, तरी खूप उपयोगी पडेल.

आत्म्याजवळ खिसा नसतो. जर तुम्ही आत्मा आहात तर तुमच्याजवळ खिसा नसतोच आणि म्हणून तुमचा काही कापलाही जाणार नाही. कापला गेला तो 'चंदुभाई'चा होता, पण तुम्ही म्हणता 'माझा खिसा कापला गेला', त्यामुळे 'तुम्ही' 'चंदुभाई' झालात, हे मिथ्यात्व आहे.

**प्रश्नकर्ता :** मी एक संसारी व्यक्ती म्हणून बोलतो आहे की माझा

खिसा कापला जात आहे आणि ते मला दिसत आहे, मला कळत आहे की, खिसा कापला जात आहे, तर अशा वेळी मी काय करायला हवे?

**दादाश्री :** आता जर तुमचा खिसा कापला जात आहे असे तुम्हाला कळले तर तुम्ही त्याला पकडून विचारता की 'तू का माझा खिसा कापतो आहेस?' आणि त्याला शिव्या वगैरे देता. पण अशा वेळी खरोखर तुम्ही काय केले पाहिजे, हेच तुम्हाला विचारायचे आहे ना? तर मी तुम्हाला सांगू इच्छितो की तुमचा खिसा कापला गेला की तुम्हाला लगेच भगवंताचे सांगणे आठवले पाहिजे, हा माझा खिसा कापत आहे, तर या बाजूच्या खिशात दोनशे रुपये आहेत तो खिसा कापत नाही आणि ज्यात पाच हजार रुपये आहेत तो खिसा कापत आहे, म्हणून हा माझ्याच कर्माचा उदय आहे. तो तुमचा खिसा कापत असतो त्यावेळी तुम्हाला कोणता चांगला योग आलेला असतो? तर त्यावेळी सर्वात मोठे धर्मध्यान उत्पन्न होण्याचा योग आलेला असतो, पण तुम्ही मात्र तेव्हा रौद्रध्यान करता. तो खिसा कापतो, तेव्हा समजून जा की तुमच्या कर्माच्या उदयामुळे तो भाऊ तुम्हाला भेटला आहे, आणि तो दोनशे रुपयेवाला खिसा कापत नाही तर पाच हजारवाला खिसा त्याच्या वाट्याला आला आहे, म्हणजे हा तर हिशोब चुकता होत आहे.

**प्रश्नकर्ता :** हे तर खिसा कापला गेल्यानंतर, जसे आपण म्हणालात तसे धर्मध्यान केले पाहिजे, पण ज्यावेळी खिसा कापला जात असतो त्यावेळी काय केले पाहिजे? त्याला थांबवायचे की कापू द्यायचे?

**दादाश्री :** तसे कापूही द्यायचे नाही.

**प्रश्नकर्ता :** मला कळले की हा माणूस माझा खिसा कापत आहे, तर मी काय करायला पाहिजे?

**दादाश्री :** तुमच्या लक्षात आले तर त्याला पकडा! पण पकडल्यावर त्याच्यावर रौद्रध्यान करू नका. त्याला म्हणा की, 'बाबा, का माझा खिसा कापतो आहेस? मी तुझे काय वाईट केले आहे?' तुला अडचण असेल तर घे, मी हे शंभर रुपये देतो, ते घेऊन जा. हे

पाच हजार तर मला तिथे जमा करायचे आहेत. म्हणजे असे पन्नास-शंभर रुपये त्याला दिले तर हरकत नाही. पण असे समाधानपूर्वक झाले पाहिजे. म्हणजे त्याला पकडले तर पाहिजे. असे म्हणू शकत नाही की, 'हो बाबा, तू खुशाल काप! माझ्या भगवंताने सांगितले आहे की काप!' असे म्हणू नये. पण खिसा कापला गेल्यावर भांडण केले तर त्याचा काही उपयोग नाही.

खिसा कापणारा खिसा कापतो त्यात गैर काही नाही. हे जग एक मिनिटासाठीही नियमाच्या बाहेर जात नाही. तरीही लोक म्हणतात की 'आजकाल लोक नालायक झाले आहेत!' नाही, असे कोणी नालायक झालेलेच नाही. हे सर्व निसर्गच करवीत असतो आणि हे लोक तर मात्र निमित्त आहेत. आणि हे इगोइजम (अंहकार) करतात, 'मी केले, मी केले' एवढेच. म्हणून कोणालाही दोषी ठरवू नका. कारण दोषी ठरवल्यामुळे तर तुम्ही जोखिमदार बनाल. तुम्हाला जोखीम पत्करायची नाही ना?

## निसर्गाचे किती अजब प्लानिंग!

खिसा कापणे ही देखील एक प्रकारची विद्या आहे ना! जर या दुनियेतील सर्व खिसेकापूंना सगळीकडून शोधून शोधून मारून टाकले तर काय होईल? दुनिया अस्ताव्यस्त (नियमाविरुद्ध, अन्यायपूर्ण) होईल. जसे हे बँडवाले असतात त्यातल्या पिपाणीवाल्याला काढले तर बँड चांगला वाटेल का? तसेच या खिसेकापूंचीही गरज आहे, आणि या जगात जेवढ्या खिसेकापूंची गरज आहे, तेवढेच जगात आहेत!

या लोकांकडे जे पैसे आहेत, ते पैसे त्यांचे नाहीत, तर दुसऱ्यांचे आहेत. तर आता त्यांचे ते पैसे कोण घेऊन जाईल? भगवंत स्वतः तर काही घेत नाहीत. म्हणून हा सर्व कारभार आतल्या आत तुमच्यावरच सोपवला आहे. मग हे दुसऱ्यांचे पैसे खिसेकापू घेऊन जातात. पण तो खिसा कापणार कोण? तर ज्याने मनात ठरवले असेल की 'बस, मला तर हाच धंदा करायचा आहे तो.' म्हणून तो शोधत असतो की 'कुणाचा खिसा कापावा?' मग यासाठी निसर्ग त्याला मदतही करतो! कारण तो

त्याचा धंदा आहे. प्रत्येक व्यक्ती स्वतंत्र आहे आणि निसर्ग त्याचा हेल्पर (सहाय्यक) आहे. तुम्हाला जो धंदा करायचा असेल, जो योग्य वाटत असेल तो करा, निसर्ग त्यात मदत करतो. निसर्ग इतका चांगला मददनीस असतो की खिसेकापूच्या समोर पोलीस उभा असतो पण नेमका खिसा कापण्याच्या वेळी त्याला दुसरीकडे जावे लागते. म्हणजे निसर्ग त्याला बाजूला करतो, निसर्ग खिसेकापूसाठी अनुकूल परिस्थिती निर्माण करतो, संयोग जुळवून देतो, 'ज्याचा खिसा कापायचा' त्याचीही भेट घडवून आणतो.

म्हणजे खिसेकापूनी तर 'कुठला खिसा कापायचा आहे' त्यासाठीची सर्व तयारी आधीच करून ठेवलेली असते. आणि खिसा कापल्यावर कुठल्या दरवाजाने बाहेर पडायचे, बाहेर पडल्यानंतर कुठल्या फाटकातून निघायचे, त्यानंतर कुठे उभे राहायचे, अशा प्रकारचे सर्व सोळा अवधाने त्याला ॲट अ टाइम – अगदी त्याचक्षणी असतात. पण लोक त्याचा तिरस्कार करतात. पण अहो, तो किती हुशार माणूस आहे! हे असे सर्व करणे तर एखाद्या मोठ्या कलेक्टरलाही जमणार नाही!

एक व्यक्ती मला म्हणाली 'पण भगवंतांनी या चोरांना, लुच्चा माणसांना, लबाड लोकांना जन्मच द्यायला नको ना?' मी म्हटले, 'तू चोरांना, लुच्चा माणसांना, लबाड लोकांना काय समजतोस? हे लोक नसतील, तर हे जग मरून जाईल! ते लोक आहेत म्हणून हे सर्व जिवंत आहेत.' हे कसे आहे? त्याचे उदाहरण देऊ तुम्हाला? या मुंबई शहरात आपण तानसा तलावातून पाणी आणले, घराघरात नळ बसविले आणि घराघरात पाणी आले. परंतु जर गटार नसेल तर काय होईल?

**प्रश्नकर्ता :** महामारी पसरेल.

**दादाश्री :** तसेच हे चोर, लुच्चे वगैरे सर्व तर गटार आहेत. भगवंत तर सांगतात की, 'तू गटाराचे झाकण उघडू नकोस. तुला अनुभव घ्यायचा असेल तर एकदा उघडून अनुभव घे आणि त्यानंतर निश्चित कर की, या पुढे मी गटाराचे झाकण उघडणार नाही.' मी म्हणतो, 'चोर लोक तर या जगाचे व्हिटॅमिन आहेत! त्यांच्याशिवाय जग चालणारच नाही!'

म्हणजे ते लोक नसतील तर काय होईल? जितके आवश्यक आहे तेवढेच या जगात आहे. या जगात ज्यांची आवश्यकता आहे तेवढेच लोक आहेत! तुमच्याकडे असलेला खोटा माल घेऊन जाण्यासाठीच या जगात चोरांचा जन्म होतो. भगवंत स्वत: काही मारण्यासाठी येत नाहीत. असे लोक जगात असतातच ना की जे तुम्हाला मोटारीतून खाली उतरवून, मार-झोड करून हिऱ्याचे डूल, घड्याळ वगैरे सर्व घेऊन जातात. म्हणजेच या जगात सगळ्यांचीच आवश्यकता आहे.

## खिसा कापला गेल्यावर समाधान कशा प्रकारे?

**प्रश्नकर्ता :** दादा, माझ्या खिशातून पैसे गेले त्याचे मला खूप वाईट वाटते.

**दादाश्री :** वाईट वाटून पैसे परत येतील का?

**प्रश्नकर्ता :** नाही येणार.

**दादाश्री :** पैसे तर गेले, आता त्यासाठी आणखी नुकसान करून घ्यायचे का? आणि आता त्यावर उपाय काय आहे? असेच दु:खी होत राहिलो तर पैसे परत येतील का? त्यापेक्षा देवाचे नाव घ्याल तर काही तरी उपाय सुचेल.

**प्रश्नकर्ता :** त्यातही सांसारिक अडचणी आड येतात.

**दादाश्री :** नाही, पण ते पैसे थोडेच परत येणार आहेत? जे परत येणार नाहीत त्यांच्याबद्दल कशाला बोलावे? 'गॉन इज गॉन' (गेले ते गेले)!

**प्रश्नकर्ता :** तरी पण पैसे गेल्याच्या दु:खामुळे भगवंताकडे पावले वळत नाहीत आणि चिंताच वाटत राहते.

**दादाश्री :** चिंतेमुळे मग काय होते? फायदा की नुकसान?

**प्रश्नकर्ता :** नुकसान होते.

**दादाश्री :** मग नुकसान करणारा धंदा कशासाठी करता? नफा

होणारा धंदा करा. पैसे गेले हे काय कमी नुकसान झाले आहे? मग ही चिंता-उपाधी करून दुसरे नुकसान कशाला करता? त्याऐवजी देवाचे नाव घ्या ना, किंवा इथे सत्संगात आलात तरी शांती वाटेल.

**प्रश्नकर्ता :** खूप वेळा असे होते की खऱ्या मार्गाने जाणाऱ्याला संसारात खूप अडचणी सहन कराव्या लागतात.

**दादाश्री :** अडचणी तर आपणच उभ्या केलेल्या आहेत, दुसऱ्या कोणी अडचणी आणलेल्या नाहीच मुळी. या जगात कोणीही दुसऱ्या कुणाला अडचणीत टाकू शकत नाही. ज्या अडचणी येतात त्या स्वत: निर्माण केलेल्या असतात आणि लोक तुम्हाला तुमच्या इच्छेनुसार अडचणी निर्माण करण्यासाठी मदत करत असतात. जे लोक तुमचा खिसा कापतात, ते तुम्हाला मदत करत असतात. पण तुम्ही मात्र त्याला अडचण म्हणता? ते कशा प्रकारे मदत करतात? अहो, तुम्हाला कर्मातून सोडवण्यासाठी तो बिचारा तुमचा खिसा कापतो आणि तुम्ही म्हणता याने मला अडचणीत टाकले. अरे! अडचणीत कुठे टाकतोय तो, तो तर तुमची सुटका करून देतो. म्हणजेच दुनियेतील कोणतीही व्यक्ती तुम्हाला अडचणीत आणू शकेल हे शक्यच नाही. हा तुमचाच हिशोब आहे, यात लोक तर फक्त निमित्त असतात.

ज्ञान होण्याआधी मी मुंबईतील लोकल ट्रेनने जात होतो, तर एका माणसाने गर्दीत माझ्या खिशात हात घातला. मी म्हटले, 'बाबा, फक्त दहा रुपयेच आहेत, राहू दे ना! तरी पण तो घेऊन गेला. म्हणजे हे सर्व असे आहे, ते घेऊनच जातात! त्याचे आहे तर तो घेऊनच जाणार. एक जण माझ्याकडे आला आणि खिसा दाखवून म्हणाला 'पाहा, माझा खिसा कापला गेला.' मी विचारले 'काय घेऊन गेला?' तर म्हणाला 'फक्त दोन-तीन कागद होते, आणि रेल्वेचा पास होता आणि या बाजूच्या खिशात पाच हजार रुपये होते.' पाहा, पाच हजार राहिले आणि कागद असलेला खिसा कापला गेला! त्यावर मी म्हटले, 'त्या खिशात पाच-दहा रुपये तरी ठेवायचे होते ना, तो बाहेर पडून चहा तरी प्यायला असता. असे काहीच मिळाले नाही तर तो बिचारा निराश होऊन जाईल!'

## संसारात कारणाशिवाय काही होत असेल का?

एक भाऊ गाडीतून जात होते, तेव्हा त्यांच्या खिशातून कोणीतरी सातशे रुपये घेऊन गेला, पण त्यांच्यावर त्याचा काहीच परिणाम झाला नाही, लगेच ज्ञान हजर झाले की, 'व्यवस्थित' आहे. आणि त्या खिसेकापूलाही चांगला शकुन झाला असेल म्हणूनच ना! नाही तर खिशात हात घालावा आणि तीनच रुपये मिळाले तर काय करणार? दोन तासांची सातशे रुपये फी तर इथे वकीलालाही मिळत नाही! पण लोक खिसेकापूकडे तिरस्काराने पाहतात, पण असे करू नये. ते त्याच्या कौशल्याचेच पैसे आहेत ना! माझी अशा काही लोकांशी ओळख आहे ते माझ्यासमोर कबूल सुद्धा करतात की, 'दादा, मी हा धंदा करतो.' मी त्यांना सांगतो की, 'ठीक आहे बाबा, पण शकुन वगैरे पाहून मग निघ, कारण त्यात खूपच धोका आहे.'

**प्रश्नकर्ता :** परंतु जर असे खूप लोक हा धंदा करायला तयार झाले आणि हाच धंदा करू लागले तर सोसायटीची काय दशा होईल?

**दादाश्री :** असे आहे, की हे लोक हा धंदा करीत नाहीत. हे जे नालायक लोक पैसे जमवतात, गोळा करतात ते चुकीच्या मार्गाने कमावलेले असतात, त्या पैशासाठी हे असे जीवाणू उत्पन्न झालेले असतात. नाही तर काय या नालायकांचे चुकीच्या मार्गाने कमावलेले पैसे घेण्यासाठी भगवंत स्वतः येतील? म्हणजे ही जी सारी चुकीची लक्ष्मी आहे, त्यामुळेच हे असे जीवाणू वाढतात. जेव्हा चांगली लक्ष्मी होईल तेव्हा हे जीवाणू कमी होतील. जसे हे एक प्रकारचे जीवाणू आहेत, तसेच वकीलही जीवाणू आहेत, डॉक्टरही जीवाणू आहेत. पण या डॉक्टर आणि वकीलांच्या जीवाणूंपेक्षा टी.बी.चे जीवाणू बरे. हे सर्व एक प्रकारचे जीवाणूच आहेत, पण कोणते जीवाणू संसाराला उपयुक्त आहेत? शेतकरी उपयुक्त आहेत कारण ते धान्य पिकवतात, गायी-म्हशी पाळतात. असे जीवाणू उपयुक्त आहेत कारण ते दूध, तूप पुरवितात. म्हणजेच जनावरे पाळणारे शेतकरी वगैरे लोक कामाचे आहेत, आणि वैद्य देखील कामाचे आहेत कारण ते लोकांचे आजार बरे करतात, काही थोडे डॉक्टर

देखील कामाचे आहेत. पण बाकीच्या डॉक्टरांमधून काही जीवाणू (लोकांचे अहित करणारे) उत्पन्न झालेले आहेत, काही वकीलही असे झालेले आहेत जणू जीवाणूच उत्पन्न झाले आहेत. कारण या काळात भांडणे वाढली आहेत म्हणून वकील वाढले आणि जेव्हा वकील वाढतात तेव्हा भांडणेही वाढतात. वकील तर भांडणे नसतील तिथे भांडणे उत्पन्न करतात.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे जो रोग असेल त्याच्यासमोर दुसरे जीवाणू उत्पन्न होऊनच जातात?

**दादाश्री :** हो, होतातच. नियम असाच आहे की शरीरात कुठेही कचरा जमा झाला की त्या कचऱ्यात आपोआपच तो कचरा खाणारे जीव उत्पन्न होतात. या फुफ्फुसात जर कचरा जमा झाला असेल तर आत तो कचरा खाणारे जीव उत्पन्न होऊनच जातात. आणि आपले लोक सांगतात, 'अरे, टी.बी.चे जीवाणू लागले.' अहो, नाही, जीवाणू बाहेरून येत नाहीत, ते आतच तयार होतात, आतच जीवाणू उत्पन्न होतात.

**प्रश्नकर्ता :** हे चोर नावाचे जे जीवाणू आहेत, ते पैसा लायक माणसाचा आहे की नालायक माणसाचा हे जाणून घेऊन त्याच्याकडे जातात? की मग जिथे चुकीची कमाई आहे तिथेच जातात आणि कष्टाची कमाई असेल तिथे ते जात नाहीत?

**दादाश्री :** असे आहे की, जे खरे धन आहे, कष्टाची कमाई आहे, ती कधीच जात नाही. आणि जे बिनकष्टाचे चुकीचे धन आहे ते तर आपोआपच कोणत्या ना कोणत्या मार्गाने इकडे-तिकडे निघून जाते. अरे, खिसा कापला जाऊनही निघून जाईल, म्हणजे कोणत्या ना कोणत्या मार्गाने जाईल, पण जाईल हे नक्की. जे खरे धन आहे ते आपल्याला सुख देऊन जाईल आणि जे चुकीचे धन आहे ते दुःख देऊन जाईल. ते धन मग डॉक्टरकडून पोट कापून घेऊन, पोट चिरून घेऊन हजारो रुपये खर्च करायला लावते! म्हणजेच चुकीचे धन दुःख देते, खरे धन सुख देते! आमच्याकडे चुकीचे धन येणार नाही. आता अशी परिस्थिती आहे की चुकीचे धन तर सर्व ठिकाणी घुसते पण आमच्याकडे असे चुकीचे धन जास्त घुसणार नाही. त्यामुळे कुठल्याही प्रकारचे दुःख

निर्माण होणार नाही. ज्या लोकांकडे चुकीच्या मार्गाने कमावलेले धन येत नाही, त्यांना दु:ख भोगावे लागत नाही.

**प्रश्नकर्ता :** मग सरकार जो टॅक्स कापते, ते एक प्रकारे कोणाला ठार मारण्याचे लाइसेन्सच नाही का?

**दादाश्री :** नाही, नाही. हे टॅक्सेस तर पद्धतशीर आहेत. टॅक्स आणि चुकीचे धन याचे काही देणेघेणे नाही.

**प्रश्नकर्ता :** पण काही टॅक्स असे असतात की आम्हाला वाटते की हे सर्व अनावश्यक आहे.

**दादाश्री :** नाही. अनावश्यक टॅक्स नसतातच. सर्व टॅक्सेस आवश्यक आहेत. कारण त्या टॅक्समुळेच तर आपण सुविधांचा लाभ घेतो. या हिंदुस्तानाचे रक्षण करण्यासाठी सरकारला जे सैन्य ठेवावे लागते, त्या सैन्याचे सर्व खर्च भागविले पाहिजेतच ना? म्हणजे जी आवक आणि जावक आहे, त्यातून आपल्या देशाचे रक्षण करण्यासाठी सरकारला जी काही पावले उचलावी लागतात, त्यासाठी आपल्याला टॅक्स तर द्यावाच लागेल ना! आणि हिंदुस्तानच्या सुरक्षेतच आपली सुरक्षा आहे ना! आता त्या टॅक्समध्ये जर आपण चोरी केली तर तो गुन्हा आहे, असे कधीच करू नये.

**प्रश्नकर्ता :** पण ही मधली माणसे स्वत:चे खिसे भरतात त्याचे काय?

**दादाश्री :** जे लोक असे खिसे भरतात, ते तर या खिसेकापूंचे थोरले बंधू आहेत. आपल्याला हव्यास असतो की माझे दोन हजार वाचतात ना! आणि त्याला तर पाचशेच द्यायचे आहेत ना! मग काय हरकत आहे! म्हणजे तुम्ही चोरी केली आणि त्यानेही चोरी केली. म्हणजे हे चोर-चोर एकत्र आले! म्हणून त्यांना 'चोराचे भाऊ महाचोर' म्हणतात. त्याला चोर म्हणायचे तर हा महाचोर आहे, म्हणजे सगळे सारखेच आहेत. पण हे सगळे खूप चुकीचे आहे, फारच चुकीचे आहे. म्हणूनच जर हक्काचे धन आणि हक्काचे विषय असतील, तर या दुनियेत कोणीही दु:खी राहणार नाही.

**प्रश्नकर्ता :** पण आता कुठे हक्काची भाकरी असेल याची पाच-दहा टक्के तरी शक्यता वाटते का?

**दादाश्री :** नाही वाटत, टक्के तरी कसे असणार? टक्केवारी तर शंभरात असते. पण इथे तर लाखात एक किंवा दोनच असे झेंडे फडकत असतात.

**प्रश्नकर्ता :** हे कलियुग आहे म्हणून असे होत असेल, पण सतयुगामध्ये तर असतील ना?

**दादाश्री :** सतयुगात तर फार चांगले लोक होते. सतयुगाबद्दल तर काय सांगावे? सुगंध असणारे लोक! आणि आता कुणाचा थोडातरी सुगंध येतो का?

## दर्शनाचे महत्त्व, चपलांचे नव्हे

**प्रश्नकर्ता :** पूर्वी मी रोज मंदिरात जात असे, पण या वर्षी दोनदा अगदी नवीन चपला हरवल्या म्हणून मग आता मी कधी-कधीच मंदिरात जातो.

**दादाश्री :** पण आता तुम्ही नवीन चपला घालून मंदिरात जा, आणि जेव्हा दर्शन घ्यायला जातेवेळी चपला बाहेर काढाल तेव्हा चपलांना इतके सांगा की, 'हे चपलांनो तुम्हाला जायचे असेल तर जा किंवा राहायचे असेल तर राहा. मी तर भगवंताचे दर्शन घेण्यासाठी चाललो आहे.' मग ते जे दर्शन घ्याल ना, त्या दर्शनाचा तर तुम्हाला लाखो चपलांच्या किमतीपेक्षाही खूप लाभ होईल, खूप उच्च कोटीचे फळ मिळेल! जर माझ्या म्हणण्यानुसार केलेत तर! चपलांना सांगून जा, पण कोणाला ऐकू येईल असे बोलू नका.

## ...आणि चपला चोरीला गेल्या, तेव्हा!

आम्हालाही नव्या बुटांचा असाच एक अनुभव आला होता. बडोद्यात घडियाली बोळ आहे, तिथे एक मोठा उपाश्रय आहे, तिथे मी एकदा दर्शन घेण्यासाठी गेलो होतो. त्यादिवशी लांब कोट घातला होता

आणि तेव्हा ज्ञान तर झालेले नव्हते, मग त्या महाराजांपाशी बसून ऐकत असे आणि ज्ञानाबद्दल सर्व गोष्टी महाराजांना विचारत असे. आता तर मी थोडे जुने झालेले बूट घालतो. पण त्या काळात तर थोडेसेही जुने झालेले बूट मी वापरत नसे, थोडे जुने झाले की ते काढून टाकून नवे घेत असे. तर नवे बूट इतके फर्स्ट क्लास दिसत होते, ते उपाश्रयाच्या बाहेर ठेवले होते. पण तेव्हा मला हे माहीतच नव्हते की बूट असे चोरीला जातात. मी जेव्हा उपाश्रयाबाहेर निघालो तेव्हा मला समजले की बूट जागेवर नाहीत. मग इकडे-तिकडे सगळीकडे पाहिले, तेव्हा एका व्यक्तीने मला विचारले की, 'काका, काय शोधत आहात?' मी म्हटले, 'मी बूट इथे ठेवले होते पण आता ते दिसत नाहीत.' त्यांनी विचारले, 'नवे होते का?' तेव्हा मी म्हटले 'हो, पंधरा दिवसांपूर्वीच घेतले होते.' तेव्हा ते म्हणाले की, 'काका, आता शोधू नका, तुमचे बूट तर आता गेले. इथे नवे बूट उचलून नेतात आणि जुने राहू देतात.' तेव्हा मी मनात म्हटले, 'हे तर आपले कल्याणच (!) झाले.' लांब कोट, डोक्यावर काळी टोपी आणि बूट गायब, आता पाहा मजा! याचा फोटो किती चांगला येईल! पायात बूट नव्हते म्हणून मनात लाज वाटत होती की आता घरी कसे जायचे? मग मनात विचार आला की काय हरकत आहे अनवाणी जायला? कदाचित लोक विचारतील की हे काय? तर त्यांना काही तरी नवीन पाहायला तर मिळेल. त्या काळात तर मला सगळेच ओळखत असत ना! आणि असे अनवाणी गेलो तर सगळे विचारणारच ना! तेव्हा ते जे दुकानदार होते त्यांच्या मुलांची मुले आता दुकानावर बसतात पण ते मला ओळखत नाहीत. मग मी रस्त्याने चालू लागलो, तेव्हा रस्त्यात लोक विचारू लागले की, 'काय झाले, बूट कुठे गेले?' मग कुणीतरी मला म्हणाला की, 'हे पाहा, असे तर वाईट दिसते. तुम्ही रिक्षाने घरी जा.' म्हणून मग मी रिक्षाने घरी आलो. आणि दुसरे नवीन बूट बनवून मगच बाहेर पडलो! तोपर्यंत जुने बूट घालूनच दोन दिवस इकडे-तिकडे फिरलो.

म्हणजे मलाही असा अनुभव आलेला आहे, मला माहीतच आहे आणि यात तुमचा काय दोष? आणि मग त्या बूट नेणाऱ्याचा तरी काय दोष? त्याला काही अडचण असेल म्हणूनच तो घेऊन गेला ना? काही

तरी अडचण असल्याशिवाय तर कोणी घेणारच नाही ना! आणि बूट गेले तर आपण समजले पाहिजे की, कोणा पुण्यशाली माणसाच्या हातातच ते पडले आहेत, त्याचे पुण्य असेल म्हणून तर त्याला इतके महागडे बूट मिळाले ना! नाही तर नवे बूट त्याच्या वाट्याला कसे काय येतील? पण बूट गायब झाल्यावर आपण समजून घेतले पाहिजे की हा आपला हिशोब चुकता झाला आहे.

## जीवनभर नियमबद्ध

या बुटांचा नियम असा आहे की तुमचे सात बूट जाणार असतील तर तेवढेच जातील, आठवी जोडी जाणार नाही. मग भले तुम्ही रोज नवीन बूट घालून गेलात तरी. जर तुमच्यात हिम्मत असेल तर जितके बूट जायचे तितके जाऊ द्या. कारण त्या मागे नियम सांगितला आहे. म्हणून त्यानंतर चोर कसाही असला तरी बूट उचलणार नाही. हा नियम जाणून घेतला असेल तर बरे आहे ना? म्हणजे जास्तीत जास्त सात जातील, किंवा दहा जातील किंवा बारा जातील. पण केव्हातरी याचा अंत येईलच ना? तर अंत येऊ द्या ना! कारण हे सर्व अंतवाले आहे.

## वस्तू वापरण्याचे नियम कोणते?

आपले कनुभाई, ते लहान होते तेव्हा मला म्हणाले की, अंबालाल काका, 'मी तर तीनच शर्ट शिवतो, पण हे रसिकभाई तर सहा-सहा शर्ट शिवून घेतात' तेव्हा मी म्हटले 'तू समजुतदार आहेस, तू तीन शिवून घेतोस, पण मी तर दोनच शिवून घेतो.' मग मी त्याला समजाविले की तू जे जे काही वापरत आहेस ना, ते तुझे आहे तेच वापरत आहेस. म्हणून जर तुला नंतर कमी पडू द्यायचे नसेल तर तू आतापासूनच नीट जपून वापर कर. याचा अर्थ तुला समजला ना?

मला काय म्हणायचे आहे की या दुनियेचा क्रम कसा आहे? तर तुम्हाला 1995 मध्ये जे शर्ट मिळणार आहेत, त्याचा जर आजच तुम्ही जास्त प्रमाणात वापर केला तर 1995 मध्ये शर्टाशिवाय राहावे लागेल, असे मला म्हणायचे आहे. म्हणून तुम्ही त्याचा वापर असा

पद्धतशीरपणे करा की अशी वेळ येणार नाही. आणि कुठलीही वस्तू झिजल्याशिवाय टाकू नका आणि जर एखादी वस्तू टाकून द्यायची असेल तर ती कुठे ना कुठेतरी झिजली असावी त्यानंतरच तुम्ही ती टाका. असा माझा नियम आहे. म्हणून मी म्हणतो की अजून इतका काही झिजला नाही तरी पण काय त्याला टाकून द्याल? नाही. कारण तो जास्त खराब झालेला नाही, अजून वापरता येण्याजोगा आहे, तुम्ही त्याला वाटेल तेव्हा टाकून द्याल तर ते मीनिंगलेस आहे ना? म्हणजे या ज्या सर्व वस्तू तुम्ही वापरता, त्याचा हिशोब असेल की नाही? त्यांचा हिशोब आहे आणि तो किती आहे? तर एक एक परमाणूचासुद्धा हिशोब आहे. त्यात गोलमाल कशी चालेल, सांगा बरे? 'व्यवस्थित'चे असे नियम आहेत, परमाणूंचे हिशोब आहेत. म्हणून कुठलीही वस्तू वाया घालवू नका.

## जगात हलगर्जीपणा चालणारच नाही

आम्हाला इथे पाण्याचा अपव्यय करावा लागतो, मी 'ज्ञानी पुरुष' म्हणून माझ्यासाठी तर त्याग-अत्याग संभव नाही, तरी मला पाण्याचा अपव्यय करावा लागतो. आमच्या या पायाला असे (फ्रेक्चर) झाले आहे, म्हणून डब्लयु.सी. मध्ये बसावे लागते आणि पाणी सोडण्यासाठी (टाकीची) साखळी खेचावी लागते, तेव्हा काय दोनच डबे पाणी जात असेल? आणि पाणी कमी आहे, पाणी महाग आहे, म्हणून मी असे म्हणतो का? नाही, पण अशा तऱ्हेने पाण्यातील कितीतरी जीव आदळून-आपटून विनाकारण मारले जातात! आणि जिथे एक दोन डब्याने काम होते तिथे एवढ्या साऱ्या पाण्याचा अपव्यय का करावा? तसे तर आम्ही 'ज्ञानी पुरुष' आहोत, त्यामुळे अशी चूक झाली की लगेच औषध (प्रतिक्रमण) घेऊन टाकतो. त्याने कितीतरी महिने आमचे काम होत राहते. पण तरीही औषध तर आम्हालाही घ्यावेच लागते. कारण 'ज्ञानी पुरुष' असो वा कुणाही ही असो, तिथे कुणाचेच चालत नाही. ही अंधेर नगरी नाही. हे तर वीतरागांचे राज्य आहे, चोवीस तीर्थंकरांचे राज्य आहे! तीर्थंकरांनी सांगितलेल्या ह्या गोष्टी तुम्हाला आवडल्या का?



## [ 18 ]
# क्रोधाच्या कमकुवतपणासमोर

## वीतरागींची सूक्ष्मता तर पाहा!

लोक काय म्हणतात की, हा बाप आपल्या मुलाला इतका रागावतो आहे, म्हणजे हा बाप नालायक माणूस आहे आणि निसर्ग याचा काय न्याय करत असेल? 'या बापाच्या वाट्याला पुण्य ठेवा.' क्रोध केला तरी पुण्य मिळवतो? हो, कारण मुलाच्या हितासाठी तो स्वतःशी संघर्ष करतो. मुलाच्या सुखासाठी स्वतः संघर्ष केला, म्हणून याला पुण्य द्यावे! नाही तर कुठल्याही प्रकारचा क्रोधामुळे पापच बांधले जाते, पण हा एकच क्रोध की जो मुलाच्या किंवा मित्राच्या सुखासाठी केला जातो, स्वतःचे जाळून (नुकसान करून) त्याच्या सुखासाठी केला जातो, म्हणून त्याने पुण्य बांधले जाते. तरीही इथे तर लोक त्याला दोषीच ठरवितात! पण ईश्वराच्या घरी तर खरा कायदा आहे की नाही? स्वतःच्या मुलावर वा मुलीवर क्रोध करतात, जबरदस्त क्रोध करतात पण त्यात हिंसक भाव नसतो, इतरत्र हिंसक भाव असतो. तरी पण त्यात तंत (अढी) राहून जातो, म्हणून मुलीला पाहिल्याबरोबर आत क्लेश होऊ लागतो, त्याचा तंत तसाच राहतो. भगवंतांनी काय सांगितले आहे की मुलीला किंवा मुलाला रागावले तरी त्याला पुण्य मिळते, कारण आत हिंसक भाव नाही. आणि त्याचबरोबर तंतही नसेल तर काय होते? मोक्ष प्राप्त होतो. जर क्रोधात हिंसक भाव नसेल आणि तंत राहत नसेल तर मोक्ष प्राप्त होतो. आणि फक्त हिंसक भाव नसेल पण तंत असेल तर पुण्य बांधले जाते. भगवंतांनी किती सूक्ष्मतेने हे शोधून काढले आहे ना!

## हा वीकनेस आहे की पर्सनॉलिटी?

**प्रश्नकर्ता :** माणसाला क्रोध तर पावला पावलावर येतोच, मग क्रोध लवकर येऊ नये, यासाठी काय करावे?

**दादाश्री :** प्रत्येक व्यक्तीला क्रोध येत असेल का?

**प्रश्नकर्ता :** आपले बरोबर असतानाही कोणी आपल्याला चुकीचे ठरवत असेल, तेव्हा आत त्याचा क्रोध येतो.

**दादाश्री :** हो, पण तुम्ही बरोबर असाल तर ना? वास्तवात तुम्ही बरोबर असता का? तुम्ही बरोबर आहात असे तुम्हाला वाटते?

**प्रश्नकर्ता :** आम्हाला आमचा आत्मा सांगतो की आमचे बरोबर आहे.

**दादाश्री :** हे म्हणजे तुम्हीच जज, तुम्हीच वकील आणि तुम्हीच आरोपी, मग तुम्ही बरोबरच असणार ना? तुम्ही चुकीचे नसणारच ना? समोरच्यालाही असेच वाटते की माझेच बरोबर आहे. तुम्हाला समजले ना? क्रोध फक्त तुम्हालाच येतो की दुसऱ्या कोणालाही येतो?

**प्रश्नकर्ता :** क्रोध तर सर्वांनाच येतो ना!

**दादाश्री :** पण या भाऊंना विचारा, हे तर नाही म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** सत्संगात आल्यावर मग क्रोध येत नाही ना!

**दादाश्री :** असे होय? मग यांनी कुठले औषध घेतले असेल? द्वेषाचे मूळच नष्ट होईल, असे औषध यांनी घेतले आहे.

**प्रश्नकर्ता :** पण मला असे विचारायचे होते की, अन्यायाची चीड येणे हे तर चांगलेच आहे ना? एखाद्या ठिकाणी आपल्याला स्पष्टपणे अन्याय होताना दिसतो, तेव्हा जो संताप होतो, तो योग्यच आहे ना?

**दादाश्री :** पण त्याला चांगले केव्हा म्हणता येईल? तर ते फॉरेनला एक्सपोर्ट (निर्यात) करता येत असेल तर त्याला चांगले म्हणावे. एक्सपोर्ट होते का?

**प्रश्नकर्ता :** हो, ते एक्सपोर्ट होऊ शकते!

**दादाश्री :** पण ते घ्यायला समोर ग्राहक आहेत का? त्याला कोणी गिऱ्हाइक मिळणार नाही ना! असे आहे, की हे क्रोध, चीड, ह्या सर्व गोष्टी म्हणजे तर कमकुवतपणा आहे, फक्त वीकनेस आहे. संपूर्ण जगाकडे हा कमकुवतपणा आहे, मग तुमचे उत्पादन कोण घेणार? तुम्ही इथून रोज चीड एक्सपोर्ट कराल तर कोणी घेणारच नाही. उलट ते म्हणतील 'आम्हीच तुम्हाला पाठवतो! आणि पाठवण्याचा सर्व खर्चही आम्हीच करू.' वरून असेही म्हणतील!

**प्रश्नकर्ता :** सात्विक चीड किंवा सात्विक क्रोध चांगला आहे की नाही?

**दादाश्री :** त्याला लोक काय म्हणतील? ही मुले देखील त्याला काय म्हणतील की, 'हे तर चिडखोर आहेत!' चीड येणे हा मूर्खपणा आहे, फूलिशनेस आहे. चीड येणे याला कमकुवतपणा म्हणतात. मुलांना आपण विचारले की, 'तुमचे पप्पा कसे आहेत?' तर तेही म्हणतील 'ते तर खूप चिडखोर आहेत!' सांगा आता, अब्रू वाढली की कमी झाली? असा वीकनेस असता कामा नये. म्हणजेच जिथे सात्विकता असते तिथे वीकनेस नसतो.

**प्रश्नकर्ता :** एखादी व्यक्ती लहान मुलाला खूप मारत असेल आणि त्याचवेळी आपण तिथून जात असू, तर आपण त्या व्यक्तीला थांबवतो आणि तरीही त्याने ऐकले नाही तर शेवटी त्याला रागावून किंवा क्रोध करून देखील त्याला थांबवावे की नाही?

**दादाश्री :** तुम्ही क्रोध केला तरी पण तो मारल्याशिवाय राहणार नाही. अरे, तो तुम्हालासुद्धा मारेल ना! मग त्याच्यावर क्रोध करून काय उपयोग? त्याला हळूवारपणे सांगा, व्यावहारिक बोलणे करा. परंतु जर तुम्हीही क्रोध केला तर तो वीकनेस आहे.

**प्रश्नकर्ता :** मग काय मुलाला मारू द्यावे?

**दादाश्री :** नाही, तुम्ही तिथे जाऊन त्याला सांगा की, 'भाऊ,

तुम्ही असे का करता? या मुलाने तुमचे काय बिघडवले आहे?' अशा प्रकारे त्याला समजावून सांगू शकता. जर तुम्हीही त्याच्यावर क्रोध केला तर तो तुमचा कमकुवतपणा आहे. प्रथम तर आपल्यात कमकुवतपणा असता कामा नये. ज्याच्यात कमकुवतपणा नसतो त्याचाच प्रभाव पडतो ना! अशा व्यक्तीने मग असेच काही सहजपणे सांगितले तरी सर्व त्याचे ऐकतील.

**प्रश्नकर्ता :** कदाचित ऐकणार नाहीत.

**दादाश्री :** न ऐकण्याचे कारण काय आहे? तर तुमचा प्रभाव पडत नाही. घरातील लहान मुलांना विचारले की, 'तुमच्या घरात पहिला नंबर कोणाचा? तेव्हा मुले शोधून काढतात की माझी आई कधी चिडत नाही, म्हणून सर्वात चांगली तीच आहे. पहिला नंबर तिचा. मग दुसरा, तिसरा, करत करत पप्पांचा नंबर शेवटी येतो! असे का? कारण ते चिडतात, चिडखोर आहेत म्हणून. मी मुलांना विचारतो, 'पप्पा पैसे कमावून तुमच्यासाठी खर्च करतात, तरीही त्यांचा नंबर शेवटचा?' तर म्हणतात 'हो.' बोला आता, मेहनत मजुरी करता, खाऊ घालता, पैसे आणून देता, तरी पण तुमचा नंबर शेवटचाच येतो ना?

तात्पर्य कमकुवत असता कामा नये. चारित्र्यवान असले पाहिजे. 'मॅन ऑफ पर्सनॅलिटी' असले पाहिजे! लाखो गुंडे त्याला पाहताच पळून जातील! या चिडखोर माणसापासून कोणी पळून तर जात नाही, उलट त्याला मारतात! जग तर कमकुवतपणालाच मारील ना!

पर्सनॅलिटी केव्हा येते? तर विज्ञान जाणल्यावर पर्सनॅलिटी येते. या जगात जे विसरले जाते, ते ज्ञान आहे आणि जे कधीही विसरता येत नाही ते विज्ञान आहे.

## शील असेल तर जग जिंकता येते

**दादाश्री :** कोणी तुला रागावले तर तू संतापतोस ना?

**प्रश्नकर्ता :** हो, संतापतो.

**दादाश्री :** मग त्याला कमकुवतपणा म्हणायचा की बहादुरी म्हणायची?

**प्रश्नकर्ता :** दोन्ही म्हणता येईल.

**दादाश्री :** नाही, नाही. त्याला तर कमकुवतपणाच म्हणावे लागेल.

**प्रश्नकर्ता :** काही ठिकाणी क्रोध करणे जरूरीच आहे ना?

**दादाश्री :** नाही, नाही. क्रोध स्वत:च एक कमकुवतपणा आहे. काही ठिकाणी क्रोध करणे जरूरी आहे, ही तर सांसारिक गोष्ट आहे. खरे तर लोक स्वत:चा क्रोध बंद करू शकत नाहीत म्हणून असे म्हणतात की, क्रोध केलाच पाहिजे. हिमवर्षा होते ते तुला माहीत आहे का? आता हिम म्हणजे अति थंड असते ना? त्या हिमाने झाडे जळतात, कापूस, गवत सगळे काही जळून जाते. हे तुला माहीत आहे का? ते अशा थंडीत का जळतात?

**प्रश्नकर्ता :** 'ओव्हरलिमिट' (अति) थंडीमुळे.

**दादाश्री :** हो, म्हणजे जर तू थंड राहिलास तर तसे शील उत्पन्न होईल. आणि उग्रता हा तर कमकुवतपणाच आहेच ना!

**प्रश्नकर्ता :** पण दादा, गरजेपेक्षा जास्त थंड राहणे हा देखील एक प्रकारचा कमकुवतपणाच आहे ना?

**दादाश्री :** गरजेपेक्षा जास्त थंड होण्याची गरजच नाही. तुम्हाला तर लिमिटमध्ये राहायचे आहे. त्याला 'नॉर्मालिटी' म्हणतात, बिलो नॉर्मल इज द फीवर, अबॉव्ह नॉर्मल इज द फीवर, नाइन्टी एट इज द नॉर्मल. (गरजेपेक्षा कमी असेल तरी ताप, गरजेपेक्षा जास्त असेल तरी ताप, 98 म्हणजे नॉर्मल – सामान्य) म्हणून आपल्याला नॉर्मालिटीच हवी आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे मग कोणी माझा अपमान केला आणि मी शांत बसून राहिलो, तर त्याला कमकुवतपणाच म्हटले जाईल ना?

**दादाश्री :** नाही. ओहोहो! अपमान सहन करणे याला तर मोठे

बळ म्हणावे लागेल! आता आम्हाला कोणी शिव्या दिल्या तर आम्हाला काहीच होणार नाही, त्याच्याबद्दल मनातही काही राहणार नाही, तेच आहे बळ! आणि हे सर्व कटकट करतात, भांडत राहतात ना, तो सर्व कमकुवतपणा आहे. म्हणजे अपमान शांतपणे सहन करणे हे खूप मोठे बळ आहे असे म्हणतात. आणि असा अपमान एकदाच पार केला, एक पायरी चढलो ना, की शंभर पायऱ्या चढण्याची शक्ती मिळेल. तुम्हाला समजले ना? समोरचा जर बलवान असेल तर जीवमात्र त्याच्यासमोर निर्बल होऊनच जातो, तो तर त्याचा स्वाभाविक गुण आहे. परंतु जर निर्बल माणसाने आपल्याला त्रास दिला तरीही तुम्ही त्याला काही केले नाही, तर त्याला फार मोठे बळ म्हणता येईल. 'ज्ञानी पुरुषां'जवळ तर इतक्या साऱ्या सिद्धी असतात की एकच विधी करून समोरच्याला आश्चर्यचकित करून टाकतील, पण ते तसे करत नाहीत. सिद्धीचा उपयोग तर ते करतच नाहीत ना!

**प्रश्नकर्ता :** पण एकदा तरी सिद्धीचा उपयोग करून पाहा ना!

**दादाश्री :** असा उपयोग करतात का कधी? आणि अशा लोकांसमोर काय उपयोग करायचा?

खरे तर निर्बलाचे रक्षण केले पाहिजे आणि बलवानाशी सामना केला पाहिजे, पण या कलियुगात असे लोक राहिलेच नाहीत ना! आता तर निर्बलाला मारत राहतात आणि बलवानासमोर पळून जातात. खूप कमी लोक आहेत की जे निर्बलाचे रक्षण करतात आणि बलवानाचा सामना करतात. असे लोक असले तर तो क्षत्रिय गुण म्हटला जाईल. नाहीतर सर्व जग निर्बलालाच मारत राहते. घरी जाऊन पती आपल्या पत्नीवर शौर्य दाखवितो. खुंटाला बांधलेल्या गाईला मारले तर ती कुठे जाईल? आणि जर तिला मोकळी सोडून मारले तर? ती पळून जाईल, नाही तर सामना करील.

स्वत:जवळ शक्ती असूनही माणूस समोरच्याला त्रास देत नसेल, आपल्या शत्रुला देखील दु:खी करत नसेल, तर ते मोठेच बळ आहे. आता जर कोणी तुम्हाला रागावले आणि तुम्हीही त्याला रागावलात तर

त्याला कमकुवतपणाच म्हणतील ना? म्हणजे मला काय म्हणायचे आहे की हे क्रोध-मान-माया-लोभ, या सर्व गोष्टी म्हणजेच कमकुवतपणा. जो बलवान आहे त्याला क्रोध करायची गरजच कुठे आहे? पण हे तर क्रोधाच्या आगीने समोरच्याला वश करायला जातात, पण ज्याच्याकडे क्रोध नाही त्याच्याकडे दुसरे काहीतरी असेलच ना? त्याच्याजवळ 'शील' नावाचे चारित्र्य असते, त्याने जनावरे देखील वश होतात. वाघ, सिंह, शत्रु सर्वच, संपूर्ण सैन्य वश होते! क्रोध-मान-माया-लोभ हा तर उघड उघड कमकुवतपणा आहे आणि जास्त क्रोध आल्यावर हात-पाय थरथरतात हे तुम्ही पाहिले आहे ना?

**प्रश्नकर्ता :** शरीर सुद्धा नकार देते की तुला क्रोध करण्यासारखा नाही.

**दादाश्री :** हो, शरीर सुद्धा नकार देते की आपल्याला हे शोभत नाही. म्हणजे क्रोध हा तर फार मोठा कमकुवतपणा आहे! म्हणून आपल्यात क्रोध असता कामा नये. आपल्यात लोभही असू नये. लोभाचा अर्थ काय? दुसऱ्याचे हडपणे. आपल्याकडे असूनही दुसऱ्याचे हडपणे याला लोभ म्हणतात. खाण्या-पिण्याची आपली लिमिट आहे. ते सर्व असूनही आणखी पुढचा विचार करणे, त्याला लोभ म्हणतात.

## प्रकृती कषायातच गुंतलेली

हे क्रोध-मान-माया-लोभ आहेत ना, त्यातील लोभाची प्रकृती अशी आहे की त्याच्या मालकाला (स्वत:ला) सुद्धा कळत नाही की माझ्यात किती लोभ आहे. म्हणजेच लोभ इतका कपटवाला आहे. क्रोधाचा स्वभाव भोळा आहे. मालकालाच काय पण इतर लोकांनाही तो समजतो आणि ते सांगतात सुद्धा की तुम्ही इतका क्रोध कशाला करता? पण लोभ मात्र स्वत:चा स्वत:ला पण कळत नाही. लोभामुळे माणूस खूप उलट्या दिशेने जातो. आणि लोभाची ही प्रकृती जाईल अशी नाही. अनंत जन्मांपर्यंत लोभाची प्रकृती जात नाही. कारण लोभाची राग (मोह, आसक्ती वाली) प्रकृती आहे, ती द्वेष प्रकृती नाही. आणि

राग प्रकृती थंडावा देणारी असते म्हणून ती प्रकृती आपल्याला सुटू देत नाही. ती तर फार भारी प्रकृती आहे. लोभ आणि कपट हे दोन्ही राग प्रकृतीत मोडतात आणि क्रोध आणि मान हे द्वेष प्रकृतीमध्ये जातात. द्वेष प्रकृती तर आपल्या ताब्यात येऊ शकते, पण राग प्रकृती मात्र आपल्या ताब्यात येत नाही. अगदी मालकाच्या देखील ताब्यात राहत नाही. कारण त्याच्यात इतका अधिक गोडवा असतो ना! आणि लोकांना तर मान आणि अपमान याचीच चिंता लागलेली असते ना!

**प्रश्नकर्ता :** दादा हे तर पूर्वीपासूनच चालत आलेले असेल ना?

**दादाश्री :** अनादी काळापासून मान आणि अपमान हेच सर्व चालू आहे! मनुष्य योनीत आल्यानंतर मान आणि अपमान सुरू होतात. दुसऱ्या वंशावळींमध्ये किंवा दुसऱ्या योनींमध्ये असे काहीही नसते. इथे मनुष्यांमध्ये आणि तिथे देव लोकांमध्ये सुद्धा मान आणि अपमानाचा खूप गोंधळ आहे.

**प्रश्नकर्ता :** इथे आल्यावर लगेचच हे सगळे कुठून शिकले?

**दादाश्री :** हे तर शिकूनच आलेले आहेत. हे पाहा ना, हा मुलगा किती वर्षांचा झाला?

**प्रश्नकर्ता :** पाच वर्षांचा.

**दादाश्री :** तर 75 मागच्या जन्माचे आणि पाच या जन्माचे, म्हणजे आता ऐंशी वर्षांचा झाला ना?

**प्रश्नकर्ता :** तर मग दुसऱ्या योनीत गेल्यावर मान-अपमान सर्व विसरून जात असतील का?

**दादाश्री :** विसरूनच जातात सर्व काही. इथून गेला की सर्व काही विसरून जातो, काहीही आठवत नाही. चार दिवसापूर्वी काय झाले होते ते तुम्हाला आठवते?

**प्रश्नकर्ता :** नाही, पण मग वैर, मान-अपमान हे सर्व लक्षात राहते तर मग हे जे सर्व चांगले आहे ते कसे विसरतो?

**दादाश्री :** नाही, ते वैर देखील लक्षात राहत नाही. फक्त क्रोध-मान-माया-लोभ हेच संज्ञा रूपात राहतात. या चार संज्ञा नेहमी राहतात, आणि वैर तर नंतर होते. पण हे चार क्रोध-मान-माया-लोभ मात्र आधीपासूनच असतात. म्हणूनच आल्या आल्या त्याचा अपमान झाला तर आरडाओरडा करतो. आता, लहान मुलांनी खाण्याच्या या गोळ्या असतात ना, त्या पेपरमिंटच्या गोळ्या इथे ठेवल्या असतील आणि या मुलीला आणि या मुलाला त्या घ्यायच्या असतील तर जो लोभी असेल तो जास्त घेईल. आपल्याला कळतेसुद्धा की हा लोभी आहे. लोभी व्यक्ती प्रत्येक गोष्टीत पुढेच असते.

**प्रश्नकर्ता :** पशुयोनीत सुद्धा क्रोध-मान-माया-लोभ असतात ना?

**दादाश्री :** सगळीकडे असतात, पण ते संज्ञा रूपात असतात म्हणून काही हरकत नाही. त्यांना क्रोध-मान-माया-लोभ असे मानले जात नाही, त्याने कर्मबंधन होत नाही.

**प्रश्नकर्ता :** क्रोध-मान-माया-लोभ याची प्रकृती जन्मापासूनच जीवामध्ये असते का?

**दादाश्री :** अरे, इथूनच सोबत घेऊन जातात आणि तिथे त्याचा उपयोग करतात.

**प्रश्नकर्ता :** लोभ प्रकृती आणि मान प्रकृतीमुळे भावकर्मे बांधली जातात का?

**दादाश्री :** यांच्यामुळेच सर्व भावकर्मे उत्पन्न होतात. हे जे क्रोध-मान-माया-लोभ आहेत, यांच्यामुळे आंधळेपणा येतो आणि आंधळेपणामुळे मग तो उलटे सुलटे भाव करतो. क्रोध-मान-माया-लोभ गेले तरच आंधळेपणा जाईल आणि भाव शुद्ध होतील. अहंकाराने आंधळा झाला आहे, लोभाने आंधळा झाला आहे, क्रोधाने आंधळा झाला आहे, कपटाने आंधळा झाला आहे, चारी प्रकारे आंधळा आणि आंधळाच होऊन फिरत असतो.

क्रोधीपेक्षा क्रोध न करणाऱ्याला लोक जास्त घाबरतात. त्याचे

काय कारण असेल? क्रोध बंद झाल्यावर प्रताप उत्पन्न होतो, निसर्गाचा नियमच तसा आहे! नाहीतर त्याला रक्षण करणारा कोणी मिळणारच नाही ना! क्रोध हे तर रक्षण होते, अज्ञानतेमध्ये क्रोधाने रक्षण होत असे.

## सम्यक् उपाय एकदा जाणून घ्या

**प्रश्नकर्ता :** क्रोध करायचा नसेल तरी पण होतोच, तर त्याचे निवारण कसे करावे?

**दादाश्री :** क्रोध करणे कुणालाच आवडत नाही ना! क्रोध म्हणजे स्वत:च स्वत:च्या घराला आग लावणे आहे. स्वत:च्या घरात गवत भरलेले आहे आणि त्याला काडी लावणे, याला म्हणतात क्रोध. म्हणजे प्रथम स्वत: जळतो आणि मग शेजाऱ्यांना जाळतो.

**प्रश्नकर्ता :** हे जाणत असूनसुद्धा क्रोध येतोच, तर त्याचे निवारण कसे करावे?

**दादाश्री :** कोण जाणतो? जाणल्यानंतर क्रोध येणारच नाही. क्रोध होतो याचा अर्थच तुम्ही जाणत नाहीत. तुम्ही फक्त अहंकारच करता की मी जाणतो.

**प्रश्नकर्ता :** क्रोध केल्यानंतर लक्षात येते की आपण क्रोध करायला नको होता.

**दादाश्री :** नाही, पण जाणल्यानंतर क्रोध येत नाही. आपण इथे दोन बाटल्या ठेवल्या असतील, आणि कोणी समजावले की या एका बाटलीत औषध आहे आणि दुसऱ्या बाटलीत विष आहे. दोन्ही बाटल्या सारख्याच दिसतात पण त्यात जर चूकभूल झाली तर आपल्याला कळते ना की हा जाणत नाही? चूक झाली नाही तर मात्र म्हणू की तो जाणत आहे. पण चूक तर होतच आहे, म्हणजेच हे निश्चित झाले की तो जाणत नव्हता. त्याचप्रमाणे क्रोध येतो याचा अर्थ तुम्ही जाणत नाही, फक्त जाणल्याचा अहंकार घेऊन फिरत असता. उजेडात कधी ठोकर लागते का? आणि जोपर्यंत ठोकर लागत आहे तोपर्यंत जाणलेच नाही.

हे तर आपण अंधारालाच उजेड म्हणतो, तीच आपली चूक आहे. म्हणूनच सत्संगात बसून एकदा 'जाणून घ्या', त्यानंतर मग क्रोध-मान-माया-लोभ सर्व काही निघून जाईल.

## परिणाम तर कॉजेस बदलल्यावरच बदलतील

एका व्यक्तीने मला विचारले, 'अनंत जन्मांपासून क्रोध काढत आलो आहोत, पण क्रोध जात का नाही?' तेव्हा मी म्हटले 'क्रोध काढून टाकण्याचे उपाय तुम्ही जाणत नाही.' तेव्हा तो म्हणाला 'क्रोध बंद करण्याचे उपाय तर शास्त्रात लिहिलेले आहेत, ते सर्व उपाय तर आम्ही करतो, तरी देखील क्रोध जात नाही.' तेव्हा मी सांगितले 'सम्यक् उपाय असला पाहिजे.' तर तो म्हणाला 'सम्यक् उपाय तर खूप वाचले आहेत, पण त्यांचा काही उपयोग होत नाही.' मग मी म्हटले की, 'क्रोध बंद करण्याचा उपाय शोधणे हा मूर्खपणा आहे, कारण क्रोध हा तर परिणाम आहे. उदा. तुम्ही परीक्षा दिली होती आणि आता त्याचा रिझल्ट आला, तर आता रिझल्ट आल्यानंतर तुम्ही रिझल्टला नष्ट करण्याचा उपाय करता, असा हा प्रकार झाला. पण हा रिझल्ट आला तो कशाचा परिणाम आहे, (ते समजून) त्यात फेरबद्दल करण्याची गरज आहे.

लोक काय म्हणतात की 'क्रोधाला दाबून टाका, क्रोधाला काढून टाका.' अहो, असे कशाला करता? उगाचच डोके फिरवायचे का? आणि एवढे करूनही क्रोध जात तर नाहीच. तरी पण लोक म्हणतात 'नाही साहेब, थोडाफार तरी दाबला गेला आहे. अरे, जोपर्यंत आत क्रोध आहे तोपर्यंत तो दाबला गेला आहे असे म्हणता येणार नाही. मग त्या भाऊंनी विचारले की 'तुमच्याकडे दुसरा काही उपाय आहे का?' मी म्हटले, 'हो उपाय आहे.' तुम्ही कराल का? तर ते 'हो' म्हणाले. मग मी त्यांना सांगितले की या जगात मुख्यपणे तुम्हाला कोणावर क्रोध येतो, त्याची नोंद करा, जिथे जिथे क्रोध येतो त्याची नोंद करा आणि जिथे जिथे क्रोध येत नाही तेही समजून घ्या. एकदा लिस्ट (यादी) तयार करा की ह्या व्यक्तीवर क्रोध येत नाही. काही लोक कितीही वाईट वागले तरी पण त्यांच्यावर क्रोध येत नाही, आणि काही तर

बिचारे अगदी सरळ वागतात, तरी पण त्यांच्यावर क्रोध येतो, म्हणजे याचे काहीतरी कारण तर असेलच ना?

**प्रश्नकर्ता :** त्या व्यक्तीसाठी मनात ग्रंथी बांधली गेली असेल का?

**दादाश्री :** हो, ग्रंथी बांधली गेली आहे, ती ग्रंथी सोडवण्यासाठी आता काय करावे लागेल? परीक्षा तर आधीच दिली गेली आहे. जितक्या वेळा त्यांचावर क्रोध व्हायचा आहे तितक्या वेळा तो होणारच आणि त्यासाठी ग्रंथी पण बांधली गेली आहे, पण आता यापुढे तुम्ही काय केले पाहिजे? ज्याच्यावर क्रोध येत असेल त्याच्यासाठी आपले मनोभाव बिघडवायचे नाहीत. मनोभाव सुधारावेत, की बाबा, आपल्या प्रारब्धानुसार हा मनुष्य असे करतो. तो जे जे काही करतो तो माझ्याच कर्माचा उदय आहे, म्हणूनच तो असे करत आहे. अशा प्रकारे आपण आपले मनोभाव सुधारावे. असे सतत मनोभाव सुधारत राहिल्याने समोरच्या व्यक्तीबद्दल आपले मन सुधारेल, तेव्हा मग त्याच्यावर क्रोध येणे बंद होईल. काही काळापर्यंत जो मागील इफेक्ट (परिणाम) आहे, तेवढा इफेक्ट देऊन मग क्रोध बंद होईल.

ही जरा सूक्ष्म गोष्ट आहे, आणि सूक्ष्म आहे म्हणूनच लोकांच्या लक्षात आली नाही. प्रत्येक गोष्टीचा उपाय तर असतोच ना? उपायाशिवाय जग असूच शकत नाही ना! लोक तर परिणामाचाच नाश करू इच्छितात.

म्हणजेच क्रोध-मान-माया-लोभ यावर हा उपाय आहे. परिणामाला काहीच करू नका, त्याच्या कारणांना नष्ट करा म्हणजे हे सर्व निघून जातील. म्हणजे तो स्वत: विचारशील असला पाहिजे. जर जागृत नसेल तर उपाय कसा करणार?

**प्रश्नकर्ता :** कारणांना कशा प्रकारे नष्ट करायचे, ते जरा परत समजावून सांगा ना!

**दादाश्री :** या भाऊवर मला क्रोध होत असेल, तर मी समजून घेईन की याच्यावर मला जो क्रोध येत आहे, तो तर मी पूर्वी त्याचे

दोष पाहिले होते, त्याचा परिणाम आहे. आणि आता हा जो दोष करत आहे तो जर मी मनाला लावून घेतला नाही तर मग मला त्याच्यावर क्रोध येणे बंद होत जाईल. पण थोडे पूर्वीचे परिणाम असतील तेवढे येतील पण पुढचे सगळे बंद होईल.

**प्रश्नकर्ता :** दुसऱ्यांचे दोष पाहतो त्यामुळेच क्रोध येतो का?

**दादाश्री :** हो. दुसऱ्यांचे दोष पाहतो, ते देखील आपण जाणून घेतले पाहिजे की हे चुकीचे परिणाम आहेत. मग हे चुकीचे परिणाम पाहणे बंद होईल, त्यानंतर क्रोध येणे बंद होईल. आपल्याकडून दोष पाहणे बंद झाले तर सर्व काही बंद होईल.

## क्रोध हा केवळ कमकुवतपणाच

**प्रश्नकर्ता :** पण दादा, कधी एखादी व्यक्ती आपल्यावर गरम झाली (क्रोधीत झाली) तर काय करायला हवे?

**दादाश्री :** गरम तर होणारच ना! ते थोडेच त्याच्या हातात आहे? आतील मशिनरी आपल्या ताब्यात नाही ना! ही मशिनरी तर कशीबशी चालत राहते. जर स्वतःच्या ताब्यात असेल तर कोणी मशिनरी गरम होऊच देणार नाही ना! या जगात कोणी गरम होणारच नाही. गरम होणे, थोडे देखील गरम होणे म्हणजे गाढवपणा आहे, मनुष्यपणात गाढव झाला! असे कोणी करणारच नाही ना! पण जे स्वतःच्या ताब्यात नाही, तिथे काय करणार?

असे आहे की या जगात कधी गरम होण्याचे काही कारणच नाही. कोणी म्हणेल की, 'हा मुलगा आता विहिरीत पडतो की काय असे वाटत होते.' असा विहिरीत पडला तरी देखील गरम होण्याचे काही कारण नाही. अशा वेळी तुला डोके थंड ठेवून काम करावे लागेल. पण तू तापट आहेस म्हणून गरम होतोस आणि गरम होणे म्हणजे कमकुवत स्वभाव, याला भयंकर कमकुवतपणा म्हणतात. अतिशय कमकुवतपणा असल्यामुळेच गरम होत असतो ना! म्हणूनच जो गरम होतो त्याची दया यायला हवी की या बिचाऱ्याच्या कंट्रोलमध्ये

काहीच नाही. ज्याचा स्वत:चा स्वभावावर देखील कंट्रोल नाही, त्याची दया यायला हवी. गरम होणे म्हणजे काय? की आधी स्वत: जळणे आणि मग समोरच्याला जाळणे. ही आगकाडी लावणे म्हणजे स्वत: भकभक जळणे आणि मग समोरच्याला जाळणे. म्हणजेच गरम होणे जर स्वत:च्या हातात असते तर कोणी गरम होणारच नाही ना! सगळेच काही गरम होत नाहीत ना! जळजळ कोणाला आवडेल? जर कोणी असे म्हणेल की, 'संसारात केव्हा तरी क्रोध करण्याची गरज पडते.' त्यावर मी म्हणेन की 'नाही, असे काही कारणच नाही की क्रोध करण्याची गरज पडेल.' क्रोध हा कमकुवतपणा आहे, म्हणजे तो होऊन जातो. म्हणूनच भगवंताने अबला म्हटले आहे. पुरुष कोणाला म्हणतात? क्रोध-मान-माया-लोभ असा कमकुवतपणा ज्यांच्यात नाही, त्याला भगवंताने पुरुष म्हटले आहे. म्हणजे हे जे पुरुष दिसतात त्यांना देखील अबला म्हटले आहे. पण यांना लाज वाटत नाही ना, ते बरे आहे! नाही तर अबला म्हटल्यावर तर लाज वाटणार ना? पण यांना कसलेच भान नाही. यांना कसले भान आहे? अंघोळीसाठी पाणी ठेवले तर अंघोळ करतात. जेवण्याचे, अंघोळ करण्याचे, झोपण्याचे असे सर्व भान आहे, पण त्याशिवाय कसलेही भान नाही, मनुष्यत्वाचे जे विशेष भान म्हटले जाते की, हा सज्जन पुरुष आहे, अशी सज्जनता लोकांना दिसावी, याचे भान नाही.

**प्रश्नकर्ता :** सज्जनता देखील संसारात आवश्यक आहे ना?

**दादाश्री :** सगळ्यात पहिली आवश्यकता आहे. संसारात सज्जनतेलाच किंमत (महत्त्व) आहे, सज्जनता असेल तर पुन्हा मनुष्यजन्म मिळेल आणि जर सज्जनता संपली आणि माणुसकी निघून गेली की मग चार पायांचा होईल. माणुसकी तर सर्वात आधी असली पाहिजे. माणुसकी आहे बस एवढीच 'टेस्ट' झाली, तर इथे मनुष्य योनीत जन्म होईल. म्हणजेच सज्जनता सर्वात आधी पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** ते भान ज्ञानीशिवाय मिळत नाही ना!

**दादाश्री :** असे आहे, पूर्वी ज्ञानी भेटले नसतील परंतु संत जरी

भेटले असतील तरी पण त्या जन्मात त्यांच्यात विनय गुण म्हणजे सज्जनता तर आलेलीच असते. मग जरी त्यांच्यात कमकुवतपणा असला तरी सज्जनता तर येऊ शकते. मी अशी चांगली चांगली माणसे पाहिली आहेत, त्यांना पूर्वी संत, गुरु भेटले होते, आणि त्यामुळे त्यांच्यात सज्जनता असते. पण मोक्षाचा मार्ग तर मात्र ज्ञानी पुरुष भेटल्यावरच मिळतो.

## क्रोधाचे शमन, कोणत्या समजुतीमुळे?

काही लोक क्रोधाला दाबत राहतात. अरे, ती दाबून टाकण्यासारखी गोष्ट नाही! आधी क्रोधाला ओळख आणि मग दाब ना! क्रोध दाबून टाकला तरी त्याच्यात चार रेडे आहेत, क्रोध-मान-माया-लोभ! त्यातील क्रोधाच्या रेड्याला थोडे दाबून अरुंद केला की मानाचा रेडा अधिक जाड होतो! यात काय फायदा? मानाचा रेडा तर जास्त जाड झाला ना! लोक तर एकच रेड्याला दाबतात ना? पण असे करता कामा नये. क्रोध म्हणजे काय? ते ओळखण्याची गरज आहे.

क्रोध स्वतःच अहंकार आहे. आता ते तपासून घ्यायला हवे की तो अहंकार कशा प्रकारे आहे. तपासणी केल्यावर समजेल की क्रोध अहंकार आहे. हा क्रोध उत्पन्न का झाला? तर 'या ताईने कप-बशा फोडल्या म्हणून क्रोध उत्पन्न झाला.' आता कप-बशा फोडल्या तर त्यात तुमची काय हरकत आहे? तर म्हणतील, 'आमचे नुकसान झाले.' पण नुकसान झाले म्हणून काय तिला रागावणार? अहंकार करणे, रागावणे या सर्व गोष्टींचा जर खोलवर विचार केला तर सर्व अहंकार धुतला जाईल असे आहे. आता हे कपाचे तुटणे, निवार्य आहे की अनिवार्य? निवार्य संयोग असतात की नाही? शेठ नोकराला रागावतो की, 'अरे, कप-बशा का फोडल्या? तुझे हात मोडले होते का? तुझे असेच असते, तसेच असते वगैरे.' आता हे जर अनिवार्यच असेल तर त्याला रागवायला हवे का? जावयाच्या हातून कप-बशा फुटल्या तर मात्र काहीच बोलत नाहीत! कारण तो सुपीरिअर आहे, म्हणून तिथे अगदी गप्प! आणि जर इनफीरिअर असेल तर मात्र तिरस्कार करतात. हा सर्व इगोइझम आहे. सुपीरिअरच्या समोर सगळे गप्प बसतात ना?

या दादांच्या हातून काही फुटले तर कोणाच्या मनात काहीच येत नाही आणि नोकराच्या हातून फुटले तर?

या जगाने न्याय कधी पाहिलाच नाही. समज नसल्यामुळे हे सर्व आहे. जरी बुद्धीपूर्वक समज असती, तरी खूप झाले असते! बुद्धी जर विकसित झाली असेल, समंजस असेल, तर भांडण अजिबात होणारच नाही. आणि भांडण करून काय कप-बशा जोडल्या जाणार आहेत का? फक्त संतोष मिळतो, एवढेच ना? उलट खरे तर भांडण होऊन जाते, मनात क्लेश होतो तो वेगळाच. म्हणजे या व्यापारात एक तर कप-बशा फुटल्या ते नुकसान, दुसरे क्लेश झाला हे नुकसान, आणि तिसरे नोकराबरोबर वैर बांधले गेले हे नुकसान! नोकर वैर बांधतो की 'मी गरीब आहे', म्हणून हे माझ्याशी असे वागतात! म्हणजे तो काही वैरभाव सोडणार नाही आणि भगवंतांनीही सांगितले आहे की कोणाशीही वैर निर्माण करू नका. शक्य असेल तर प्रेम द्या, पण वैर निर्माण करू नका. कारण प्रेम तर आपोआपच वैराला खणून टाकेल. प्रेमाची कबर तर वैराला खणून टाकेल अशी आहे, पण वैराची कबर कोण खणेल? वैराने तर वैर वाढतच जाते. अशा प्रकारे वैर निरंतर वाढतच राहते. वैरामुळेच तर ही सर्व भटकंती आहे! ही माणसे का भटकतात? यांना कधी तीर्थंकरांची भेट झाली नव्हती का? तर 'नाही, तीर्थंकर तर खूप सारे भेटले होते.' तेथे गेले होते, बसले होते. त्यांचे म्हणणे ऐकले, देशनासुद्धा ऐकली तरी पण काहीही निष्पन्न झाले नाही.

कोण कोणत्या बाबतीत अडचणी येतात? कुठे कुठे विरोध होतो? त्या विरोधांना मिटवून टाका ना! विरोध होणे म्हणजे संकुचित दृष्टी आहे. म्हणून 'ज्ञानी पुरुष' लाँग साईट (विशाल दृष्टी) देतात. या लाँग साईटच्या आधाराने सर्व काही 'जसे आहे तसे' दिसते!



# [ 19 ]
# व्यापारातील अडचणी

## अडचणींमुळे प्रगती होते

'अडचणी येणे ही चांगली गोष्ट आहे' असे मानलेत तरच पुढे जाऊ शकाल. ज्याला तुम्ही अडचण म्हणता, ती चांगली गोष्ट आहे असे जेव्हा तुम्ही मानाल, तेव्हाच तुम्ही पुढे जाऊ शकाल, परंतु जर तुम्ही असे म्हटले की 'ही अडचण वाईट आहे' तर ती अडचण तुम्हाला अडवेल आणि तुमची प्रगती खुंटेल. अडचणींना पार केले तरच काम होईल, नाहीतर त्या अडचणी तुम्हाला अडवून धरतील. पण अडचणी आल्यावर जर तुम्ही त्यावर *'बाखडी बांधाल'* (वाद, भांडण, तक्रार कराल) तर काही भले होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** बाखडी बांधणे म्हणजे?

**दादाश्री :** जे लोक अडचणी आणतात, त्यांच्याबद्दल जर तुमच्या मनात आले की, 'हे असे का करतात?' तर त्याने काही भले होणार नाही. लोक तर अडचणी आणणारच, हे गृहीत धरूनच आपल्याला पुढे जायचे आहे. लोक आपल्या वाटेत अडचणी निर्माण करतीलच असे मानूनच पुढे जायचे आहे. आणि तरी त्या लोकांशी वीतराग राहायचे आहे. लोक तर अडचणी आणतील, त्यांना पार करून जायचे आहे आणि तरी वीतराग राहायचे आहे, हे समजूनच मोक्ष मार्गात पुढे जायचे आहे. पण तरी आम्ही जो मोक्षमार्ग दिला आहे तो खूप सोपा मार्ग आहे!

## विषमतेत समता, हेच लक्ष्य

अडचणी तर येतच राहतील. अडचणी शिवाय तर हा काळ व्यतीत होणार नाही, याचेच नाव दूषमकाळ! समता राहणे महाकठीण, असा हा काळ आहे, म्हणजे 90 टक्के विषमताच असते. त्यात थोडीफार समता ठेवणे, ही काही अशी तशी गोष्ट आहे का? सध्या तर हा विषमतेचा सागरच आहे.

**प्रश्नकर्ता :** त्यात थोडी समता राहिली तर ते आश्चर्यच आहे.

**दादाश्री :** हो, ते आश्चर्य आहे आणि तशी समता राहिली तर त्याचा आनंद आपल्याला स्पष्टपणे कळेल.

व्यवहाराच्या लक्षसहित समता राहत असेल तर ते अहंकार वाढण्याचे कारण आहे. आत्म्याचे लक्ष असल्याशिवाय त्याला समता म्हणता येत नाही. म्हणजेच लोकांना अशी समता नसतेच. जर कोणी निर्ढावला तर समता राहील, पण मग तिला समता म्हणत नाही. निर्ढावलेला म्हणजे काय? तर, 'मला काय? तो तर मरेल!' असे वाटणे. याला भगवंताने निर्ढावलेला म्हटले आहे. 'मला काय' असे जो म्हणतो त्याचे तर कधीच निराकरण (सुटका) होणार नाही. अरे, 'मला काय' असे तू म्हणतोस? तुला मुले वगैरे आहेत की नाहीत? मग 'मला काय' असे कसे म्हणू शकतोस? पण लोक असे निर्ढावलेले आहेत. असे आहे की, माणसावर खूप दु:ख कोसळले की तो निर्ढावतो.

## देवाण-घेवाणीच्या धंद्यात सुखाचे देणे

**प्रश्नकर्ता :** माझ्या घरात सर्व प्रकारच्या अडचणी का येतात. धंद्यात, पत्नीला, घरात सर्वांना काहीतरी अडचणी असतातच.

**दादाश्री :** आपण लोकांना त्रास दिला तर आपल्याला त्रास होतो. आणि आपण लोकांना सुख दिले तर आपल्याकडे सुख येते. सुख हवे असेल तर लोकांना सुख द्या आणि अडचणी हव्या असतील तर लोकांना त्रास द्या, जे तुम्हाला हवे असेल तेच तुम्ही दुसऱ्यांना द्या. आपल्याकडे

जे येते त्यावरून आपण समजले पाहिजे की आपण लोकांना काय दिले होते. म्हणूनच जर सुख हवे असेल तर सुख देण्याचा प्रयत्न करा, सुरुवात करा.

हे जग तर व्यवहार स्वरूप आहे, ते म्हणते की '(आधी) द्या, नंतर घ्या' जर अडचणी येत असतील तर आपण समजले पाहिजे की आपण लोकांना त्रासच दिला आहे, दुसरा धंदाच केला नाही! आणि जर सुख येत असेल तर समजावे की आपण दुसऱ्यांना सुख दिले आहे.

**प्रश्नकर्ता :** पूर्वी जो त्रास दिला गेला आहे, तोच आता परत येत आहे. तर या त्रासात सुख कसे देता येईल?

**दादाश्री :** त्यासाठी सुख देण्याचा भाव करा आणि पुन्हा कोणाला त्रास देऊ नका. कोणी दोन शिव्या दिल्या तर तुम्ही उलट पाच शिव्या देऊ नका आणि त्या दोन शिव्यांना जमा करून घ्या. तुम्ही पूर्वी ज्या दोन शिव्या दिल्या होत्या त्याच आता परत आल्या आहेत! म्हणून त्या दोन शिव्या जमा करून घ्या. इथे तर कोणी दोन शिव्या दिल्या तर जमा करण्याऐवजी आणखी पाच शिव्या देतात. अहो, त्याच्याबरोबर असा व्यापार का चालू ठेवता? म्हणजे हा सर्व देण्या-घेण्याचा हिशोब आहे. जग याला ऋणानुबंध आहेत असे काहीतरी म्हणेल पण खरे तर हा सर्व देवाण-घेवाणीचाच हिशोब आहे. म्हणूनच जर आवडत असेल तर उधार द्या, पण उधार दिलेले परत येईल. हा तर जमा-उधार यांचा खेळ आहे! जे दिले होते तेच परत येत आहे, यात भगवंत हस्तक्षेप करत नाहीत. त्रास आवडत नसेल तर त्रास देणे बंद करा.

खुशाल कोणी शंभर शिव्या देवोत! आता शिव्या म्हणजे काही दगड नाहीत. ज्ञान मिळाल्यानंतर या शिव्या म्हणजे दगड वाटतात का? जर दगड लागला तर मला समजेल की याला जखम झाली आहे, रक्त निघत आहे, तर त्याला दु:ख मानता येईल. पण शिव्या म्हणजे काही दगड नाही की ज्या लागतील आणि रक्त येईल.

**प्रश्नकर्ता :** तरीदेखील शिव्या आत स्वीकारल्या जातात आणि त्याचा परिणाम होतो.

**दादाश्री :** पण मला असे म्हणायचे आहे की शिव्या काय आपल्याला स्पर्श करतात?

**प्रश्नकर्ता :** तरी पण आत जखम होतेच.

**दादाश्री :** पण त्या तुम्हाला कसा स्पर्श करू शकतील? तो तिथे बोलला आणि तुम्हाला इथे कशी काय जखम झाली?

## कुठल्या दृष्टीने जगत निर्दोष दिसेल

पुद्गलकडे (ज्याचे पूरण-गलन होते) लक्ष देऊ नका, पुद्गलाकडे दृष्टी ठेवूच नका. आत्म्याकडेच दृष्टी ठेवा. महावीर भगवंतांना जगात सगळेच निर्दोष दिसले. कानात खिळे ठोकणारेही त्यांना निर्दोष दिसले. या जगात कोणीही दोषी नाहीच. जर कोणी दोषी दिसत असेल तर ती आपलीच चूक आहे. एक प्रकारे तो आपला अहंकार आहे. हे तर आपण बिनपगारी काझी बनतो आणि मग त्याचा मार खातो (त्रास सोसतो).

'मोक्षाला जाताना हे लोक आम्हाला गोंधळवतात' असे जे आपण बोलतो ते व्यवहारात बोलतो. या इंद्रियज्ञानामुळे जसे दिसते तसे बोलतो. पण खरे तर वास्तवात तसे नाही. वास्तवात तर लोक गोंधळात पाडूच शकत नाहीत ना! कारण कुठलाही जीव दुसऱ्या कुठल्या जीवामध्ये किंचित्मात्र पण हस्तक्षेप करू शकत नाही, असे हे जग आहे. हे लोक तर बिचारे प्रकृतीच्या अधीन आहेत, प्रकृती जशी नाचवेल त्यानुसार नाचतात, म्हणजे त्यात कोणाचाही दोष नाहीच. संपूर्ण जग निर्दोष आहे. मला स्वत:ला ते निर्दोष असल्याचा अनुभव येतो. जेव्हा तुम्हालाही ते निर्दोष दिसेल तेव्हा तुम्ही या जगापासून सुटाल, नाहीतर एक जीव जरी दोषी दिसला तर तुम्ही सुटणार नाही.

**प्रश्नकर्ता :** यात सर्व प्रकारचे जीव येतात का? मनुष्यच नाही तर किडे, जीव-जंतू सर्व यात येतात का?

**दादाश्री :** हो, जीवमात्र निर्दोष दिसले पाहिजेत.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, आपण म्हणालात की जीवमात्र निर्दोष आहेत. परंतु समजा नोकरीमध्ये मी कुठेतरी चूक केली आणि माझा वरिष्ठ अधिकारी मला म्हणाला की तू ही चूक केली आहेस आणि मग तो मला ओरडेल, खडसावेल. आता जर मी निर्दोषच आहे तर वास्तवात मला त्याने ओरडायला नको ना?

**दादाश्री :** कोणी तुम्हाला ओरडले तर तुम्ही त्याकडे लक्ष देऊ नका. ओरडणारा देखील निर्दोष आहे हे तुम्हाला समजले पाहिजे. म्हणजे कोणावरही दोषारोपण करता कामा नाही. ते तुम्हाला जितके निर्दोष दिसतील तितके तुम्हाला समजले असे म्हणता येईल.

मला जग निर्दोष दिसते. तुमची दृष्टी देखील तशी झाल्यावर हे पझल सॉल्व होईल (कोडे सुटेल). मी तुम्हाला असा प्रकाश देईन आणि इतकी सारी पापे धुवून टाकीन की ज्यामुळे तुम्हाला उजेड लाभेल आणि तुम्हालाही निर्दोष दिसू लागेल. आणि त्याबरोबरच पाच आज्ञाही देऊ. त्या पाच आज्ञांमध्ये राहिलात तर तुम्हाला जे ज्ञान दिले आहे ते अजिबात फ्रॅक्चर होणार नाही.

## 'सोनार', किती गुणवान दृष्टी

आम्ही सर्व जगाला निर्दोष पाहतो.

**प्रश्नकर्ता :** अशा प्रकारे सर्व जगाला निर्दोष केव्हा पाहता येईल?

**दादाश्री :** तुम्हाला उदाहरण देऊन समजावतो, म्हणजे तुम्हाला समजेल. एका गावात एक सोनार राहतो, पाच हजार लोकांचे गाव आहे. तुमच्याकडे सोने आहे, ते सर्व सोने घेऊन तुम्ही तिथे विकण्यासाठी गेलात. तेव्हा तो सोनार ते सोने असे घासतो, घासून पाहतो. आपले सोने जरी चांदीसारखे दिसत असेल तरी तो रागावत नाही. भेसळयुक्त सोने असले तरी तो रागावत नाही. 'असे बिघडवलेले सोने का आणलेत?' असे तो का रागावत नाही? कारण त्याची दृष्टी सोन्यावरच आहे आणि

जर दुसऱ्या कोणाकडे गेलात तर तो रागावेल, म्हणेल की 'असे कसे काय आणले?' पण जो सोनार आहे तो रागवत नाही. अर्थात तुम्हाला जर सोने हवे असेल तर त्यातले सोनेच पाहा ना! त्यात आणखीन काही आहे ते का पाहता? इतके भेसळयुक्त सोने का आणलेत असे रागावत राहिला तर त्याचा शेवट येणारच नाही. आपण आपल्या परीने एवढेच पाहायचे आहे की यात इतके सोने आहे आणि त्याचे इतके पैसे मिळतील. तुम्हाला समजले ना? या दृष्टीनेच मी सर्व जगाला निर्दोष पाहतो. सोनारसुद्धा याच दृष्टीने कसेही सोने असले तरी त्यातील सोनेच पाहतो ना? बाकी काहीच पाहत नाही आणि रागावतही नाही. आपण त्याला सोने दाखवायला गेलो तर आपल्या मनात येते की 'हा रागावला तर?' आपले सोने तर खराब झालेले आहे! पण नाही, तो रागावत वगैरे नाही. त्याला काहीच हरकत नसते. तो काय म्हणेल 'मला काय देणेघेणे आहे?' मग ते बेअक्कल आहेत की अक्कलवंत आहेत?

**प्रश्नकर्ता :** अक्कलवंतच म्हणावे लागेल ना!

**दादाश्री :** हे उदाहरण बरोबर आहे ना?

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे. असे उदाहरण दिले तर सर्वकाही पटकन फिट होते.

**दादाश्री :** आता हे उदाहरण कोणाला माहीत नाही का?

**प्रश्नकर्ता :** माहीत असेल.

**दादाश्री :** नाही, कसे काय लक्षात येईल? ध्यान दिवसभर लक्ष्मीमध्ये आणि लक्ष्मीचा विषय संपला की परत घरच्या मेम साहेबांची आठवण येते आणि मेम साहेबांचा विषय संपला की परत लक्ष्मीचा विषय आठवतो! त्यामुळे इतर काही लक्षात राहतच नाही ना! मग दुसरे हिशोब करणे राहूनच जाईल ना?

मी सोनाराला पाहिले होते, तेव्हा मला असे वाटायचे की हा रागावत का नाही की तुम्ही खराब सोने का आणले? त्याची दृष्टी किती

सुंदर आहे! बिलकुल रागावत नाही. याचे सोने चांगले आहे असेही म्हणत नाही आणि त्याचे वाईट आहे असेही म्हणत नाही. काहीच म्हणत नाही, उलट असे म्हणेल, 'बसा, चहा–पाणी घ्याल ना?' अरे, भेसळयुक्त सोने आहे तरी पण चहा पाजतोस? त्याचप्रमाणे यातही काय बिघडलेले आहे? आत 'शुद्ध' सोनेच आहे ना?

## असा कसला हा रिसर्च की ज्यामुळे भगवंत भेटले!

मी पुरी लाईफ रिसर्चमध्येच काढली आहे, रिसर्चच केला आहे सर्व. लहान वयातच म्हणत असे की भगवंत डोक्यावर नको. त्याच्याऐवजी ही बायको, मुले, आई–वडील डोक्यावर असतील तर हरकत नाही, ते खाऊ–पिऊ घालतील! परंतु जर भगवंत डोक्यावर असेल तर ते उगाचच कटकट करतील. मग नंतर वाचनात आले की भगवंत तर आत असलेल्याला म्हणतात, तेव्हा मग ही गोष्ट मला आवडली. काही लोक तर भगवंताला 'आत असलेला' असेच म्हणतात ना!

## वेळ धर्मासाठीच घालवला

आम्ही किती तरी दिवसापासून व्यापार केलाच नाही. व्यापारामध्ये जर आमच्या भागीदाराने विचारले की, 'हे कसे करूया?' तर मी म्हणत असे की 'असे असे करूया.' त्यावर ते म्हणत, 'हा तर माझा सहा महिन्याचा गुंता सुटला, आता आपण सहा महिने आला नाहीत तरी चालेल. आपण एकदा काही सांगितले ना, की माझी सहा महिन्यांची मेहनत वाचते. म्हणजे मला सूट दिली होती की तुम्ही तुमचा धर्म करत राहा आणि मी हे काम करत राहीन. त्याबरोबरच त्यांनी असेही सांगितले होते की बदल्यात मलाही थोडेफार 'हे' द्या.

## नुकसान म्हटल्यावर उधारी तरी थांबेल

व्यापारात जर नुकसान झाले तरी मी लोकांना सांगत असे आणि फायदा झाला तरीही सांगत असे! पण कोणी विचारले तरच, नाहीतर मी व्यापाराची गोष्ट कधीच करत नसे. लोकांनी विचारले की 'सध्या

तुम्हाला नुकसान झाले आहे, हे खरे आहे का?' तर मी म्हणत असे की, 'हो, हे खरे आहे.' आमच्या भागीदाराने आम्हाला कधी असे विचारले नाही की तुम्ही का सांगून टाकता? कारण असे सांगून टाकणे चांगले आहे, ज्यामुळे पैसे लावण्यासाठी येणारे लोक थांबतील आणि उधारी वाढणार नाही. पण लोक तर काय म्हणतात? 'अरे, असे सांगू नये, नाहीतर लोक पैसे लावणार नाहीत.' पण त्यामुळे तर आपली उधारी वाढेल ना, त्याऐवजी जे झाले ते सरळ सरळ सांगून टाका ना की 'बाबा, नुकसान झाले आहे.'

## ...दोघांसाठी उत्तरे वेगवेगळी

आमच्या कंपनीत नुकसान झाले होते म्हणून मामला जरा थंड झाला होता. तेव्हा बडोद्याला गेल्यावर लोक विचारायचे की 'खूप नुकसान झाले आहे का?' मग मी त्यांना विचारत असे की 'किती नुकसान झाले असेल असे तुम्हाला वाटते?' तर ते म्हणत की, 'झाले असेल लाख रुपयांचे.' मग मी म्हणत असे की 'तीन लाखांचे नुकसान झाले आहे.' खरे तर व्यापारात अर्धा-पाऊण लाखाचेच नुकसान झालेले असते, पण मी त्याला तीन लाख सांगत असे. कारण त्याला तेच जाणून घ्यायचे असते! त्याला काय जाणून घ्यायचे आहे हे मला माहीत होते, की जर मी त्याला लाख म्हटले तर तो खुश होईल आणि बिचाऱ्याला घरी जेवण गोड लागेल. म्हणून मी म्हणत असे की तीन लाखांचे नुकसान झाले, मग त्यादिवशी तो जास्त आवडीने जेवण करीत असे. आणि दुसरा कोणी शुभचिंतक आला आणि त्याने विचारले की 'फार नुकसान झाले का?' तर त्यांना मी म्हणत असे की, 'नाही, पन्नास एक हजाराचे झाले आहे.' म्हणजे घरी गेल्यावर त्यालाही बरे वाटत असे. शुभचिंतक आणि इतर प्रकारचे, असे दोन्ही प्रकारचे लोक येतात. दोघांनाही खुश करून पाठवले पाहिजे. जर मी म्हटले की, 'तीन लाखांचे नुकसान झाले आहे' तर तो खूप खुश होईल. त्याला म्हटले की 'चहा पिऊन जा ना!' तर म्हणेल 'मला जरा काम आहे.' कारण त्याला आनंद झालेला असतो ना, मग त्यातच त्याला चहा वगैरे सर्व मिळाले. त्याला

त्याचा खुराकच मिळाला, कारण द्वेष आहे ना! ही स्पर्धा अशी गोष्ट आहे की त्यासाठी माणूस काहीही करतो. स्पर्धा म्हणजे, 'माझ्यापुढे गेला? आता याला मागे ढकललेच पाहिजे', असे वाटते. म्हणून सतत मागे ढकलण्याचे प्रयत्न करत राहतात. अशांना मी सरळ सरळ सांगून टाकतो की खूप नुकसान झाले आहे. पाहा मग तो आवडीने जेवण करतो ना! आणि आपले त्यात काय नुकसान होणार आहे? आपले नुकसान तर झालेलेच आहे, आपली त्याबद्दल तक्रार नाही. पण लोकांना उत्तर तर द्यावेच लागते ना! जर त्यांना सांगितले की, 'काही नुकसान झाले नाही.' तर ते आणखी काहीतरी शोधून काढतात की हे तर नकार देत आहेत. म्हणून त्यांना सांगावे लागते की 'मी नाही म्हणत नाही, हो म्हणत आहे की तिप्पट नुकसान झाले आहे, ज्यांनी तुम्हाला सांगितले त्यांना विचारा, त्यांनाही माहीत नसेल पण माझे खूप नुकसान झाले आहे.' मग काही दिवसांनी ते परत येतात आणि विचारतात 'आता तुमचा कामधंदा कसा आहे? बंद करावा लागणार आहे का?' तेव्हा मी म्हणतो 'तशी तर सात लाखाची मालमत्ता होती, त्यातले तीन लाख कमी झाले.' म्हणजे असे काहीतरी नवीनच सांगतो. अरे, पण तू माझा सामना कसा काय करू शकणार? मी 'ज्ञानी पुरुष' आहे, मी तुला दुःख देणार नाही, पण तू असे सर्व शोधत बसू नकोस. लोक उगाचच मागे लागतात. मी तर असे खूप लोक पाहिले आहेत. जग आहे ना, सर्व प्रकारचे लोक असतात!

## चोऱ्या होऊ दिल्या, हिशोब चुकते केले

आमच्या कामाच्या ठिकाणी असे होत असे की ज्याला चौकीदार म्हणून नेमावे तोच चोऱ्या करवीत असे. मग एका ऐवजी दोन चौकीदार ठेवले. एक रात्रीला आणि दुसरा दिवसाला, असे दोन ठेवले. तर तेही चोऱ्या करवीत असत. दर दोन-तीन दिवसांनी चोऱ्या होतच राहत. मी समजून गेलो की, हे सर्व बरोबर आहे, हा सारा हिशोब चुकवावा लागेल. या गावात चोरीचा हिशोब चुकवण्यासाठी आलो आहोत, म्हणून सगळा हिशोब चुकता केल्यानंतर सुटका होईल. चोर चोऱ्या करीत असे

आणि आम्हाला सकाळी कळत असे, कळल्यानंतर आम्ही शांतपणे जे स्पेअरपार्ट चोरी झालेत ते परत नवीन मागवून घेऊन कामाला लागत असू, एवढेच करत असू. मग सात दिवसानंतर पोलिसांना कळवत असू. म्हणजे नुकसानात आणखीन नुकसानाची भर! असे का करायचे? तर नाही, असे नाटकसुद्धा करावे लागते! नाटक केले नाही तर ते चुकीचे ठरेल. मग पोलिस येत असत आणि विचारत असत की 'काय काय गेले?' तेव्हा मी त्यांना म्हणत असे, 'अमुक अमुक सामान गेले आहे, इतके इतके गेले आहे. तुम्ही एकदा सर्वांना धमकी द्या.' मग ते सर्वांना धमकी देत की, 'अरे, असे कसे झाले? असे कसे झाले? मी आलो आहे.' आम्हाला माहीतच असे की उद्यापासून परत चोऱ्या सुरू होतील, आम्हाला हे ज्ञान माहीतच असते. पोलीसवाला धमकी देत असे आणि ते चोरी करत असत. आम्ही हे सर्व होऊ देत असू, असे सर्व चालत असे! पण 'व्यवस्थित'च्या बाहेर काहीही होणार नाही. बारा महिने चोऱ्या होत होत्या पण आमच्याकडे कोणावरही त्याचा परिणाम झाला नाही. रोजच चोऱ्या होत होत्या. आम्ही फक्त जाणून घेत होतो की, बाबा, आज एवढी चोरी झाली.

चोर चोरी करतात, ते तर बिचारे चांगले आहेत. पण हे जे सावकार म्हणवतात ना, ते चोरी करतात, ते जास्त मोठे गुन्हेगार आहेत. त्यापेक्षा तो जो चोरी करतो तो तर चोरच आहे, तो म्हणतो सुद्धा की माझे कामच चोरी करणे आहे.

## शिक्षेचे भान असेल तर गुन्हे थांबतील

**प्रश्नकर्ता :** पण असे केले नाही तर त्याचे पोट कसे भरेल?

**दादाश्री :** पूर्वी आम्हालाही हीच भीती वाटत असे. आम्ही सुद्धा या कलियुगातच जन्म घेतला आहे ना! त्यामुळे 1951 पर्यंत तर अशी भीती वाटत असे, पण मग ही भीती सोडून दिली, कारण सिमेंट काढून घेणे, हे माणसाचे रक्त शोषून घेण्यासारखे आहे आणि लोखंड काढून घेणे, हे त्याचा स्केलेटन (सांगाडा) काढून घेण्यासारखे आहे. स्केलेटन काढला, रक्त काढून घेतले, मग घरामध्ये उरलेच काय?

आपल्याला चोरी करणे शोभत नाही. आपण सावकार बनून चोरी करण्यापेक्षा तर चोर चांगले. आणि जे चोरी करतात त्यांच्यापेक्षा जे भेसळ करतात, ते जास्त गुन्हेगार आहेत. त्यांना हे भानच नसते की 'मी हा जो गुन्हा करत आहे, त्याचे फळ काय मिळेल?' भानच नाही, बेभानपणेच गुन्हे करत असतात.

## हिशोब कळला की चिंता मिटली

आमच्या इथे धंद्यात एकदा असे झाले की एका साहेबाने अचानक दहा हजाराचे नुकसान केले. साहेबांनी आमचे एक काम अचानक नामंजुर केले. त्यावेळी तर दहा हजाराला खूप किंमत होती पण आता तर दहा हजाराला काही किंमतच राहिली नाही! त्या दिवशी तर माझ्या मनावर खूप खोलवर परिणाम झाला. खूप चिंता वाटू लागली होती. पण मग लगेच मला आतून त्याचे उत्तर मिळाले की, या व्यापारात माझी स्वत:ची भागीदारी किती? त्यावेळी धंद्यात आम्ही दोघेच भागीदार होतो, पण मी हिशोब केला की आम्ही दोघे तर कागदावरचे भागीदार आहोत पण वास्तवात किती भागीदार आहेत? वास्तवात तर त्यांची पत्नी, मुले-मुली आणि माझी पत्नी, हे सर्व भागीदारच आहेत ना! मग माझ्या लक्षात आले की या सर्वांना काहीच चिंता वाटत नाही, मग मी एकटाच कशाला सगळे माझ्या डोक्यावर घेऊ? त्या दिवशी या विचाराने मला वाचवले. गोष्ट तर खरीच आहे ना! तुम्हाला काय वाटते? मी बरोबर विचार करतो ना?

**प्रश्नकर्ता :** ज्ञान होण्यापूर्वीची गोष्ट आहे ना?

**दादाश्री :** हो, ज्ञान होण्यापूर्वीची गोष्ट आहे.

## फायदा-नुकसान यांची सत्ता किती?

व्यापाराची दोन मुले, एकाचे नाव नुकसान आणि दुसऱ्याचे फायदा. नुकसानवाला मुलगा कोणाला आवडत नाही, पण हे दोन्हीही एकत्र जन्मलेले असतातच. व्यापारात जर नुकसान होत असेल तर ते रात्री होते की दिवसा?

**प्रश्नकर्ता :** रात्रीही होते आणि दिवसाही होते.

**दादाश्री :** परंतु जर नुकसान होत असेल तर ते दिवसा व्हायला हवे ना? रात्री तर आपण जागे नसतो, मग रात्री कसे नुकसान होते? म्हणजेच नुकसान किंवा फायदा याचे कर्ता आपण नाही. नाहीतर रात्री कसे नुकसान होईल? आणि रात्री फायदाही कसा होईल? शिवाय कधी असे घडत नाही का की, आपण मेहनत करतो तरीही नुकसान होते?

**प्रश्नकर्ता :** हो, असे घडते.

**दादाश्री :** मग मेहनत करून फायदा होतो की मेहनत करून नुकसान होते, हे कसे ठरवायचे?

**प्रश्नकर्ता :** फायदा आणि नुकसान ही कोणाच्या हातातली गोष्ट नाही, ती तर 'व्यवस्थित'च्या हाती आहे.

**दादाश्री :** हो, सर्व काही 'व्यवस्थित शक्ती'च्या ताब्यात आहे. म्हणजे आत 'व्यवस्थित शक्ती' जशी प्रेरणा देते तसेच आपण केले पाहिजे. त्यात जास्त शहाणपणा करून उपयोग नाही. बुद्धीने मोजायला गेले की फायदा होईल की नुकसान तर ते शक्य आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** एखाद्या व्यक्तीला काही आजार झाला असेल आणि तो आजार बुद्धीने मोजायचा प्रयत्न केला तर काय होईल? त्याला असेच वाटेल की आता मी मरणार, आणि एखादा आजारी नसेल आणि त्याला बुद्धीने मोजलेही नाही, तरी देखील तो बिचारा असाच ठसका लागून मरून जातो. असे होते की नाही?

म्हणजेच नुकसान किंवा फायदा असे काही पाहायचे नाही. मग काय पाहायचे? फायदा किंवा नुकसान हे सर्व तर तुम्ही आधीच ठरवून आला आहात, तर आता त्यात भाव टाका किंवा असे काही करा. नुकसान आणि फायद्यामध्ये तर फक्त निमित्त असल्याप्रमाणे, आतील प्रेरणेनुसार आपण वागायला हवे. 'व्यवस्थित'चे उल्लंघन करू नका.

आत जशी प्रेरणा असेल त्यानुसार वागा. नुकसानासाठीही 'व्यवस्थित'च प्रेरणा देत असते आणि फायद्यासाठीही 'व्यवस्थित'च प्रेरणा देत असते, म्हणून आपण प्रेरणेनुसार चालले पाहिजे. कारण फायदा आणि नुकसान हे सर्व 'व्यवस्थित'च्या ताब्यात आहे, मग आता काय करायचे? फुरसतीचा वेळ यात वाया घालवू नका, सत्संगात वेळ घालवा. कारण ती सर्व सत्ता तुमच्या हातातच नाही. हे व्यापारी लोक रात्री कमावत असतील की नाही? रात्री झोपल्यानंतरही ते कमावतात का?

**प्रश्नकर्ता :** कमाई आणि नुकसान तर चालतच राहते ना!

**दादाश्री :** चालतच राहते. तुम्ही नवसारीहून इथे आलात तरी पण तिथे कमाई होत राहील. मोठे आश्चर्यच आहे ना! दिवसा जेवायला बसलात तरी देखील कमाई होतच राहते आणि नुकसान होणाऱ्याचे नुकसान होतच राहते ना? केवढे आश्चर्य आहे! या सर्व वहीखात्यांचा हिशोब काढता येतो, पण या जगाचा हिशोब काढला तर काय निघेल? आम्हाला जगाचा हिशोब काढता येतो. हे 'ज्ञान' होण्यापूर्वी आम्ही हिशोब काढला होता की या जगाचे सार काय आहे? मग आपण उगाच का डोकेफोड करावी? कारण ज्याकरता मेहनत करत आहोत तो सारा माल तर तयारच आहे, नाहीतर लाख मण मेहनत केली तरी काही कामाची नाही, उलट नुकसान होते.

सत्ता कोणाच्या हाती आहे, त्याचे सार काढा! तुम्ही सार काढले आहे का?

**प्रश्नकर्ता :** 'हे' ज्ञान घेतल्यानंतर कळते.

**दादाश्री :** हो, आधी कळणे तर शक्यच नाही ना? सर्वच गोंधळलेले, वहीखातेसुद्धा गोंधळलेले होते. कोणा व्यक्तीच्या बुद्धीने हा हिशोब होईल असे नाहीच. बुद्धी वापरून हा हिशोब करता येईल असे नाही.

**प्रश्नकर्ता :** आपण म्हणता त्या गोष्टी पूर्वी कधीच ऐकल्या नाहीत.

**दादाश्री :** ऐकल्याच नाहीत ना! या गोष्टी कुठे नसतातच. या सर्व अपूर्व गोष्टी आहेत. आधी ऐकले नाही, वाचले नाही, हा वेगळाच प्रकार आहे! आणि म्हणूनच निराकरण होते अन्यथा निराकरण कसे होईल?

आपण मेहनत करतो, चारीबाजूने सर्व काळजी घेतो तरी देखील काही मिळाले नाही, तर आपण समजून घेतले पाहिजे की आपले संयोग सरळ नाहीत. मग जर तिथे अधिक जोर लावला तर उलट नुकसान होईल, त्याऐवजी आपण तेव्हा आत्म्याचे काही करायला हवे. मागील जन्मात ते केले नाही म्हणूनच तर हा सारा घोटाळा आहे. ज्यांनी आपले ज्ञान घेतले आहे, त्यांची तर गोष्टच वेगळी आहे, पण ज्यांना आपले ज्ञान मिळाले नाही, ते देखील भगवंतावर भरवसा ठेवतात ना! त्यांना काय करावे लागते? 'भगवंत जे करतील ते ठीक आहे' असे म्हणतात ना? आणि बुद्धीने मोजायला गेलो तर कधीच ताळमेळ बसणार नाही.

## व्यापाराची शोभा पण नॉर्मालिटीमुळेच

फायदा-नुकसान काहीही आपल्या ताब्यात नाही, म्हणून नॅचरल ॲडजस्टमेंटच्या आधारे चाला. दहा लाख कमावल्यानंतर एकदम पाच लाखाचे नुकसान झाले तर? इथे तर लाखाचे नुकसान देखील सहन करता येत नाही ना! दिवसभर रडारड, चिंता-वरिज् करत राहता! अरे, वेडेसुद्धा होतात! आतापर्यंत मी असे कितीतरी वेडे झालेले पाहिले आहेत! रात्री बारा वाजता, दोन वाजता पण पुरुषार्थ करायचा?

**प्रश्नकर्ता :** मग तर माणूस मेंटल (वेडा) होऊन जाईल.

**दादाश्री :** हो, मेंटल तर झालेच आहेत, आता आणखीन किती मेंटल होणार? सर्व जग मेंटल हॉस्पिटलच बनले आहे ना! म्हणून आता परत मेंटल व्हायचे नाही, कारण डबल मेंटल होता येते का? म्हणजे फायदा-नुकसान आपल्या हातातील गोष्ट नाही. म्हणून तुम्ही तुमचे काम करा आणि जे काही तुमचे कर्तव्य आहे ते पार पाडा.

**प्रश्नकर्ता :** काम करण्याची काही नॉर्मल वेळ तर असली पाहिजे ना?

**दादाश्री :** हो, असली पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** काम करत राहायचे आहे, त्यासाठी आठ किंवा दहा तास ठेवले पाहिजेत. पंधरा-वीस तास नाही.

**दादाश्री :** त्याचा नियम असायला हवा.

**प्रश्नकर्ता :** नोकरी करणाऱ्यांसाठी तर नियम असतात. पण व्यापाऱ्यांसाठी तर नियमच नसतात.

**दादाश्री :** व्यापाऱ्यांनी असा नियम बनवला, तरी रात्री दोन वाजता दुकान उघडे ठेवण्यास त्यांना कोण मनाई करणार? स्टेशन वरून कोणी अचानक आला, तर सिगरेटची दोन पाकीट तर घेऊन जाईल ना! त्याला कोण मनाई करणार? चक्रमपणाचा कधी अंत येतो का? अरे, सिगरेटची दोन पाकीट विकली जावीत म्हणून काय अख्खी रात्र जागायचे?

सर्व लोक जिथे आठ वाजता दुकान उघडतात, तिथे आपण साडेसहा वाजता दुकान उघडून बसलो तर त्याला काही अर्थ नाही. सगळी मेहनत निरर्थक आहे आणि आठ वाजल्यानंतर दुकान उघडणे हे देखील बरोबर नाही. दुपारी सगळेजण दुकान बंद करतात त्यावेळी आपणही बंद केले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** सगळे कारखानेवाले तीन-तीन शिफ्ट चालवतात, ते पाहून इतरही म्हणतात की 'मी सुद्धा तीन शिफ्ट का चालवू नये?'

**दादाश्री :** हो, तीन नाही, पाच चालवा ना!

असे आहे, निसर्गाने देखील आपल्या शरीराची प्रत्येक गोष्ट नीट पाहून सर्व व्यवस्था केली आहे. या दोन कानांपैकी एक एकदम अचानक बंद झाला तर काय होईल? तरी देखील गाडी चालू राहील ना? दोन डोळे, यातील एक बंद झाला तर काय होईल? अशा कितीतरी गोष्टी दोन-दोन ठेवल्या आहेत ना? तसेच फार झाले तर दोन शिफ्ट चालवू शकता. नाहीतर त्याला काही शेवट राहणार नाही!

**प्रश्नकर्ता :** या जंजाळाला शक्य होईल तेवढे नॉर्मल ठेवले पाहिजे.

**दादाश्री :** असे आहे ना, खात-पीत असताना चित्त कारखान्यात जात नसेल तर ठीक आहे, पण त्यावेळी चित्त कारखान्यात जात असेल तर कशाला हवाय तो कारखाना? कारखाना आपले हार्ट फेल करण्याचा उद्योग करत असतो. त्याचा आपल्याला काही उपयोग नाही. म्हणून नॉर्मलिटी समजून घेतली पाहिजे. आता तीन शिफ्ट चालवल्या, तर त्यात हा नवविवाहित आहे, त्याला जर पत्नीला भेटण्यासाठी वेळ मिळाला नाही तर काय होईल? मग अशा तीन शिफ्ट चालवणे योग्य आहे का? लग्न करून नवीनच पत्नी आणली असेल, तर पत्नीच्या मनाचे समाधान तर झाले पाहिजे ना? घरी आल्यावर, पत्नी म्हणेल की, 'तुम्ही तर मला भेटतही नाही, माझ्याशी बोलतही नाही!' हे तर योग्य नाही ना? जगाला योग्य वाटेल असे वागले पाहिजे.

घरात वडिलांबरोबर किंवा दुसऱ्या कोणाबरोबर धंद्यात मतभेद होणार नाहीत, याकरिता तुम्हालाही 'हो ला हो' म्हणावे लागेल की, 'चलती है तो चलने दो.' पण तुम्ही सर्वांनी एकत्र येऊन ठरवले पाहिजे की, 15 लाख जमवल्यानंतर आपल्याला जास्त काही नको. घरातल्या सर्व मेंबर्सची पार्लमेंट बोलावून ठरवले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** हे कोणी मान्य करणार नाही, दादा.

**दादाश्री :** तर मग त्याचा काही उपयोग नाही. सगळ्यांनी मिळून ठरवले पाहिजे.

आपण चार शिफ्ट चालवू, असे म्हटले तर काय तो आयुष्याला 200 वर्षांचे एक्सटेंशन (वाढ) मिळवून देईल?

**प्रश्नकर्ता :** ते तर शक्यच नाही ना!

**दादाश्री :** हे सर्व लक्षात घेतले पाहिजे आणि कमावल्यानंतर परत नुकसान होणार नसेल तर कमावण्याचा उपयोग. इथे तर परत नुकसान होण्याची जोखीम उभीच असते! नुकसान होते की नाही?

**प्रश्नकर्ता :** होते.

**दादाश्री :** तर मग त्यावेळी काय सर्वांनी मिळून रडत बसायचे? दिवसभर *कढापा-अजंपाच,* (राग-क्लेश, कुढत राहणे) काय माहीत कुठे जाणार आहे? कशासाठी करतात हे सर्व? आयुष्याला जसे काही हजार, दोन हजार वर्षांचे एक्सटेंशन मिळाले आहे! तिथे असे एक्सटेंशन करून देतात ना?

**प्रश्नकर्ता :** कोणी करून देत नाही.

**दादाश्री :** मग कशाला? कशासाठी हे सर्व? हो, आपण व्यापार केला पाहिजे. व्यापार करावा, पण पद्धतशीरपणे आणि व्यवस्थित गुजराण होईल एवढाच. गुजराण म्हणजे, आरामात जेवून, अर्धा तास आराम करून मग कामावर जावे. ही अशी धावपळ, धावपळ, धावपळ करण्याची काय गरज आहे? जसे काही दोन हजार वर्षांचे अधिक आयुष्य लिहून आणले आहे? आणि आत्म्यासाठी सुद्धा काहीतरी केले पाहिजे ना? सर्व प्रथम तर आत्म्यासाठीच केले पाहिजे. तुम्ही मागील जन्मात आत्म्यासाठी काहीतरी केले होते म्हणून तर आता तुम्हाला हे सुख आणि शांती लाभली आहे, नाहीतर मजुरी करून करून मरून गेला असता. मागील जन्मात आत्म्यासाठी काही केले होते, त्याचे हे फळ आहे आणि आता परत नव्याने केलेत, तर नंतर त्याचे फळ मिळेल.

## समतेचे ॲडजेस्टमेंट, 'अनामत ठेव'

**प्रश्नकर्ता :** अमुक गोष्टी बोचत नाहीत परंतु जेव्हा काही वस्तू विकल्यावर पाच रुपयांचा फायदा होईल असे आपल्याला वाटत असते तिथे उलट नुकसान होते, तेव्हा मात्र सतत बोचत राहते.

**दादाश्री :** ते नुकसान तर आपण तिथल्या तिथे जमा करून टाकावे, नुकसान खात्यात जमा असे समजून जमा करून टाकावे. आणि वहीखात्यात जमा-उधार केले की वही चोख झाली. असे आहे, की आधीचे सर्व अभिप्राय बनलेले असतात की, 'अशा प्रकारे फायदा मिळेल, तशा प्रकारे फायदा मिळेल' आणि तिथेच नुकसान होते. म्हणून

तुम्हाला हे 'व्यवस्थित' आहे असे म्हणावे लागेल. आणि आता आणखीन काही नुकसान होणार असेल तर, जर ते 'व्यवस्थित'मध्ये असेल तर होईल आणि जर फायदा होणार असेल तर तोही 'व्यवस्थित'मध्ये असेल तर होईल. अर्थात फायदा-नुकसान आपल्या हातात नाही. आपण नाही म्हटले तरीही फायदा होतच राहील.आपण म्हणालो की नाही, आता तर मी या फायद्याला कंटाळलो आहे, तर तेही चालणार नाही. म्हणजे आपण मनाई केली तरीसुद्धा फायद्याचा जोर राहीलच, फायद्याचा जोर आणि तोट्याचा देखील जोर! म्हणून फायदा-तोट्याचा हिशोबच करू नये.

कोणी शेठ माझ्यावर दबाव टाकत राहतात की, 'नाही, तुम्हाला तर विमानाने कलकत्त्याला यावेच लागेल.' मी 'नाही, नाही' म्हटले तरी दबाव टाकतच राहतात, म्हणजे कुठल्याही गोष्टीपासून सुटकाच नाही ना! म्हणून त्याचा हिशोबच करू नका, जास्त किंवा कमी याचा हिशोबच करू नका. ज्या दिवशी नुकसान होईल ना, त्यादिवशी तुम्ही पाचशे रुपये 'अनामत'(रिझर्व निधी)च्या नावे जमा करून टाका. जेणेकरून आपल्याजवळ ठेव, 'अनामत' ठेव राहील. कारण या हिशोबाच्या वह्या काय कायमच्या आहेत? दोन-चार किंवा आठ वर्षांनंतर फाडून टाकत नाहीत का? जर त्या खऱ्या असतील तर कोणी कशाला फाडेल? ही सर्व तर मनाला समजावण्याची साधने आहेत. म्हणून ज्या दिवशी दीडशे रुपयांचे नुकसान झाले असेल त्या दिवशी तुम्ही 500 रुपये 'अनामत' खात्यामध्ये जमा करून टाका. म्हणजे साडेतीनशे रुपयांची ठेव तुमच्याकडे राहिली, म्हणजेच दीडशे रुपयांच्या तोट्याऐवजी साडेतीनशे रुपयांची ठेव जमा झाली असे तुम्हाला वाटेल. हे सर्व जग असे आहे. इथे तर गप्प गुणिले गप्प 144 होतात, बारा गुणिले बारा 144 नाही. बारा गुणिले बारा 144 झाले तर तो एक्झॅक्ट सिद्धांत झाला. संसार म्हणजे (थापेबाजी) गप्प गुणिले गप्प 144 आणि मोक्ष म्हणजे बारा गुणिले बारा 144.

तुमची लाईन तर चांगली आहे, त्यात फार फायदा-नुकसान होण्यासारखे नाही ना! जर नुकसान झाले तर शेजाऱ्याचे होईल, दुकानदाराचे होईल किंवा शेठचे होईल. तुम्ही तर भागीदार नाहीत ना,

म्हणजे भाग्यशालीही व्हायचे नाही किंवा अभागीही व्हायचे नाही, नॉर्मल! आणि जर हे ज्ञान मिळाले नसते तर मनात असे आले असते की मला या जगात कधीही यशस्वी झाल्यासारखे वाटतच नाही, आणि मग सर्वांबरोबर रेस कोर्समध्ये उभे राहावे लागले असते. थोडेही धावता येत नाही आणि रेस कोर्समध्ये उभे राहावे लागले तर तुमची काय अवस्था होईल? आणि वर सर्व धावणाऱ्या घोड्यांची विवंचना देखील तुम्हालाच करावी लागली असती.

म्हणजे तुम्हाला समजले ना? की हे जग एक्झॅक्ट नाही. बारा गुणिले बारा 144 नाही, बारा गुणिले बारा 144 असते, तर त्याला भगवंताचा सिद्धांत म्हटले असते, पण हे जग असे नाही. आमच्या व्यापारात नुकसान झाले तर मी सांगत असे की वीस हजार रुपये अनामतच्या नावाने जमा करा. आणि मग अनामतच्या नावे असलेल्या ठेवीचा हिशोब करायचा. आता ही ठेव ठेवायची कुठे ते तर देवच जाणे! वास्तवात अशी ठेव आहेच कुठे? तरी पण जर अशी ठेव असेल, आणि ती सांभाळून ठेवली असेल आणि कोणी घेऊन गेला तर? म्हणजे कोण कधी घेऊन जाईल त्याचाही पत्ता नाही, कोणाच्या हाताला कसला स्पर्श होईल याचाही पत्ता नाही. मी सांगतो ते तुला समजत आहे ना?

## लक्ष्मी, स्पर्शाच्या नियमाधीन

हे सर्व जग स्पर्शाच्या नियमांच्या आधारे चालते. ही स्पंदने आहेत ना, ती स्पर्शाच्या नियमांच्या आधारावर चालतात. आता हा गार वारा येत आहे, तरी पण त्याच्या स्पर्शाने आतून भाजले जात आहोत असे वाटते. या रुपयांचा स्पर्श होतो, गोडव्याचा स्पर्श होतो, कडवटपणाचा स्पर्श होतो, असे स्पर्श होत नाहीत का? म्हणजे ज्याचा स्पर्श होणार असेल तो होईल.डोक्यांवरच्या या केसांबद्दल तू चिंता करत नाहीस की 'न्हावी भेटला नाही तर काय होणार? न्हावी संपावर गेले तर काय होणार?'

## जिथे अभिप्राय तिथेच त्रास

**प्रश्नकर्ता :** नाही, पण अशा काही गोष्टींकडे तर दुर्लक्षच असते.

**दादाश्री :** नाही, असे आहे की ज्याचा आग्रह धरला नाही त्याचे विचार येत नाहीत आणि ज्याचा आग्रह धरला, ज्याचे अभिप्राय बांधले त्याचेच विचार येतात. या केसांबद्दल तुझे काही अभिप्राय नाहीत म्हणून हे केस वाढले तरी देखील तुला काही वाटत नाही आणि कमी झाले तरी देखील काही वाटत नाही, म्हणजे त्याचा विचारच येत नाही. काही लोकांना तर केसांबद्दल खूप विचार येतात.या स्त्रियांना न्हाव्याबद्दल विचार येतात का? त्यांना केस कापण्याची गरजच नाही ना? त्यामुळे त्याबद्दलचे विचार येतच नाहीत. न्हावी जगो वा मरो, पण त्याबद्दल विचार येतच नाहीत, कारण तसा अभिप्रायच नाही ना! म्हणजे ज्या प्रकारचे अभिप्राय आपण जास्त ठेवले आहेत, तेच सतत त्रास देतात.

## खरे की खोटे, याचा थर्मामीटर कोणता?

**प्रश्नकर्ता :** आम्ही जो व्यापार करतो, त्यात खरे-खोटे पण करावे लागते, मग काय करायला हवे?

**दादाश्री :** खरे आणि खोटे, हे जेवढे तुम्हाला समजते तेवढेच ना? की सगळेच खोटे आहे असे तुम्हाला वाटते?

**प्रश्नकर्ता :** सगळेच तर खोटे नसते ना?

**दादाश्री :** तुम्हाला समजेल तेवढे तुम्ही करा. लहान मुलगा त्याला समजेल तसे करतो आणि मोठा त्याला समजेल तसे करतो, प्रत्येकाला जितके समजते, तेवढेच तो खरे आणि खोटे समजतो. लहान मुलाला हिरा दिला तर हिरा घेऊन बाहेर खेळायला जाईल आणि हिऱ्याच्या बदल्यात कोणी त्याला बिस्किट दिले तर ते घेऊन टाकेल, कारण त्याला समजत नाही ना! तुम्हाला ही खऱ्या-खोट्याची समज कुठून आली?

**प्रश्नकर्ता :** जगरहाटीत लोक म्हणतात ना तसे, किंवा आम्हालाही वाटते की हे चुकीचे आहे. जसे कोणाला खोटे सांगून माल विकला तर ते चुकीचेच म्हणावे लागेल ना?

**दादाश्री :** असे केल्याने तर आपल्याला दु:ख होईल. त्यावेळी आपल्याला आतून वाईट वाटेल, स्वत:च्या लक्षात येईल की हे चुकीचे होत आहे आणि सुख झाले तर स्वत:च्या लक्षात येईल की हे चांगलेच होत आहे. तुम्ही दान देत असाल तर तुम्हाला आतमध्ये सुख वाटेल. तुम्ही तुमचे स्वत:चे पैसे देता तरीदेखील सुखाचा अनुभव येतो, कारण तुम्ही चांगले काम केले म्हणून. चांगले काम केल्यामुळे सुख वाटते आणि वाईट काम केल्यामुळे दु:ख होते. यावरून आपण समजू शकतो की खरे काय आणि खोटे काय!

## 'चुकीचे' बंद करून तर पाहा

**प्रश्नकर्ता :** आता चुकीचे बंद होत नाही, तर त्याकरता आम्ही काय केले पाहिजे?

**दादाश्री :** चुकीचे बंद करता आले पाहिजे ना! पण हे चुकीचे करणे कुठून शिकलात? कोणी शिकवले नाही का?

**प्रश्नकर्ता :** जगरहाटी शिकवते की, 'खरे बोला, चुकीचे करा', पैसे कमावण्यासाठी असे शिकवते ना!

**दादाश्री :** हो, पण ते आपल्याला शिकायचे असेल तर शिकू, शिकायचे नसेल तर नाही शिकणार!

**प्रश्नकर्ता :** जर बिझनेसमध्ये काही चुकीचे करत असू, तर त्यापासून दूर राहण्याचा मार्ग कोणता?

**दादाश्री :** पण चुकीचे करताच कशाला? असे चुकीचे कुठून शिकलात? कोणी चांगले शिकवत असेल तर त्याच्याकडून चांगले शिकून या. हे चुकीचे करणे कोणाकडून तरी शिकून आला आहात म्हणून तर तुम्हाला चुकीचे करता येते. नाहीतर चुकीचे करणे येईलच कसे? आता चुकीचे शिकणे बंद करा आणि चुकीच्या कामांचे सर्व कागद जाळून टाका.

**प्रश्नकर्ता :** पण मग धंदा चालणार नाही, धंद्यात चुकीचे करावेच लागते.

**दादाश्री :** धंदा चालला नाही तर त्यात तुमचे काय नुकसान आहे ?

**प्रश्नकर्ता :** धंदा चालला नाही तर पैसे मिळणार नाहीत आणि आम्हाला जगात राहायचे आहे.

**दादाश्री :** तुम्हाला काय माहीत की चुकीचे केले नाही तर धंदा होणार नाही ? याचा सगळा फोरकास्ट (अंदाज) आहे का तुमच्याकडे ? फोरकास्टशिवाय तुम्ही कसे म्हणू शकता की तुमचे चालणार नाही ? म्हणूनच काही दिवसांसाठी तरी हे जे चुकीचे करत आहात त्याच्या उलट करा. करून तर पाहा, मग समजेल की धंद्यावर काय परिणाम होतो ! गिऱ्हाईक आले आणि त्याने विचारले 'की याची किंमत काय आहे ?' तेव्हा सांगा 'अडीच रुपये.' मग तो विचारेल, 'साहेब याची खरी किंमत किती आहे ?' तेव्हा तुम्ही खरे सांगा की, 'बाजारात हे घ्यायला गेलात तर त्याची खरी किंमत पावणे दोन रुपये आहे.' असे तुम्ही एकदा म्हणून तर बघा, नंतर काय होत आहे ते पाहा.

**प्रश्नकर्ता :** मग तर आमच्याकडून कोणी माल घेणारच नाही.

**दादाश्री :** तो घेईल किंवा नाही, हे तुम्हाला कसे कळले ? तुम्हाला फोरकास्ट झाला होता का ? लोक तर असे करतात जसे काही त्यांना भविष्यातले सर्व काही दिसते. त्याने घेतले नाही तर दुसरा ग्राहक घेऊन जाईल, नाहीतर तिसरा घेऊन जाईल ! कोणीतरी घेणारा भेटेलच ना ?

## फायदा तर नाहीच, उलट धोका ओढवून घेतला

व्यापारात तुम्हाला प्रयत्न करत राहिले पाहिजे, 'व्यवस्थित शक्ती' आपोआप सर्व जमवून घेईल. पण तुम्हाला फक्त प्रयत्न करत राहायचे आहे, त्यात आळस करू नका. भगवंतांनी सांगितले आहे की सर्व काही 'व्यवस्थित'च आहे. जर पन्नास हजार किंवा एक लाखाचा फायदा होणार असेल, तर कितीही लबाडी केली तरी एक पैसा देखील वाढणार नाही, उलट लबाडी केल्यामुळे पुढल्या जन्माचा हिशोब बांधला जाईल तो वेगळाच !

**प्रश्नकर्ता :** पण व्यापारात लबाडी केल्याशिवाय चालतच नाही ना!

**दादाश्री :** भगवंतांनी काय सांगितले आहे की, 'जेवढे 'व्यवस्थित'मध्ये आहे तेवढेच तुला मिळेल, लबाडी केल्याने तर कर्मे बांधली जातील आणि एका पैशाचाही फायदा वाढणार नाही!' एखाद्या व्यक्तीने लबाडी केल्याशिवाय व्यापार केला आणि त्याच व्यक्तीने पुढल्या वर्षी लबाडी करून व्यापार केला तरी फायदा तेवढाच राहील आणि लबाडी केल्याने कर्म बांधले जाईल ते वेगळेच. म्हणून अशी लबाडी करू नका. लबाडी केल्याचा काही फायदा नाही पण अमर्याद नुकसान मात्र आहे. लबाडीचा काही उपयोग होत नाही आणि पुढच्या जन्माची जबाबदारी ओढवून घेतली जाते. भगवंतांनी लबाडी करण्याची मनाई केली आहे. आता तर कोणी लबाडी करतच नाही ना?

**प्रश्नकर्ता :** सगळेच करतात, दादा.

**दादाश्री :** असे! काय सांगताय? पण जाणूनबुजून लबाडी करू नका. लबाडी बाबत बोललेले तुम्हाला समजले ना?

**प्रश्नकर्ता :** लोभाची गाठ आहे त्यामुळे लबाडी होते, असेच ना?

**दादाश्री :** लोभाची गाठ तर लोकांमध्ये असतेच, पण लबाडी कदाचित नसेलही. या काळात लबाडी तर दुसऱ्यांकडून शिकतात. लबाडी हा संक्रमित होणारा रोग आहे. दुसऱ्यांना लबाडी करताना पाहतात आणि स्वत: देखील लबाडी करायला लागतात. तुम्हाला लबाडी करावी लागते का?

**प्रश्नकर्ता :** मला त्याची गरज पडत नाही. लबाडी करणे आणि कपट, यात काय फरक आहे?

**दादाश्री :** कपट अशी गोष्ट आहे की, ते समोरच्यालाही कळत नाही आणि स्वत:लाही कळत नाही की कपट होत आहे; पण लबाडी मात्र लक्षात येते, स्वत:च्या लक्षात येते आणि दुसऱ्यांच्याही लक्षात येते.

**प्रश्नकर्ता :** आपल्याशी कोणी लबाडी केली तर आपणही त्याच्याशी लबाडी केली पाहिजे ना, सध्या तर लोक असेच करतात.

**दादाश्री :** लबाडीचा रोग असाच पसरतो ना! पण ज्याला 'व्यवस्थित'चे ज्ञान हजर असेल. तो धीर धरू शकतो. तुमच्याशी कोणी लबाडी करायला आला तर तुम्ही मागील दरवाजाने निघून जा पण तुम्ही त्याच्याशी लबाडी करू नका.

## हिशोबानुसार वाटणी, त्यात लुडबुड कशाला?

माणसाने कमाई करण्याची फार घाई करू नये. कमाई करण्यात आळस केला पाहिजे. घाई करू नये. कारण 1978 मध्ये कमाई करण्याची घाई केली तर 1988 मध्ये आपल्याकडे जेवढा पैसा येणार असेल तेवढा 1978 मध्येच मिळून जाईल. उद्दीरणा होऊन जाईल. मग 1988 मध्ये काय कराल? म्हणून अति धन कमवायची खटपट करू नये. आपण निश्चिंतपणे आणि शांतपणे व्यापार केला पाहिजे. या काळात जेवढी नीतिमत्ता ठेवता येईल, तेवढी भावपूर्वक ठेवत राहावी. हाय-हाय कोण करतो? तर ज्याला अन्न किंवा दुसऱ्या कशाची तरी कमतरता असते तो हाय-हाय करतो. अन्न कमी पडेल अशी वेळ तर तुमच्यावर येणार नाही ना! कपडे कमी पडतील अशी वेळ येते का?

## व्यापार न्याय-नीतीने केला पाहिजे

तुम्हाला व्यापार करायचा असेल तर आता निर्भयतेने करत राहा, कसलीही भीती बाळगू नका आणि न्यायाने व्यापार करा. जितका शक्य असेल, पॉसीबल असेल, तितका न्यायाने व्यापार करा. नीतीच्या मर्यादेत राहून जेवढे शक्य होईल तेवढे करा, जे शक्य नसेल ते करू नका.

**प्रश्नकर्ता :** नीतीची मर्यादा कशी ठरवायची?

**दादाश्री :** नीतीची मर्यादा याचा अर्थ तुम्हाला समजावतो. इथे मुंबईत एक व्यापारी होते, जेव्हा गव्हाचे भाव खूप वाढत असत, तेव्हा हे व्यापारी एक वॅगन इंदुरी गहू मागवत असत आणि एक वॅगन रेती

मागवत असत, दोन्ही एकत्र करून मग पोत्यात भरत असत. बोला, आता ही काय नीतिमत्ता झाली?

**प्रश्नकर्ता :** पण नीती–अनीती यातील भेद तर खूप सूक्ष्म आहेत. ते समजतच नाहीत.

**दादाश्री :** इतर कुठल्या गोष्टींमध्ये आपल्याला अनीतीकडे लक्ष द्यायची गरज नाही, परंतु माणसाच्या खाण्याच्या ज्या वस्तू आहेत, माणसाच्या शरीरात जाणाऱ्या ज्या वस्तू आहेत, भोजन किंवा औषधे, यासाठी मात्र नियमांकडे खूपच लक्ष दिले पाहिजे. असे आहे की तुम्ही फसवून 40 किलो ऐवजी सदतीस किलो दिलेत, पण शुद्ध दिलेत तर तुम्ही गुन्हेगार नाहीत किंवा कमी गुन्हेगार आहात. आणि जर कोणी 40 किलो पूर्ण देत असेल, पण भेसळ करून देत असेल तर तो मात्र गुन्हा आहे. माणसाच्या खाण्याच्या वस्तूत भेसळ होता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** मी तर व्यक्तिगत रीत्या मानतो की ज्यामुळे आपल्या आत्म्याला दुःख होईल असे काम करू नये.

**दादाश्री :** ज्यामुळे तुमच्या आत्म्याला दुःख होते, ते काम करू नये. आता तर माणसाच्या शरीराला दुःख होईल अशा प्रकारे भेसळ करतात, दुधामध्ये भेसळ, तेलामध्ये भेसळ, तुपामध्ये भेसळ, हल्ली तर अशी कितीतरी (पदार्थांमध्ये) भेसळ करतात. हे सर्व व्हायला नको.



# [ 20 ]
# नियमात राहून अनीती

## नियमपूर्वक अनीती, पण तरी मोक्ष प्राप्ती

**प्रश्नकर्ता :** आप्तसूत्रांमधील 1936 नंबरचे सूत्र आहे, 'व्यवहारमार्गात असलेल्याला आम्ही सांगतो की पूर्णपणे नीतीचे पालन कर, ते जमत नसेल तर नियमपूर्वक नीतीचे पालन कर, तेही जमत नसेल आणि अनीती केलीच तरी नियमात राहून कर. नियमच तुला पुढे घेऊन जाईल.' हे जरा आपल्याकडून समजावून घ्यायचे आहे,

**दादाश्री :** या पुस्तकात, आप्तसूत्रांत लिहिलेली सर्व वाक्य त्रिकाळ सत्य आहेत. या वाक्यामध्ये मी काय म्हटले आहे की, पूर्णपणे नीतीने वाग. मग दुसरे वाक्य काय म्हणते की ते जमत नसेल तर नीतीचे थोडे तरी पालन कर आणि नीतीचे पालन होत नसेल तर अनीतीचे पालन करू नकोस. आणि अनीतीचे पालन करायचे असेल तर नियमात राहून अनीतीचे पालन कर. म्हणजे इतकी सर्व सूट दिली आहे ना? अनीतीचे पालन करण्याची सूट या जगात फक्त मीच दिली आहे. म्हणजे अनीतीचे पालन करायचे असेल तर ते नियमपूर्वक करा, असे म्हटले आहे. तुम्हाला समजले नाही का?

यात असे म्हटले आहे की जर शक्य असेल तर पूर्णपणे नीतीचे पालन करा आणि पालन होत नसेल तर असे ठरवा की दिवसातून मला

निदान तीन वेळा तरी नीतीचे पालन करायचेच आहे. आणि जर नियमात राहून अनीती केली तर ती देखील नीतीच आहे. जो मनुष्य नियमात राहून अनीती करतो त्याला मी नीती म्हणतो. भगवंतांच्या प्रतिनिधीच्या रूपात, वीतरागींच्या प्रतिनिधीच्या रूपात, मी म्हणतो की अनीतीसुद्धा नियमात राहून कर, तो नियमच तुला मोक्षाला घेऊन जाईल. अनीती कर किंवा नीती कर, त्याबद्दल माझी काही तक्रार नाही, पण जे करायचे ते नियमात राहून कर. संपूर्ण जगाने जे ठामपणे नाकारले आहे, त्याबद्दल आम्ही म्हणतो की त्याला काही हरकत नाही, तू तुझ्या नियमात राहून कर.

सध्या कलियुग आहे तर लोक म्हणतील की, 'साहेब मला हे जमणार नाही, नीतीचे पालन होत नाही.' तेव्हा मी सांगतो की, 'मग नियमपूर्वक पालन कर, दिवसातून दोन किंवा तीन वेळा नीतीचे पालन कर आणि बाकी अनीती कर. तू ठरव की मला रोज दोन किंवा तीन वेळा तरी नीतीचे पालन करायचे आहे. मग जा, तुझ्या मोक्षाची गॅरंटी आम्ही लिहून देतो.'

नीतीचे पालन होत नसेल तर काय फक्त अनीतीचेच पालन करत राहायचे? नाही. ते तर बिलकुल उलटे झाले. म्हणूनच आम्ही म्हटले आहे की अनीतीचे पालन देखील जर तू नियमपूर्वक केलेस तर मोक्षाला जाशील. सर्व जग सांगते की, 'नीतीचे पालन केले तर मोक्षाला जाशील.' याउलट मी म्हणतो की, 'अनीतीचे पालन देखील जर तू नियमपूर्वक केलेस तर मोक्षाला जाशील.' हे असे विचित्र कोणी सांगेल का?

**प्रश्नकर्ता :** दादा, नियमात राहून अनीतीचे पालन कसे करायचे? हे जरा उदाहरण देऊन समजावा ना!

**दादाश्री :** हो, ते तुम्हाला समजावून सांगतो. एका शेठचे कपड्यांचे दुकान होते, ते कापड असे खेचून खेचून देत असत. तेव्हा मी विचारले की 'असे का करता?' तर म्हणाले 'चाळीस मीटर मधले एवढे कापड वाचते.' मी विचारले की, 'याची शिक्षा काय मिळेल, हे माहीत आहे का? अधोगतीला जावे लागेल! चाळीस मीटरचे पैसे घेतले तर आपण

चाळीस मीटर दिले पाहिजे. त्यात खेचण्याची गरज नाही.' त्यावर ते म्हणाले, 'मग तर आम्हाला हवा तसा फायदा मिळणार नाही.' मग मी म्हटले की 'भाव थोडा जास्त ठेवा.' तर म्हणाले, 'ग्राहक दुसरीकडे निघून जातो, त्यामुळे जास्त भाव घ्यायचा असेल तरी घेता येत नाही ना!'

आपण याला अनीती म्हणतो. आता जर काळाबाजार करायचा असेल, पण जेवढे कमी पडत असतील तेवढेच, दिवसभरात दहा-पंधरा रुपयेच जास्त घेतो. आणि दुसरे पंचवीस जास्त आले तरी तो घेत नाही, तर ती अनीती झाली, पण नियमपूर्वक झाली असे म्हटले जाईल. म्हणूनच म्हटले आहे ना की अनीती करावी लागली तरी ती नियमपूर्वक करा.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ असा झाला की तू पैसे जास्त घे पण माल कमी देऊ नकोस?

**दादाश्री :** नाही, आम्ही असे म्हणत नाही. आम्ही तर असे म्हटले आहे की अनीती कर पण नियमात राहून कर. एक नियम ठेव की मला एवढीच अनीती करायची आहे, यापेक्षा जास्त नाही. दुकानातून रोज दहा रुपये जास्त घ्यायचे आहेत, त्याहून अधिक जरी पाचशे रुपये आले, तरी मी घेणार नाही.

असे समजा की एक इन्कमटॅक्स ऑफिसर आहे, त्याची बायको रोज तक्रार करीत राहते की, 'या सर्वांनी लाच घेऊन घेऊन बंगले बांधले आणि तुम्ही लाच घेत नाही. तुम्ही तसेच्या तसेच राहिलात.' कित्येक वेळा तर त्याला मुलांच्या शाळेची फी देखील उधार घेऊन भरावी लागत असे. त्याला मनात वाटे की दोन-तीनशे रुपये कमी पडतात, तेवढे मिळाले तर मला शांती वाटेल. पण तो लाच घेऊ शकत नाही, मग काय करणार? आणि ते देखील मनाला बोचत असते ना! मग आम्ही त्याला म्हणतो की, 'लाच घ्यायची असेल तर तू ठरव की मी महिन्याला पाचशे रुपयांपेक्षा जास्त (लाच) घेणार नाही. मग जरी दहा हजार रुपये आले तरी मला नकोत.' तुला महिन्याला जितके कमी पडत असतील तेवढेच घ्यायचे तू ठरव. म्हणजेच ही तू अनीती करत

आहेस पण नियमात करत आहेस. नियमात राहून अनीती करता येते आणि नियमात राहून अनीती केली तर माझी त्याला हरकत नाही. हा नियमच तुला मोक्षाला घेऊन जाईल आणि त्याची जोखीम तुझ्यावर नाही, पण नियमात राहून केले तर खूप झाले. अनीती देखील नियमात राहून केली तर खूप मोठी गोष्ट आहे, अनीती करताना नियम पाळणे खूप कठीण आहे. कारण एकदा अनीती केली की ती वाढतच जाते, परंतु जर ती अनीती नियमात राहून केली तर त्याचे कल्याण होईल.

हे आमचे गूढ वाक्य आहे. हे वाक्य समजले तर कामच होऊन जाईल ना! भगवंत देखील खुश होऊन जातील कारण हा दुसऱ्याच्या ताटातील खातो पण मर्यादा ठेवून खातो. एरवी तर दुसऱ्याच्या ताटातील खाण्यामध्ये मर्यादाच राहत नाही ना!

अनीतीत सुद्धा नियम ठेवा, हे तुम्हाला समजते ना? मी काय म्हणतो, की 'तुला लाच घ्यायची नाही आणि तुला पाचशे रुपये कमी पडत आहेत, तर तू कुठपर्यंत कुढत राहणार?' लोकांकडून मित्रांकडून उधार घेतोस त्यात तर उलट जास्त जोखीम ओढवून घेत आहेस. म्हणून मी त्याला समजावतो की', तू अनीती कर पण नियमात राहून कर.' आणि जो नियमात राहून अनीती करतो तो तर नीतीवानापेक्षाही श्रेष्ठ आहे. कारण नीतीवानाच्या मनात तर रोग उत्पन्न होतो की, 'मी कोणीतरी आहे', पण नियमात राहून अनीती करणाऱ्याच्या मनात हा रोग उत्पन्न होत नाही.

असे तर कोणी शिकवणारच नाही ना! नियमात राहून अनीती करणे हे तर खूप मोठे कार्य आहे.

जर अनीती देखील नियमात राहून असेल तर त्याचा मोक्ष होईल, परंतु जो अनीती करत नाही, जो अजिबात लाच घेत नाही, त्याचा मोक्ष कसा होईल? कारण जो लाच घेत नाही, त्याला 'मी लाच घेत नाही', असा कैफ असतो. भगवंत सुद्धा त्याला बाहेर हाकलून काढतील, म्हणतील, 'चल जा, तुझे तोंड वाईट दिसत आहे, त्यापेक्षा जो पाचशे रुपये लाच घेतो त्याचे तोंड बरे दिसत आहे.' याचा अर्थ असा नाही

की आम्ही लाच घ्यायला सांगत आहोत, परंतु तुला अनीती करायचीच असेल तर तू नियमात राहून कर. नियम ठेव की 'बाबा, मला पाचशे रुपयांचीच लाच घ्यायची आहे. पाचशे रुपयांपेक्षा जास्त दिले, अरे, अगदी पाच हजार जरी दिले तरी पण घ्यायचे नाही. जेवढे मला घर खर्चात कमी पडतात तेवढेच, म्हणजे पाचशे रुपयांचीच लाच घेईन. म्हणजे अशी जोखीमदारी तर फक्त आम्हीच घेतो. कारण अशा काळात लोकांनी लाच घेतली नाही तर काय करतील बिचारे? तेल, तूप यांचे भाव किती वाढले आहेत, साखरेचे भाव किती जास्त झाले आहेत! आणि मुलांच्या फीचे पैसे दिले नाही तर चालेल का? बघा ना, तेलाचे भाव सतरा रुपये झालेत, असे सांगतात ना?

**प्रश्नकर्ता :** हो, बरोबर आहे.

**दादाश्री :** व्यापारी काळाबाजार करतात ते चालते, पण या नोकरांची बाजू घेणारा कोणीच नाही ना? म्हणूनच आम्ही सांगतो की लाच देखील नियमपूर्वक घ्या, तो नियमच तुम्हाला मोक्षाला घेऊन जाईल. लाच घेणे बाधक नाही तर त्यात नियम नसणे हे बाधक आहे.

**प्रश्नकर्ता :** पण अनीती करणे हे तर चुकीचेच आहे ना?

**दादाश्री :** तसे तर ते चुकीचेच आहे! पण भगवंतांच्या घरी वेगळ्या प्रकारची व्याख्या आहे. भगवंतांकडे अनीती किंवा नीती याबाबत काही वाद नाही. तिथे तर अहंकाराला हरकत आहे. नीती पाळणाऱ्याला फार अहंकार असतो, त्यामुळे त्याला दारू न पिताच धुंदी चढलेली असते.

**प्रश्नकर्ता :** पण नेहमीच तसे होत नाही ना?

**दादाश्री :** नाही. कारण त्याशिवाय नीतीचे पालन करताच येणार नाही ना! धुंदीतच नीतीचे पालन करतो आणि त्याची धुंदी सतत वाढतच राहते. असे असूनसुद्धा तो धुंदीत राहून का होईना पण नीतीचे पालन करतो, त्यामुळे चांगले पुण्यबंधन होते आणि चांगली गती मिळते. त्याला चांगले लोक, संत वगैरे भेटतात, पुढे जाऊन ज्ञानींचीही भेट होते. म्हणजे

ते चुकीचे नाही. ते चुकीचे आहे असे मी म्हणतही नाही. पण भगवंतांच्या घरी तर अहंकार बाधक आहे.

आता जो नियमात राहून अनीती करतो, त्याच्यात अहंकार नसतो. आणि जो पाच हजार रुपये आले तरी तो घेत नाही, तर काय त्याला प्रामाणिकपणा म्हणता येईल का? नाही. म्हणजे जो नियमात राहून लाच घेतो, ती काही साधीसुधी प्रामाणिकता नाही. कारण एखादी व्यक्ती उपवास करत असेल तर ती भुकेली राहू शकते, परंतु जर त्याला म्हटले की आज तीनच घास खायचे आहेत, चौथा घास खायचा नाही. तर तो असा कंट्रोल करू शकत नाही, एकदा खाल्ल्यानंतर तो थांबूच शकत नाही. ते तर मग पोट भरल्यावर आपोआप थांबते. हे तुम्हाला समजत आहे ना?

म्हणजेच ज्याने नियमपूर्वक अनीती केली त्याचा मोक्ष नीतीवानाच्या आधी होतो. कारण नीतीवान नीतीने वागण्याच्या धुंदीत असतो की', मी जन्मभर नीतीचे पालन केले आहे' आणि तो प्रत्यक्ष भगवंतालाही जुमानत नाही. याउलट जो अनीती करतो त्याची धुंदी तर उतरलेलीच असते ना! त्याला धुंदी चढतच नाही. कारण त्याने जी अनीती केली ती त्याला आतून टोचत असते. आणि जे पाचशे रुपये घेतले त्याची धुंदीही त्याला चढत नाही. खरी धुंदी तर नीतीवानाला चढते आणि त्याला थोडे जरी छेडले की आपल्याला लगेच कळते, लगेच फणा काढून उभा राहतो. कारण त्याच्या मनात असे असते की, 'मी काहीतरी केले आहे, जन्मभर मी नीतीचे पालन केले आहे.'

**प्रश्नकर्ता :** आता पाचशे रुपयांची लाच घेण्यासाठी सूट दिली, त्यानंतर जसजशी गरज वाढत जाईल तशी त्याने रक्कम वाढवत नेली तर?

**दादाश्री :** नाही. नियम तर एकच. पाचशे म्हणजे पाचशेच, मग त्या नियमातच राहावे लागेल.

एक व्यक्ती दारू न पिण्याचा अहंकार करते आणि दुसरी व्यक्ती

दारू पिण्याचा अहंकार करते, तर मोक्ष कोणाचा होईल? भगवंत दोघांनाही हाकलून काढतील! भगवंत काय म्हणतात, 'आमच्या इथे निर्‌हंकारीची गरज आहे.' भगवंत म्हणतात की, नीतीचे पालन तर तुला 'संसारात सुख मिळावे यासाठी करायचे आहे. आम्हाला नीती-अनीतीचे काही वावडे नाही. तुला दुःख सहन करता येत असेल तर अनीतीने वाग.' अनीतीने दुःखच मिळते ना? कोणाला दुःख दिल्यानंतर आपल्यालाही दुःखच मिळते. तुला सुख मिळावे म्हणून नीतीने वागायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** पण मग त्याला अनीतीची सवय लागेल ना?

**दादाश्री :** सवय लागेल, असे? नाही. म्हणूनच म्हटले आहे ना की अनीती करा पण नियमपूर्वक करा. कुठलीही गोष्ट नियमपूर्वक केली आणि ती सुद्धा 'ज्ञानी पुरुषां'च्या आज्ञेनुसार केली तर मोक्षाचे काम होऊन जाईल.

**प्रश्नकर्ता :** त्याला अनीतीची सवय पडली की मग तो नियमात राहू शकणार नाही ना?

**दादाश्री :** मग त्याला काही अर्थ राहत नाही ना! आणि ती आमची जबाबदारीही नाही ना! म्हणूनच सांगितले ना, की तुला पाचशे रुपये कमी पडत असतील तर तू पाचशे रुपयांची लाच घे. मग जरी कोणी पाच हजार रुपये दिले तरी तुला पाचशेपेक्षा जास्त घ्यायचे नाहीत. अशा प्रकारे जो नियमात राहील तो मुक्त होईल, त्याचे निवारण होईल.

**प्रश्नकर्ता :** जर कोणी नियमात राहून लाच घेईल तर त्याला लोभ होणारच नाही ना?

**दादाश्री :** अरे! हा नियम तर त्याला थेट मोक्षापर्यंत घेऊन जाईल आणि लोभ तर एकदम नाहीसाच होईल. आणि असे करणे शक्य आहे. असे करू शकतो.

**प्रश्नकर्ता :** आणि जर कोणी लाच घेतच नसेल तर त्याचे काय होईल?

**दादाश्री :** तो भरकटला जाईल. लाच मिळत आहे आणि घेतली नाही म्हणून त्याचा अहंकार वाढत जाईल. आणि तो (लाच घेणारा) नियमपूर्वक म्हणजे घर खर्चात जितके कमी पडतात तेवढेच घेतो. मग जरी कोणी पाच हजार रुपये दिले तरी पण तो घेत नाही. पाचशेपेक्षा एक पैसाही अधिक नाही. जर अशा नियमात राहिला तर त्याचा मोक्ष होईल.

सध्या मनुष्य या सर्व अडचणीतून कसे दिवस काढू शकेल? आणि त्याला जितके पैसे कमी पडत असतील तेवढे मिळाले नाहीत तर काय होईल? लाच न घेणाऱ्यासमोर समस्या उभी राहील की पैसे कमी पडत आहेत, ते कुठून आणू? पण नियमपूर्वक अनीती करणाऱ्याला तर जेवढे कमी पडतात तेवढे मिळून जातात, म्हणजे त्याचेही कोडे सुटले ना! नाहीतर अशा परिस्थितीत माणूस चुकीच्या मार्गाने जाईल आणि मग तो पूर्णपणे लाच घेऊ लागेल. त्यापेक्षा हा मधला मार्ग काढला आहे आणि त्यात अनीती केली तरी पण ती नीती म्हटली जाईल. आणि त्यालाही सोपे होईल, ती नीती म्हटली जाईल, आणि त्याचे घरही चालेल.

आम्ही काय सांगितले आहे की तू खोटे बोलूच नकोस आणि जर तुला खोटे बोलायचेच असेल तर नियमात राहून बोल की मला आज पाच वेळाच खोटे बोलायचे आहे, सहाव्यांदा मी खोटे बोलणार नाही, तर तू मोक्षाला जाशील. मग जेव्हा पाच वेळा खोटे बोलून झाले असेल, त्यानंतर जर त्याच्या बहिणीचा चारित्र्य विषयक काही दोष झाला असेल, आणि कोणी त्याला विचारले की, 'तुमच्या बहिणीच्या बाबतीत जे ऐकले ते खरे आहे का?' तेव्हा त्या व्यक्तीचे पाच वेळा तर खोटे बोलून झाले आहे, आणि आता सहावे खोटे बोलता येणार नाही, म्हणून त्याला 'हो, हे खरे आहे' असेच म्हणावे लागेल. जर पाच वेळा खोटे बोलण्याची मुभा संपली नसती, तर पाचवी वेळ इथे वापरता आली असती, पण पाच वेळा खोटे बोलण्याची मुभा संपली! याला नियमपूर्वक केलेली अनीती असे म्हणतात.

एखादा चोर चोरी करतो, परंतु जर नियमात राहून चोरी केली तर तो नियम त्याला मोक्षाला घेऊन जाईल. नियमात राहून चोरी करणे म्हणजे काय की, त्याला महिन्यातून दोन वेळा चोरी करण्याची परवानगी दिली आहे. आता पहिल्यावेळी हात मारला तर त्याला दहा रुपये मिळाले, परत हात मारला तर चाळीस रुपये मिळाले. म्हणजे चाळीस आणि दहा असे पन्नास रुपये एका महिन्यात मिळाले. आता जर त्याने पहिला हात मारला नसता तर कदाचित त्याला तीनशे रुपये मिळाले असते, पण दोन वेळा झाले म्हणून आता घेऊ शकत नाही. त्याने कोणाच्या तरी खिशात हात घालून पाहिले की हे तर तीनशे रुपये आहेत, पण लगेचच त्याच्या लक्षात आले की हे मी चुकीचे करत आहे, माझ्याकडून दोन वेळा तर चोरी झालेली आहे, म्हणून त्याने सोडून दिले. तर याला नियमपूर्वक अनीती म्हटले आहे.

खरे तर मुळात मला काय सांगायचे आहे, हे जर समजले तर कल्याण होईल. प्रत्येक वाक्यात मला काय सांगायचे आहे ते जर पूर्णपणे समजले तर कल्याण होईल. परंतु जर कोणी ही गोष्ट स्वतःच्या भाषेत समजण्याचा प्रयत्न केला तर काय होणार? प्रत्येकाची भाषा स्वतंत्रच असते, म्हणून तो स्वतःच्या भाषेत नेऊन फीट करतो, पण 'नियमात राहून अनीती कर' याचा अर्थच त्याला समजणार नाही.

**प्रश्नकर्ता :** दादा, मी देखील जेव्हा हे पहिल्यांदा वाचले तेव्हा विचारात पडलो की हे काय आहे? दादांना काय सांगायचे आहे? नंतर मला समजले की हे तर खूपच अजब वाक्य आहे.

**दादाश्री :** हो, अक्रम विज्ञान म्हणजे काय की, ज्यात निगेटिव्ह पॉलिसीच नाही ते. 'तुम्ही चोरी का करता, तुम्ही खोटे का बोलता? वाईट का वागता?' अशी नेगेटिव्ह पॉलिसीच नाही.



# [ 21 ]
# कला, जाणूनबुजून फसवून घेण्याची

## ...तिथे 'ज्ञानी' जाणूनबुजून स्वतःला फसवून घेतात

लोक बुद्धीचा उपयोग करत असतील की नाही? सर्व दुकानदारांनी हाच उद्योग केला आहे ना! आमच्यासारखे कोणी काही खरेदी करायला गेले तर 'या साहेब, या साहेब' करत दोन-तीन रुपये जास्तच पळवतात आणि आम्ही देतो सुद्धा. आमच्या लक्षात येते की हा लोभी आहे. एकदा एका दुकानात शिरल्यावर, त्या दुकानातून जे घ्यायचे ते घेतल्याशिवाय आम्ही बाहेर पडत नाही. नाहीतर 'या साहेब, या साहेब' ही त्याची मेहनत वाया जाईल. त्याची मेहनत वाया जाईल असे काही आम्ही करत नाही. मग आम्ही त्याच्याकडून फसवले गेलो तरी चालेल. आम्ही जाणतो की ही क्वॉलिटी अशी आहे, आम्ही त्याला ओळखून असतो. आता तर आम्हाला दुकानातून काही खरेदी करण्याचे राहिलेच नाही ना! दुकानात जायचे नाही आणि खरेदी पण करायची नाही, काही राहिलेच नाही ना!

जे कुठेही फसवले जात नाहीत ते ज्ञानी. मग कुठे फसवले जातात? तर जाणूनबुजून! ज्ञानींच्या लक्षात येते की हा चांगला माणूस आहे, बिचारा अडचणीत आहे, तर याला 'लेट गो' करावे.

## फसवले गेले, पण कषाय होऊ नये यासाठी

माझ्या भागीदाराने मला एकदा म्हटले की 'लोक तुमच्या

भोळेपणाचा फायदा घेतात.' तेव्हा मी त्यांना म्हटले की तुम्ही जर मला भोळे समजत असाल तर तुम्हीच भोळे आहात. मी जाणूनबुजून फसत असतो. मग ते म्हणाले की, 'आता मी परत असे बोलणार नाही.' माझ्या लक्षात येते की या बिचाऱ्याची मती (बुद्धी) अशी आहे, याची दानत अशी आहे. म्हणून याला जाऊ द्या, 'लेट गो' करा ना! आम्ही तर कषायातून मुक्त होण्यासाठी आलो आहोत. कषाय होऊ नयेत म्हणून आम्ही मुद्दामच फसतो, परत परत फसतो. जाणूनबुजून फसण्यात मजा आहे की नाही? जाणूनबुजून फसणारे तर कमीच असतात ना?

**प्रश्नकर्ता :** नसतातच.

**दादाश्री :** लहानपणापासूनच माझे 'प्रिन्सिपल' (सिद्धांत) होते की जाणूनबुजून फसायचे. नाहीतर कोणी मला मूर्ख बनवेल आणि माझी फसवणूक करील या गोष्टीला काही अर्थ नाही. तर असे जाणूनबुजून फसल्यामुळे काय झाले? ब्रेन टॉपवर (मेंदु शिखरावर) पोहोचला. मोठमोठ्या जज लोकांचा ब्रेनसुद्धा करू शकणार नाही, असे काम करायला लागला. तसे तर जज सुद्धा जाणूनबुजून फसवले गेलेले असतात. आणि जाणूनबुजून फसवले गेल्यामुळे ब्रेन टॉप वर पोहोचतो. पण तू मात्र असा प्रयोग करू नकोस. तू तर ज्ञान घेतले आहेस ना? ज्याने ज्ञान घेतले नसेल त्याने असा प्रयोग करावा.

म्हणजे जाणूनबुजून फसायचे आहे, पण असे कोणाकडून जाणूनबुजून फसावे? तर ज्याच्याबरोबर रोजचा व्यवहार असेल, त्याच्याकडून. आणि बाहेरही कोणाकडून फसवून घ्या पण जाणूनबुजून. त्याला वाटेल की मी यांना फसवले आणि आपल्याला कळेल की हा मूर्ख बनला.

## खरेदी, पण फसवले जाऊन...

**प्रश्नकर्ता :** आपण जाणूनबुजून फसवले गेले असाल, असे एखादे उदाहरण द्या ना!

**दादाश्री :** अरे, खूप गोष्टींमध्ये आम्ही जाणूनबुजून फसलो आहोत. या व्यापाऱ्यांनी सुद्धा मला फसविले आहे. 'या या, बसा बसा' करत फसवतात. मी म्हणतो की भाऊ, एक धोतर द्या आणि शर्टाचे कापड द्या, आणि कोटाचे कापड द्या. किंमत वगैरे मी विचारत नाही. हे सगळे आपल्या ओळखीचे आहेत हे मला माहीत असते. मग दुसरा कुठला व्यापारी मला भेटतो तेव्हा तो मला किंमत विचारतो आणि म्हणतो, 'एवढी एवढी किंमत तुमच्याकडून जास्त घेतली आहे.' तेव्हा मी त्यांना सांगतो, 'मी तर जाणूनबुजून फसवला जातो.' मला माहीत असते की त्याने जर जास्त घेतले नाहीत तर त्याच्या मनाला बरे वाटणार नाही. इतके चांगले ग्राहक आले आणि त्यांनी जास्त पैसे दिले नाहीत तर आणखी कुठला ग्राहक देणार? असे खानदानी ग्राहक आले आणि त्यांनी दिले नाहीत तर दुसरे कटकट करणारे काय देणार? आम्ही कधीही कटकट करत नाही. आणि आमची पावले तिथे पडली आहेत, तर त्या बिचाऱ्याला संतोष व्हायलाच हवा. आणि जर आमची पावले पडली आणि तो तोंड वेंगाडून म्हणाला, 'हा असा ग्राहक कसा काय आला? धोतर विकत घेऊन गेला आणि वर दोन रुपये कापले.' अरे, पूर्ण किंमत दिली तरी तोंड वाकडे करतोस? पण पाहा ना, कटकट करून दोन रुपये कमी दिले (अठरा ऐवजी सोळा दिले) म्हणूनच त्याचे तोंड वाकडे झाले ना! त्यापेक्षा तर अठरा रुपये जास्त घेतले ते चांगले दिसले असते. आणि इथे तर सोळा दिले पण ते चांगले दिसले नाहीत. हे म्हणजे एका सोन्याचा कलशासाठी पूर्ण देऊळ बिघडवून टाकण्यासारखे आहे.

आम्ही तर अशा प्रकारे स्वत:ला जाणूनबुजून फसवून घेतो. हे तर व्यापाऱ्यांकडून फसवून घेण्याचे एक लहानसे उदाहरण आहे. पण आम्हाला सगळेच फसवतात, बूटवाला देखील फसवतो ना! त्यात एखाद-दोन चांगलेही भेटलेले की जे अजिबात फसवत नाहीत. फसवणारे असे समजतात की हे भोळे आहेत. म्हणूनच कविराज लिहितात की,

*''मानीने मान आपी, लोभियाथी छेतराय,*
*सर्वनो अहम् पोशी, वीतराग चाली जाय.''* – नवनीत

(मानी व्यक्तीला मान देऊन, लोभी व्यक्तीकडून स्वत:ला फसवून घेऊन, सर्वांच्या अहम्‌ला पोषण देऊन वीतरागी निघून जातात.)

अहम्‌ला पोषण देऊन वीतराग निघून जातात! त्या बिचाऱ्याच्या अहम्‌ला पोषण मिळते आणि आपली सुटका होते ना!! नाहीतरी पैसे काय सोबत येणार आहेत का? त्यापेक्षा इथेच फसवले जाऊन लोकांना घेऊन जाऊ द्या ना! अन्यथा लोक नंतर वारस बनून येतील, त्यापेक्षा आताच फसवून घ्या ना! आणि जो फसवण्यासाठी आला आहे त्याला आपण मनाई करू शकतो का? जो फसवण्यासाठी आला आहे त्याचे तोंड कशाला दाबायचे?

## ...परिणाम स्वरूप विज्ञान प्रकटले

आम्ही तर ढेकणाला सुद्धा रक्त पिऊ देत असे. म्हणायचो इथे आला आहेस तर आता जेवूनच जा. कारण माझे हॉटेल असे आहे की या हॉटेलात कोणालाही दु:ख द्यायचे नाही, हेच माझे काम. म्हणून ढेकणालासुद्धा जेवू घातले आहे. आता जर त्याला जेवू घातले नाही तर काय सरकार आम्हाला शिक्षा करणार आहे? नाही. आम्हाला तर आत्मा प्राप्त करायचा होता. नेहमी चोविहार, कंदमूळ त्याग, गरम पाणी, हे सर्व करण्यात काहीही बाकी ठेवले नव्हते! आणि पाहा तेव्हाच तर हे प्रकट झाले, पूर्ण 'अक्रम विज्ञान' प्रकट झाले, जे सर्व जगाला स्वच्छ करू शकेल असे विज्ञान प्रकट झाले!

## ...पण त्यात हेतू मोक्षाचाच

**प्रश्नकर्ता :** तुम्ही तर जाणूनबुजून फसवून घेतले, पण ज्याने धोतराचे जास्त पैसे घेतले, त्याची काय दशा होईल? त्याचा फायदा होईल की नुकसान?

**दादाश्री :** त्याचे जे व्हायचे ते होईल. माझ्या शिकवण्यावरून त्यांनी हे केले नाही. आम्ही तर त्याच्या वृत्तीचे पोषण केले आहे. हक्काचे खायला आला तर ठीक आहे, बिनहक्काचे खायला आला तरी आम्ही त्याला थप्पड मारली नाही, घे बाबा, खा! आणि त्यामुळे

त्याचे तर नुकसानच होणार. त्याने बिनहक्काचे घेतले त्यामुळे त्याचे नुकसान होणार, पण आमचा मोक्ष मोकळा झाला ना! 'सर्वांचा अहम्‌ला पोषण देऊन वीतराग निघून जातात.' अशा प्रकारे अहम्‌चे पोषण केले नाही तर लोक आम्हाला पुढे जाऊच देणार नाहीत ना! 'आमचे एवढे बाकी राहिले, आमचे एवढे बाकी राहिले' असे करत अडवतील. पुढे जाऊ देईल का कोणी? अरे, आई-वडील देखील जाऊ देत नाहीत ना! ते तर म्हणतील की 'तू माझ्यासाठी काही केलेच नाहीस.' अरे! तुम्हाला असा मोबदला हवा आहे? मोबदला जर सहजपणे मिळाला तर ठीक आहे, पण आई-वडिलांनी मोबदल्याची अशी अपेक्षा ठेवावी का? जे मोबदल्याची इच्छा करतात त्यांना आई-वडील म्हणताच येणार नाही, ते तर भाडेकरू झाले! जाणूनबुजून फसणारे कमी असतात ना?

**प्रश्नकर्ता :** नसतातच.

**दादाश्री :** त्यामुळेच त्यांना मोक्षाचा मार्ग पण मिळतो ना!

**प्रश्नकर्ता :** समोरच्याला आपल्याला फसवण्याचा चान्स देणे, हे चुकीचे नाही का?

**दादाश्री :** हे तर स्वतःच्या प्रगतीसाठी आहे ना! फसवण्याचा चान्स त्याच्या प्रगतीसाठी आहे आणि फसले जाण्याचा चान्स आपल्या प्रगतीसाठी आहे. तो स्वतःची पौद्‌गलीक प्रगती करतो आणि आपण आत्म्याची प्रगती करतो, तर त्यात चुकीचे काय आहे? त्याला अडवला तर ते चुकीचे म्हटले जाईल.

आपल्याला फसविले खरे, पण नंतर त्याला त्याच्यापेक्षाही कोणी सवाई मिळेल, आणि तो त्याला चांगलाच चोप देईल की 'तू मला फसवतोस?' असे म्हणून त्याला मारेल!

मी सुरुवातीपासूनच जाणूनबुजून फसत होतो. त्यामुळे लोक मला म्हणत असत की, 'या फसवणाऱ्याला त्याची सवय होईल, याला कोण जबाबदार? तुम्ही अशा लोकांना सोडून देता म्हणून लुटारू निर्माण

होतात.' मग मला त्याचा खुलासा करावाच लागतो ना! आणि खुलासा पद्धतशीर असला पाहिजे. खुलासा काय मारून मुटकून दिला जातो? मग मी त्यांना म्हणालो की 'तुमचे म्हणणे बरोबर आहे, माझ्यामुळे काही लोक लुटारूसारखे झाले आहेत.' ते देखील सगळे नाही, दोन-पाच जणच असतील, कारण त्यांना प्रोत्साहन मिळाले ना! मग मी म्हटले की माझे म्हणणे जरा शांतपणे ऐका. समजा ज्याने मला फसवले त्याला जर मी एक थप्पड मारली, तर ती कशी मारणार? कारण आम्ही तर दयाळू आहोत त्यामुळे कशी थप्पड मारणार? हे तुम्हाला कळत आहे का? त्याने विचारले 'कशी माराल?' तर म्हटले 'हळूवारपणे मारू.' त्यामुळे तर त्याला जास्तच प्रोत्साहन मिळेल की, 'अरे वा, फार झाले तर एवढाच मार मिळेल ना? मग आता हेच करूया.' म्हणूनच असे करण्याऐवजी दयाळू माणसाने त्याला सोडून देणेच योग्य आहे. अशा प्रकारे लोकांना फसवत फसवत मग जेव्हा दुसरे-तिसरे स्टेशन येईल, तेव्हा त्याला एखादा असा मिळेल जो त्याला खूप मारेल, मारून मारून त्याचा दम काढून टाकेल, आणि मग तो आयुष्यभर असे करणे विसरून जाईल, त्याला फसवण्याची जी सवय झालेली आहे ती सवय ही व्यक्ती नाहीशी करेल, त्याचे डोकेच फोडून टाकेल. तुम्हाला समजले ना? हा खुलासा बरोबर आहे ना? पण या ज्ञानानंतर आमचे ते सर्व संग सुटलेत ना! नाहीतरी 1946 नंतर आम्हाला वैराग्य आले आणि 1958 मध्ये ज्ञान प्रकट झाले!

जाणूनबुजून फसणे हे तर फार मोठे पुण्य आहे! अजाणतेपणी तर सर्व जण फसतच असतात. पण आम्ही तर आयुष्यभर हेच काम केले आहे, जाणूनबुजून फसणे! हा चांगला बिझनेस आहे ना? कोणी फसवणारा भेटला तर समजा की आपण खूप पुण्यशाली आहोत. नाहीतर फसवणारा भेटतच नाही ना! या हिंदुस्तान देशात काय सगळेच पापी आहेत? जर तुम्ही मला म्हणालात की चला, मला फसवा. तर ती जोखीम मी का घेऊ? आणि जाणूनबुजून फसण्यासारखी दुसरी कला नाही! लोकांना अशी गोष्ट आवडत नाही ना? हे लोकांच्या नियमात बसतच नाही. म्हणूनच फसवण्याची सवय लावून घेतात ना! लोक टिट

फॉर टॅट (जशास तसे) असेच शिकवतात ना? पण आपण त्याला थप्पड कसे मारू शकतो? आणि मी मारले तरी हळूवारच मारीन. मी एके ठिकाणी वसूली करण्यासाठी गेलो होतो, तेव्हा त्याच्याकडे कोणाची तरी जप्ती आली होती. मी थोडावेळ बसलो तेव्हा समजले की जप्तीमध्ये त्याला वीस एक रुपये भरायचे होते, पण तेवढे रुपयेही त्याच्याकडे नव्हते, बिचाऱ्याचा डोळ्यात पाणी आले. तेव्हा मी म्हटले की 'घे, वीस रुपये मी देतो', मी त्याला वीस रुपये देऊन आलो. जो वसूली करण्यासाठी गेला आहे तो काय वीस रुपये देऊन येईल?

## परिणामस्वरूप कोणती बुद्धी उत्पन्न होते?

जाणूनबुजून फसण्यासारखा कोणताही परमार्थ नाही आणि आयुष्यभर मी जाणूनबुजूनच फसलो गेलो आहे. लोक विचारतात 'त्याचे फळ काय मिळेल?' तेव्हा मी म्हटले, 'जो जाणूनबुजून फसतो, त्याला कोणते पद मिळते माहीत आहे का? दिल्लीला जे कोर्ट आहे ना, सुप्रीम कोर्ट, त्या सुप्रीम कोर्टाच्या जजला देखील खडसावेल, अशी बुद्धी उत्पन्न होते.' म्हणजे काय? तर जजची सुद्धा चूक काढू शकेल अशी पॉवरफुल हाय क्लास बुद्धी प्राप्त होते. त्याला कायद्यात आणेल अशी बुद्धी तयार होते. जो जाणूनबुजून फसतो, जो कोणाला फसवत नाही, त्याची बुद्धी फार हाय लेवल वर (टोकाला) जाते! पण असे जाणूनबुजून कोण फसणार? असा पुण्यशाली कोण असेल? आणि अशी समज ॲडॉप्ट (स्वीकार)च कशी होईल? अशी समज देणार तरी कोण? कसे फसवायचे ही समज देतात, पण जाणूनबुजून फसवले जाण्याची शिकवण कोण देईल?

## जाणूनबुजून फसून तर पाहा

तसे तर इथे फसवले जाण्यासारखे काही नाहीच, पण फसवला गेलात तर फारच उत्तम! पण त्याला याची किंमत (फळ) काय मिळेल हे समजतच नाही ना! फसविले जाण्याची किंमत इतकी मोठी असते, हे लोकांना माहीत आहे का?

**प्रश्नकर्ता :** लोकांना माहीतच नाही ना!

**दादाश्री :** पण आम्ही तर लहानपणापासूनच फसवले जाण्याची सिस्टीम (पद्धत) ठेवली होती. आमच्या आईने शिकवले होते, त्या स्वत: देखील जाणूनबुजून फसत आणि सर्वांना संतुष्ट करत असत. मला हे खूप आवडत असे की त्या सर्वांना चांगल्या प्रकारे संतुष्ट करत आहेत. आणि जाणूनबुजून फसल्यामुळे अशी कोणती मोठी संपत्ती होती की जी निघून जाईल? संपत्ती काही कमी होणार आहे का?

**प्रश्नकर्ता :** अजूनही मला जाणूनबुजून फसण्याची हिंमत होत नाही.

**दादाश्री :** फसविले जाण्याची हिंमत? अरे, मला मुळीच वेळ लागत नाही, मला कोणी फसवायला आला तर मी समजून जातो की हा फसवायला आला आहे तर फसवून घ्यावे, परत असे गिऱ्हाईक मिळणार नाही. परत असे गिऱ्हाईक कुठून मिळणार? आणि तुझी तर हिम्मतच होत नाही ना!

**प्रश्नकर्ता :** व्यापारात काय होते की, या वस्तूची मार्केट प्राइस (बाजार भाव) काय आहे हे आम्हाला माहीत असते. ही व्यक्ती एका टनामागे हजार रुपये अधिक चार्ज करत आहे, हे समजल्यानंतर सुद्धा एक हजार रुपये जास्त देण्याची हिंमत होत नाही. म्हणून मग त्यांना सांगतो की, 'नाही, भाव तर हा एवढाच असला पाहिजे.' आणि त्यासाठी थोडा वादही घालतो.

**दादाश्री :** जाणूनबुजून (जास्त) देणे, यात असे आहे की आम्ही जे फसविले जातो ना, तो अपवाद आहे आणि अपवाद कधी कधीच होतो. नाहीतर लोक जाणूनबुजून फसतात पण ते लाजेमुळे किंवा दुसऱ्या काही अंतर्गत कारणामुळे. जाणूनबुजून फसविले जाण्याचे त्यांचे ध्येय नसते, परंतु आमचे ध्येय होते की जाणूनबुजून फसवून घ्यायचे.

## जेवून जाऊ द्या

आम्ही ढेकणाला जाणूनबुजून चावू देत होतो. त्या बिचाऱ्याला

हाकलून काढायचे तर नसते ना! आपल्या हॉटेलात आला आहे तर काय भोजन जेवल्याशिवायच जाणार? आता याचे फळ काय मिळते? त्या ढेकणाच्या आत असलेले वीतराग आमच्या आत असलेल्या वीतराग्याला फोन करून सांगतात, 'असा दाता कुठे पाहिला नाही, म्हणून त्यांना उच्चतम पद द्या.' हे जे ढेकूण असतात, ते कधीही भुकेले मरत नाहीत, रोजच जेवत असतात. लोक जेव्हा झोपेत असतात तेव्हा जेवतातच ना? पण आम्ही काय केले की जागे असतानाच त्यांना जेवू दिले. लोक झोपेत असतात तेव्हा त्यांना जेवू देतात की नाही? म्हणजे ढेकूण ही अशी जात नाही की जी कधी भुकेली मरेल. पण लोक त्यांना झोपेत जेवू देतात आणि आम्ही जागे असताना जेवू देतो, आणि त्यांना मारण्याचा तर प्रश्नच नाही. ढेकूण सहज हातात पकडता येतो पण आम्ही त्यांना परत पायावर ठेवून देतो. तसे तर आता माझ्या बिछान्यात ढेकूण येतच नाहीत, बिचाऱ्यांचा हिशोब पूर्ण झालेला आहे. जर हिशोब अपूर्ण ठेवले तर ते कच्चे राहतील.

काही लोक ढेकणांना मारत नाही पण बाहेर नेऊन सोडतात, पण हातात आले तर त्यांना सोडत नाहीत. मग मी त्यांना विचारतो की काय तुम्हाला पक्की खात्री आहे की एक ढेकूण आता कमी झाला आहे? अशी कोणती गॅरंटी आहे की ज्यामुळे तुम्ही समजता की एक कमी झाला? आणि जर असे एक एक कमी होत असतील तर रोजच्या रोज कमीच होत राहतील. मी म्हणतो की ढेकूण मारण्याची गरजच नाही. त्यांचा सीझन असतो, त्यानंतर ते आपोआपच नाहीसे होतात, नाहीतर काहीही केले तरी नाहीसे होत नाहीत. तुम्ही इथे मारून मारून नाहीसे केलेत तर शेजाऱ्यांच्या घरातून तुमच्या घरात घुसतील. जेव्हा ढेकूण चावतो तेव्हा आपल्याला समजते की प्रेम कुठे आहे? अजूनही जर देहावर प्रेम असेल तर आत्म्यावर प्रेम कधी बसेल?

आणि बिचारे ढेकूण जेव्हा जेवायला येतात तेव्हा सोबत काही डबा वगैरे तर घेऊन येत नाहीत. ते स्वत: जेवतात एवढेच. सोबत टिफिन वगैरे घेऊन जात नाहीत. टिफिन भरून घेऊन जातात का? पण

ते इतके भरपूर जेवतात की जरासा हात लावला तर त्यांचे पोट फुटते आणि ते बिचारे मरून जातात. आणि आपल्या हातालाही दुर्गंध येतो.

तुला हा संसार आवडतो? कसा काय आवडतो? मी तर हे सर्व पाहूनच विटलो आहे. अरेरे, कशात सुख मानले आहे या लोकांनी! आणि कसे काय सुख मानले आहे? काही विचारच केला नाही ना! जिथे काहीतरी घडते त्याबद्दल विचारच केला नाही ना! त्या संदर्भात काही विचारच करायचा नाही? दिवसभर विचार पैशांचाच, पैसे कसे मिळतील याचाच? किंवा पत्नी माहेरी गेली असेल तर विचार येत राहतात की एक पत्र पाठवून कळवावे की लवकर ये! बस, हेच दोन विचार, बाकी दुसरे कसले विचारच नाहीत! कोणाचे हिसकावून घेऊ आणि कसे गोळा करू असे फक्त पाशवी विचार! अरे, हे तर फ्री ऑफ कॉस्ट (मोफत) आहे, त्याच्यासाठी कशाला डोकेफोड करतोस? तुझा हिशोब तर ठरलेलाच आहे. तुला एवढे पैसे मिळतील, हा पेशंट तुला एवढे पैसे देईल, आणि दुसरा पेशंट एक पैसाही देणार नाही.

## जाणूनबुजून फसवले जाणे, प्रगतीकारक

आपल्याला तर फसवले जाऊन पुढे जायचे आहे. जाणूनबुजून फसण्यासारखी प्रगती या जगात दुसरी नाही. मनुष्य जातीवर विश्वास असणे ही तर खूप मोठी गोष्ट आहे. दहा लोकांनी विश्वासघात केला म्हणून काय सगळ्यांशीच नाते तोडून टाकायचे? नाही. असे तोडायचे नसते. दोन-तीन मित्रांनी धोका दिला तर म्हणतात 'हे सर्वच धोकेबाज आहेत, सर्व धोकेबाज आहेत.' अरे, असे म्हणू नये. ही तर आपल्या हिंदुस्तानातील प्रजा, त्यांच्यात थोडा वाकडेपणा दिसतो पण परमात्म्यासारखे आहेत. संयोगांमुळे त्यांची अशी दशा झालेली आहे, पण माझे ज्ञान दिले तर एका तासात कसे होतात ते पाहा. म्हणजेच परमात्म्यासारखे आहेत पण त्यांचा योग आला नाही.

## ...आणि जाणूनबुजून फसवणे, अधोगतीला नेते

जाणूनबुजून फसण्यामुळे प्रगती होते पण नकळत फसले जाण्यात

काहीच फायदा नाही, त्यात फसविणारा मार खातो. या आदिवासींबरोबर शेठ लोक कसा व्यवहार करतात? शेठ व्यापारी असतात, आणि आदिवासींबरोबर व्यवहार करताना ते बुद्धीचा दुरुपयोग करतात की नाही? स्वत:ची जास्त बुद्धी वापरून कमी बुद्धी असलेल्याला फसवतात. त्यात आदिवासीचा तर जो हिशोब होता त्यानुसार झाले, पण तो व्यापारी मात्र परत आदिवासी देखील बनणार नाही, उलट त्याला जनावर गती मिळेल. म्हणजेच अशा प्रकारे लोक स्वत:लाच फसवत आहेत ना! इतर कोणाला तर फसवूच शकत नाहीत ना!

## जगात स्वातंत्र्याचा सिद्धांत

म्हणूनच मी म्हटले आहे की या जगात कोणताही जीव दुसऱ्या कोणत्याही जीवात हस्तक्षेप करू शकेल असे नाहीच. पूर्णपणे स्वतंत्रच आहे, भगवंत देखील हस्तक्षेप करू शकत नाहीत, एवढे स्वातंत्र्य आहे. भगवंत कशाला हस्तक्षेप करतील? भगवंत तर ज्ञाता-द्रष्टा आणि परमानंदी आहेत, त्यांना अशी भानगडच नाही. या जगात कोणताही जीव दुसऱ्या कोणत्याही जीवात हस्तक्षेप करू शकत नाही, एवढे समजले तरी खूप झाले. आणि यावरून जर पूर्ण सिद्धांत समजला तर तो स्वतंत्रच होईल.



# [ 22 ]
# वसुलीचा त्रास

## आणि ज्ञानींनी जग कसे पाहिले?

काही लोक म्हणतात, 'आम्ही कोणाला पैसे उधार दिले आहेत, ते सर्व बुडतील.' नाही, हे जग अजिबात असे नाही. काही लोक म्हणतील की 'पैसे दिले तर बुडत नाहीत.' असेही जग नाही. प्रत्येकासाठी जग आपआपल्या हिशोबानुसारच असते. तुमचा हिशोब चोख असेल तर तुमचे कोणी नावही घेणार नाही, असे हे जग आहे.

कधी मनात येते, की 'एखाद्या चोराने आपल्याला पकडले तर काय होईल?' पण असे काहीही होणार नाही आणि जे पकडले जाणार आहेत त्यांना कोणी सोडत नाही, तर मग घाबरायचे कशाला? जो हिशोब असेल तो चुकता होईल आणि हिशोब नसेल तर कोणी नावही घेणार नाही. पण 'कोणी माझे नावही घेणारा नाही' असे समजून निर्भयही व्हायचे नाही. असे तर बोलूच नये, कारण ते एखाद्याला आव्हान देण्यासारखे आहे. तुम्ही घाबरू नका. या जगात घाबरायचे काहीच कारण नाही.

आपले तीन हजाराचे घड्याळ असेल आणि ते फोर्ट एरिया (मुंबईतील एक बाजार)मध्ये हरवले असेल. फोर्ट एरिया म्हणजे महासागरच, या महासागरात हरवलेली वस्तू परत सापडत नाही. आणि आपण तशी आशा ही करत नाही. पण तीन दिवसानंतर पेपरात जाहिरात

येते की ज्याचे घड्याळ हरवले असेल त्याने त्याचा पुरावा देऊन आणि या जाहिरातीचा खर्च देऊन घेऊन जावे. म्हणजेच जग हे असे आहे! अगदी न्याय स्वरूप! तुम्हाला पैसे मिळत नाहीत तो पण न्याय आहे, आणि मिळतात तोही न्याय आहे. हा सर्व हिशोब तर मी खूप वर्षांपूर्वी केला आहे. म्हणून कोणी पैसे परत केले नाहीत तर त्यात त्याचा काहीच दोष नाही. तसेच जर कोणी परत करायला येतो तर त्यात त्यांचे कसले उपकार? या जगाचे संचालन तर फार वेगळ्या तऱ्हेने होत आहे.

## त्याचा हिशोब निसर्ग चुकता करवून घेईल

तुमच्याकडून कोणी पैसे घेऊन गेले, तर तीन-चार वर्षानंतर त्या रकमेची वसूली कदाचित कोर्टाच्या नियमात बसणार नाही, पण निसर्गाचा नियम हे लोक तोडू शकत नाहीत ना! निसर्गाच्या नियमाप्रमाणे ती रक्कम व्याजासकट परत मिळते. इथल्या नियमाप्रमाणे काही मिळत नाही, हे तर सामाजिक नियम आहेत. पण निसर्गाच्या नियमात तर व्याजासकट मिळते. म्हणून कोणी आपले पैसे, तीनशे रुपये देत नसेल तर ते आपण त्याच्याकडून घेतले पाहिजेत. परत घेण्याचे कारण असे आहे की, या भाऊंनी मूळ रक्कमच परत केली नाही तर निसर्गाचे व्याज किती होईल! शंभर-दोनशे वर्षानंतर व्याजाची रक्कम तर कितीतरी मोठी होईल! म्हणून आपण त्याच्याकडून वसूली करून पैसे परत घेतले पाहिजेत. जेणेकरून त्याला इतका मोठा धोका पत्कारावा लागणार नाही! पण त्याने दिलेच नाहीत आणि धोका पत्कारला तर मग त्याला आपण जबाबदार नाही.

**प्रश्नकर्ता :** निसर्गाचा व्याजाचा दर काय असतो?

**दादाश्री :** नैसर्गिक व्याज आहे एक परसेंट बारा महिन्यांचे, म्हणजे शंभर रुपयांवर एक रुपया! जर त्याने तीनशे रुपये परत केले नाहीत तर काही हरकत नाही. तुम्ही म्हणा की, 'तू आणि मी आपण दोघे मित्र! चल आपण पत्ते खेळू या.' कारण तुमची रक्कम तर कुठे

जाणारच नाही ना! हा निसर्ग इतका करेक्ट आहे की तुमचा एक केस जरी चोरीला गेला, तरी तो कुठे जाणार नाही. निसर्ग एकदम करेक्ट आहे, एक एक परमाणूपर्यंत करेक्ट आहे. म्हणून काळजी करण्यासारखे हे जग नाहीच. मला चोर भेटेल, लुटारू भेटेल अशी भीतीही बाळगण्यासारखे नाही. समजा पेपरात आले की, 'आज कोणाला तरी गाडीतून उतरवून त्याचे दागिने लुटले, कोणाला तरी मोटरमध्येच मारले आणि त्याचे पैसे लुटले.' तर मग आता दागिने घालावेत की नाही? 'डोन्ट वरी' (काळजी करू नका)! जर तुमचा पूर्वीचा काही हिशोब नसेल तर करोडो रुपयांच्या रत्नांचे दागिने घालून हिंडलात तरी तुम्हाला कोणी हात लावू शकणार नाही, असे हे जग आहे, आणि ते बिलकुल करेक्ट आहे. जर तुमची जोखीमदारी असेल तरच तुम्हाला हात लावू शकेल. म्हणूनच आम्ही सांगतो की तुमचा *उपरी* (वरिष्ठ) कोणीच नाही, म्हणून 'डोन्ट वरी', निर्भय व्हा.

**प्रश्नकर्ता :** आपण एखाद्याला पाचशे रुपये दिले आणि ते तो परत करू शकला नाही, आणि दुसऱ्या एकाला पाचशे रुपये दान केले, तर या दोन्हीत फरक काय?

**दादाश्री :** दान देणे ही वेगळी गोष्ट आहे. त्यात जो दान घेतो तो कर्जदार बनत नाही. तुम्ही केलेल्या दानाचा मोबदला तुम्हाला वेगळ्या प्रकारे मिळतो. दान घेणारी व्यक्ती त्याचा मोबदला देत नसते. या उलट तुम्ही ज्याला पैसे दिले असतील त्याच्याकडूनच ते परत मिळवायचे असतात. मग शेवटी तो हुंड्याच्या रूपातही पैसे देईल. आपल्याकडे म्हणतात ना, 'मुलगा गरीब घराण्यातला आहे, पण घराणे खानदानी आहे, म्हणून त्याला पन्नास हजार हुंडा द्या.' हुंडा का देतात? तर ज्याचे देणे आहे तोच देत असतो. म्हणजे हा असा हिशोब आहे! एक तर मुलगी देतात आणि वर पैसे देखील देतात. त्यामुळे मागील सर्व हिशोब चुकता होतो.

## पैसे परत घेण्यातही विवेक असला पाहिजे

**प्रश्नकर्ता :** एखाद्या व्यक्तीकडून आपण दिलेले पैसे परत घ्यायचे

असतील आणि तो देत नसेल तर, आपण पैसे परत घ्यायचा प्रयत्न केला पाहिजे की आपलीच उधारी चुकती झाली असे समजून संतुष्ट झाले पाहिजे?

**दादाश्री :** नाही, असे नाही. ती व्यक्ती जर चांगली (सक्षम) असेल तर प्रयत्न करावा आणि जर दुबळी असेल तर मात्र प्रयत्न करूच नये.

**प्रश्नकर्ता :** प्रयत्न करावेत किंवा असे समजावे की परत मिळायचे असतील तर तो घरबसल्या आणून देईल आणि जर मिळाले नाहीत तर समजून घ्यावे की आपलीच उधारी चुकती झाली. असेच ना?

**दादाश्री :** नाही, नाही, असे काही मानू नका. आपण स्वाभाविक प्रयत्न करायला हवेत. आपण त्यांना म्हटले पाहिजे की', आम्हाला जरा पैशांची अडचण आहे म्हणून जर आता शक्य असेल तर तुम्ही आम्हाला पाठवून द्या.' अशा प्रकारे विनयाने, विवेकपूर्वक सांगितले पाहिजे आणि तरी परत आले नाहीत तर समजावे की आपला काहीतरी हिशोब होता तो चुकता झाला. पण आपण प्रयत्नच केले नाहीत तर तो आपल्याला मूर्ख समजेल आणि चुकीच्या रस्त्याने जाईल.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे त्यासाठी सामान्य प्रयत्न करावे?

**दादाश्री :** सामान्य म्हणजे, त्याला म्हटले पाहिजे की 'भाऊ आम्हाला जरा पैशांची अडचण आहे, म्हणून जर तुमच्याकडे असतील तर जरा लवकर पाठवलेत तर बरे होईल.' घेणाऱ्याचा जसा विवेक असतो ना, तसाच विवेक आपण ठेवला पाहिजे. आपल्याकडून पैसे घेताना तो जितका विनयशील असतो तितकेच विनयशील आपण पैसे परत मागताना असले पाहिजे. पण इथे तर पैसे परत घेताना 'मी पैसे उधार दिले आहेत' असे मनात येते, आणि ते नुकसानकारक आहे.

हा संसार तर एक कोडे आहे, यात मनुष्य मार खाऊन खाऊन मरून जाईल! अनंत जन्मांपासून मार खात आला आहे आणि सुटण्याची वेळ आली तरी स्वत:ची सुटका करून घेत नाही. मग सुटण्याची वेळ

परत येणारच नाही ना! आणि जो सुटलेला आहे तोच सोडवू शकतो, बंधनात असलेला कसा सोडवू शकेल?

बाकी, पैशांचे महत्त्व नाही, आपले मन कमकुवत होणार नाही हे महत्त्वाचे आहे. कधी आपल्या मनात विचार आला की 'याने पैसे परत केले नाहीत तर काय होईल?' त्यामुळे मग आपले मन कमकुवत होत जाते. म्हणूनच पैसे दिल्यानंतर आपण असेच समजावे की काळ्या चिंधीने बांधून हे पैसे आपण समुद्रात टाकत आहोत, मग परत मिळण्याची अपेक्षा करू शकतो का? म्हणजेच परत मिळण्याची अपेक्षा न ठेवताच द्या, अन्यथा देऊ नका.

## लोभसुद्धा आर्तध्यान करवितो

महावीर भगवंतांनी केलेल्या धर्मध्यानाच्या ज्या चार आज्ञा आहेत त्या काय जुन्या झाल्यात का? त्या आज्ञा जुन्या होणार नाहीत, मग भले कितीही काळ निघून जावो. समजा आता एखादा शेठ असेल आणि त्याच्याकडून कोणी दोन हिरे घेऊन गेले आणि 'दहा दिवसांनी पैसे देईन' असे म्हटले, आणि मग सहा महिने, बारा महिन्यांपर्यंत पैसे दिले नाही, तर काय होईल? शेठवर काही परिणाम होईल का?

**प्रश्नकर्ता :** माझे पैसे गेले, असे त्याला वाटेल.

**दादाश्री :** माझे म्हणणे आहे की, एक तर हिरे गेले, ते नुकसान आणि वर परत आर्तध्यान करतोस? आणि हिरे दिलेस ते तर तू राजीखुशीने दिलेस, मग त्याचे दुःख व्हायला नकोच ना?

**प्रश्नकर्ता :** लोभ होता म्हणून दिले ना?

**दादाश्री :** मग तोच लोभ आर्तध्यान करवितो. म्हणजे हे सर्व अज्ञानामुळे होत असते, पण ज्ञानात कुठलीही प्रकृती बाधक होत नाही. स्वभावदशेत आत्म्याला कोणतीही प्रकृती बाधक नाही. म्हणजे जे हिरे दिलेले ते तर गेले ते गेले, आणि वर परत रात्री झोपही येत नाही. दहा दिवसानंतर सुद्धा तो ग्राहक नीट उत्तर देत नसेल तरी झोप उडते. कारण

पन्नास हजाराचे हिरे असतात. पण शेठची मालमत्ता किती? पंचवीस लाखाची असते. त्यामधून पन्नास हजारांचे हिरे वजा केले तरी साडे चोवीस लाखांची मालमत्ता आहे असे समजायला नको का? आम्ही तर असेच करत असू, आयुष्यभरात मी तर असेच करत आलो आहे!

## समजूतदारपणा, दुसरे नुकसान होऊ देत नाही

शेठच्या हिऱ्यांचे पैसे आले नाहीत तरी शेठाणी चिंता करते का? मग काय ती भागीदार नाही? बरोबरीची भागीदार आहे. आता शेठ म्हणतो की, 'त्याला हीरे दिले, पण तो त्याचे पैसे देत नाही.' त्यावर शेठाणी काय म्हणेल, 'असो, आपलीच उधारी असेल, पैसे येणार नसतील तर नाही येणार.' तेव्हा शेठच्या मनात येते की 'ही काय बोलत आहे, हिला काही समजच नाही!' आणि हा मात्र आलाय मोठा अक्कलवान! त्याने हिऱ्यांचे पन्नास हजार दिले नाही तर तुम्ही तुमच्या पंचवीस लाखाच्या मालमत्तेतून पन्नास हजार वजा करून साडे चोवीस लाखाची मालमत्ता आहे असे समजा ना! आणि तुमची मालमत्ता तीन लाखाची असेल तर त्यातील पन्नास हजार कमी करून अडीच लाखाची मालमत्ता आहे असे समजा.

**प्रश्नकर्ता :** समाधानी राहण्याचा हा किती आश्चर्यकारक उपाय आहे, त्वरित समाधान होऊन जाईल!

**दादाश्री :** असे तुम्ही ठरवूनच टाका, सोपा उपाय करा! उगाच कठीण उपाय कशाला करायचा?

जो नुकसानीचा व्यापार करतो, त्याला वणिक कसे म्हणावे? घरी आपल्या भागीदाराला म्हणजेच पत्नीला विचारा की, 'हे पन्नास हजार गेले तर तुला त्याचे दुःख होत आहे का?' तेव्हा ती म्हणेल, 'गेलेत, म्हणजे ते आपले नाहीत.' तेव्हा ही स्त्री इतकी समजूतदार आहे आणि मी मात्र बेअक्कल आहे, हे तुमच्या लक्षात यायला नको का? आणि पत्नीचे ज्ञान लगेच समजून घेतले पाहिजे ना? एक नुकसान झाले ते जाऊ द्या पण दुसरे नुकसान करू नका. पण हा तर जे नुकसान झाले

आहे त्याकरता रडत राहतो, अरे, जे गेले त्यासाठी का रडतोस? आता परत जाणार नाही त्यासाठी रड हवे तर! आम्ही तर साफ साफ असे ठरविले होते की, जेवढे गेले तेवढे वजा करून ठेवून द्यावे.

पाहा ना, पन्नास हजारांचे हिरे घेऊन जाणारा माणूस मजेत ते वापरतो आणि इथे शेठ चिंता करत राहतो! शेठला विचारले की, 'असे उदास का दिसता?' तर म्हणेल काही नाही, काही नाही, काही नाही. ही तर जरा तब्येत बरी नाही ना, म्हणून. म्हणजे असे खोटे बोलतो. अरे, खरे सांग ना की 'मी पन्नास हजाराचे हिरे दिले त्याचे पैसे आले नाहीत म्हणून मला काळजी वाटते.' असे खरे खरे सांगून टाकले तर त्यावरचा काही उपाय मिळू शकेल. हा तर खरे सांगत नाही आणि गोंधळून जाऊन खोटे बोलत राहतो.

## मानी व्यक्तीची, लोभी व्यक्तीची लक्षणे कशी?

आम्ही तर असे ठाम ठरवलेले होते की जर वसुली करायला गेलो तर तो परत दुसऱ्यांदा पैसे मागेल ना? म्हणून (कर्जदाराकडून) पैसे मागणेच बंद करा. वसुली करणे सोडून द्या, मग काही कटकटच नाही ना!

आमच्या घराबाहेर तर चार चार गाड्या उभ्या असत. कारण असा परोपकारी माणूस कुठून मिळेल? 'या, अंबालालभाई, या!' असे म्हटले की झाले! असा भोळा माणूस कुठे मिळणार? चहा-पाणी पाजले नाही तरी चालेल, पण 'या, या' म्हटले की खूप झाले! जेवण वगैरे दिले नाही तरी चालेल, दोन दिवस उपाशी राहीन. पण तुझ्या गाडीत मला पुढच्या सीटवर बसव, मागच्या सीटवर नाही. म्हणून ते लोक माझ्यासाठी पुढची सीट राखून ठेवत असत. आता असे करणारा कोण भेटेल? मानी बिचारे भोळे असतात. ते बिचारे फक्त मानासाठी सर्व प्रकारे फसतात. रात्री बारा वाजता कोणी घरी आले आणि म्हटले, 'अंबालाल भाईसाहेब आहेत का?' बस! भाईसाहेब म्हटले की खुश! म्हणजे इतर लोक मानी व्यक्तीचा अशा प्रकारे फायदा घेतात! पण मानीला काय फायदा मिळवून

देतात की मानीला इतके वर चढवतात आणि मग त्याला असा दाणकन खाली आपटतात की तो मान वगैरे सर्व विसरूनच जातो. उंचीवर चढल्यानंतर पडणारच ना!

आम्हाला ते नेहमी 'अंबालालभाई' म्हणत आणि एखाद दिवशी 'अंबालाल' म्हटले की आम्हाला विषासारखे कडू वाटत असे.

या मानामुळे गोंधळायला होते, पण तरी मान चांगला आहे. माणूस मानी झाला तर ते चांगले आहे, कारण मानी व्यक्तीला दुसरे काही रोग होत नाहीत, त्याला फक्त मान दिले की तो खुश, आणि लोभ्याला तर कळतच नाही की माझ्यात लोभ आहे. मान आणि क्रोध दोन्ही भोळ्या स्वभावाचे आहेत. मानी एखाद्या लग्न समारंभात गेला आणि त्याला 'या, या, बसा' म्हटले की लगेच आपल्याला समजते. कोणतरी त्याला म्हणेल सुद्धा की 'अशी छाती पुढे काढायला काय झाले?' पण लोभ्याला तर कोणी असे विचारतच नाही!

लोभीचे लक्षण काय? आपण जर त्याला विचारले की हे दोन हिरे कोणाला दिल्यानंतर परत मिळाले नाही, तर तुमच्यावर काय परिणाम होईल? तर तो म्हणेल, 'परिणाम तर होणारच ना.' असा परिणाम होणे हेच लोभाचे लक्षण! दोन हिरे दिले, त्यात हातालाही काही इजा झाली नाही, किंवा त्याचा अपमानही केला नाही, अपमान केला तर त्याच्या मानाला धक्का पोहोचला असे म्हणता येईल. पण इथे तर असे काही झाल्याशिवायच हिरे दिले आहेत! एखाद्याला शिव्या देऊन अपमानित केले तर ते त्याला कसे सहन होईल? तर आपण समजू की संसारी आहे म्हणून सहन होणार नाही. पण हिरे दिले, त्यात काही शारीरिक इजा झाली नाही किंवा रक्त वगैरे आले नाही, मग हे काय आहे की ज्यामुळे त्रास होतो? हा लोभ नावाचा गुण आहे आणि तोच त्याला दु:ख देत असतो, त्रास देत असतो.

## ज्याला उधार दिले, त्यालाच परत केले, ही कशी फसवणूक?

असे आहे की जर आपण कोणाकडून काही घेतले असेल किंवा

कुणाला काही दिले असेल, देणे-घेणे तर जगात करावेच लागते ना! आपण कोणाला काही पैसे दिले असतील, आणि ते परत आले नाहीत तर मनात क्लेश होत राहतो, मनात येत राहते की 'हा कधी देईल, कधी देईल.' तर हे सर्व कधी संपेल?

आमच्या बाबतीत देखील असे घडले होते ना! पैसे परत आले नाहीत त्याची फिकीर तर आम्हाला सुरुवातीपासूनच नव्हती. पण आम्ही त्याला थोडी आठवण करून देत असू. आम्ही एका व्यक्तीला पाचशे रुपये दिले होते, जे दिले ते वहीखात्यात लिहिले नव्हते किंवा चिठ्ठीवर त्याची सही वगैरेही घेतली नव्हती. या गोष्टीला वर्ष-दीड वर्षे झाली असतील. मला देखील कधी आठवण आली नाही. एकदा ते भाऊ मला भेटले, तेव्हा मला आठवले. मग मी त्यांना म्हटले, 'ते पाचशे रुपये तुम्ही पाठवून द्या, आता तुम्हाला जर शक्य असेल तर माझ्याकडून घेतलेले पाचशे रुपये पाठवून द्या.' तर ते म्हणू लागले की 'कुठले पाचशे?' मी म्हटले तुम्ही माझ्याकडून घेऊन गेला होतात ना, ते. त्यावर ते म्हणाले 'तुम्ही मला कधी दिले होते? उलट पैसे तर मी तुम्हाला उधार दिले होते, ते तुम्ही विसरलात?' तेव्हा मी लगेच समजून गेलो. मी म्हटले की 'हो! मला जरा आठवू द्या.' थोडा वेळ असा-तसा विचार करून मी म्हटले, 'हो, बरोबर आहे, मला आठवले, तुम्ही उद्या येऊन घेऊन जा.' आणि मग दुसऱ्या दिवशी त्यांना पैसे देऊन टाकले. तो माणूस जर इथे येऊन त्रास देऊ लागला की तुम्ही माझे पैसे परत करत नाहीत, तर काय करायचे? अशा घटना घडलेल्या आहेत.

म्हणजे जगातील लोकांना कसे सामोरे जावे? तुम्ही कोणाला पैसे दिले असतील, तर ते काळ्या कपड्यात बांधून समुद्रात फेकून दिले आहेत असे समजावे, मग ते परत येण्याची आशा करणे हा मूर्खपणा आहे. जर कधी परत आलेच तर ते जमा करून घ्या आणि त्याला त्यादिवशी चहा पाणी पाजा आणि म्हणा, 'भाऊ, मी तुमचा ऋणी आहे, कारण तुम्ही मला पैसे परत केलेत, नाहीतर या काळात पैसे काही परत येत नाहीत. तुम्ही दिलेत ते आश्चर्यच म्हणावे लागेल.' तो म्हणेल की

'व्याज मिळणार नाही.' तर म्हणा, 'मूळ रक्कम आणून दिली तेच खूप आहे!' हे तुम्हाला समजले ना? जग हे असे आहे. जो पैसा उधार घेतो त्याला परत करण्याचे दु:ख आहे. आणि जो उधार देतो त्याला परत येण्याचे दु:ख आहे. तर यात सुखी कोण? आणि हे 'व्यवस्थित'च आहे! देत नाही तेही 'व्यवस्थित' आणि मी डबल दिले तेही 'व्यवस्थित' आहे.

**प्रश्नकर्ता :** पण तुम्ही त्याला परत दुसरे पाचशे रुपये का दिलेत?

**दादाश्री :** पुन्हा पुढल्या कुठल्यातरी जन्मात त्या व्यक्तीची गाठ पडू नये म्हणून. आणि इतकी जागृती राहणारच ना की यात तर माझेच चुकले. जर तो म्हणेल की 'मी देऊ शकत नाही, म्हणून आता तुम्ही तडजोड करा.' तर अशांबरोबर व्यवहार करू शकतो आणि तो परत पुढल्या जन्मी भेटला तरी हरकत नाही! पण त्या पहिल्या व्यक्तीसारख्या माणसांचे दर्शन तर कुठल्याही जन्मात होऊ नये. आमच्या ज्ञातीत (वीतराग ज्ञातीत) तो सामील नसेल तरच बरे. आमच्या ज्ञातीत तो कधी सामील होऊ शकेल? तर, जेव्हा तो म्हणेल की, 'मला आता शक्य नाही, तर काही तडजोड करा.' पण तो वेगळेच काही बोलायला लागला तर तो आमच्या ज्ञातीत येऊच शकणार नाही. असे चालणारच नाही ना! आमच्या ज्ञातीशी त्याचे काही देणेघेणेच नाही ना! तो परत भेटलाच नाही तर बरे, परत त्याचे दर्शन न झालेलेच बरे. त्याला वाटते की 'मला पैसे मिळाले'. आम्ही म्हणतो की तुला मिळाले, आणि आमची इच्छाही तशीच होती, आमचा एक मोठा हिशोब पूर्ण झाला ना! म्हणून तू खुश रहा! अशा क्वॉलिटीच्या लोकांना कसे सामारे जायचे? आता याला न्याय म्हणावे की अन्याय? कोणी म्हणेल की, 'तुम्ही न्याय करवून रुपये परत घ्या.' पण मी म्हणतो, 'नाही, आता तर कळून चुकले आहे की अशा क्वॉलिटी देखील असतात. त्यापेक्षा या ज्ञातीपासून दूर, खूप दूरच राहावे, आणि यांच्याबरोबर जर खरे-खोटे याचा न्याय करायला गेलो तर गोष्टी तलवारी उपसण्यापर्यंत जातील.'

## वसूली केली तर परत मागेल ना?

लोकांना कळले की माझ्याकडे पैसे आले आहेत म्हणून लोक

माझ्याकडे पैसे मागण्यासाठी आले. आणि 1942 पासून 1944 पर्यंत मी सर्वांना पैसे देतच आलो. मग 1945 मध्ये मी ठरविले की आता मला मोक्षाकडे जायचे आहे. तर आता या लोकांबरोबर आपला मेळ कसा बसणार? म्हणून ठरविले की आपण जर त्यांच्याकडून दिलेल्या पैशांची वसुली केली तर मग ते परत पैसे मागण्यासाठी येतील आणि व्यवहार चालूच राहील. म्हणून असे ठरविले की, त्यापेक्षा वसुलीच बंद केली तर हा व्यवहार देखील बंदच होईल. वसुली केली तर पाच हजार देऊन परत दहा हजार घ्यायला येतील. त्यापेक्षा (त्याने घेतलेले) पाच हजार त्याच्याकडेच राहू दिले तर त्याला असे वाटेल की आता 'हे न भेटलेलेच बरे'. त्यामुळे मला रस्त्यात पाहिल्याबरोबर तो दुसऱ्या बाजूने निघून जात असे. आणि तेव्हा मी ही समजून जात असे की आता मी सुटलो, मला या सर्वांना सोडायचेच होते आणि त्या सर्वांनी मला सोडले देखील!

पण या टोळीत मी कशासाठी गेलो होतो? तर मान मिळवण्यासाठी. आत मान मिळवण्याचा मोह होता म्हणून यांच्यात गेलो होतो. पण आता बाहेर कसे पडणार? तेव्हा मला हा मार्ग मिळाला. जेव्हा जेव्हा मला असे वाटत असे की आता यातून बाहेर कसे पडणार? तेव्हा तेव्हा मला असे काही सुचत असे. म्हणूनच मी ठरवले की 'आता पैसे परत मागायचे नाहीत', तर मार्ग निघेल. त्याचा परिणाम इतका चांगला झाला की सर्वांचे येणेच बंद झाले. कदाचित त्यातील दोघा-तीघांनी पैसे आणून दिले असतीलही. पण मी त्यांना स्पष्टपणे सांगितले की, 'आता तर मी व्यवहार हिराबांकडे सोपविला आहे. माझ्या हातात मी आता काही ठेवले नाही', असे सांगून टाकल्यामुळे मग सर्व कटकटच मिटली. 'आता माझ्या हातात काहीच नाही, घरात माझे काही चालत नाही' असे सरळ सांगून टाकले.

## ... तरीही पैशांची चिंता

कोणाला पैसे उधार द्यायचे असतील, दोन टक्के व्याजावर किंवा दीड टक्के व्याजावर किंवा तीन टक्के व्याजावर, तर देताना गृहीत धरा की हे पैसे परत येणार नाहीत. नंतर जर परत आले तर त्याला फायदा

समजा. एकदा पैसे दिले की त्यानंतर त्याची चिंता-काळजी करायची नसते. कारण तुमच्या हातात ही सत्ताच नाही. माणसांच्या हातात एक क्षण देखील जगण्याची सत्ता नाही. कोणत्या क्षणी मरून जातील याचा देखील काही पत्ता नाही आणि तरी पण पैशांची चिंता करत राहतात. अरे, पैशांची चिंता करायची असते का कधी?

## ...त्यात आपलीच चूक

एका वाण्याला ब्राह्मणाने चारशे रुपये दिले होते, त्याची जप्ती करण्यासाठी तो वाण्याकडे गेला. तर तो वाणी चिडून शिव्या देऊ लागला, 'साल्या, नालायका' म्हणू लागला. आणि परत 'माझ्यासारखा नालायक कोणी नाही' असेही म्हणू लागला. अरे, तू स्वत:लाच शिव्या देतोस? ब्राह्मणाला इतक्या शिव्या दिल्या आणि वर म्हणतो काय तर, 'माझ्यासारखा नालायक कोणी नाही.' पैसे दिले नाहीत म्हणूनच अशी दशा झाली ना! ही कसली माणसे आहेत? अशी वेगवेगळी टाळकी असतात. तो त्या ब्राह्मणाला नालायक म्हणतो आणि परत स्वत:ला देखील तसेच म्हणतो, मग आपल्याला हसूच येईल ना?

या जगाला कसे सामोरे जावे? म्हणूनच आम्ही काय म्हटले आहे की, 'भोगतो त्याची चूक.' आपली चूक आहे हे आपल्याला केव्हा कळेल? तर जेव्हा आपल्याला भोगावे लागेल तेव्हा. हा सोपा मार्ग आहे ना?

एखाद्याने तुम्हाला तुमचे अडीचशे रुपये परत केले नाहीत आणि ते अडीचशे रुपये बुडले तर त्यात चूक कोणाची? तुमचीच ना? भोगतो त्याचीच चूक. या ज्ञानाने धर्म होईल, आणि त्यामुळे समोरच्यावर आरोप करणे, कषाय करणे सर्व बंद होईल. म्हणून हे 'भोगतो त्याची चूक' हे तर मोक्षाला घेऊन जाईल, असे आहे! हे सूत्र तर एक्झॅक्ट निघाले आहे की 'भोगतो त्याची चूक.'



# [ 23 ]
# अडथळा आणल्यामुळे अंतराय पडतात

## उपादान 'निश्चयाचे', आशीर्वाद 'निमित्त'

**प्रश्नकर्ता :** मनात ठाम ठरवलेले असते की हे कार्य करायचे आहे आणि त्यात सफलता मिळत नसेल, तरी पण आत विलपॉवर आहे की हे कार्य सफल होईलच, तर हे बरोबर आहे का?

**दादाश्री :** हो, ते बरोबर आहे, ते काम होईलच. कारण जर विलपॉवर असेल तर ते काम नक्कीच होईल. आणि विलपॉवर तुटली तर काम होणार नाही. विलपॉवर वरून आम्ही भविष्य सांगू शकतो की हे काम होईल किंवा नाही. म्हणून ज्या कामासाठी विलपॉवर नसेल ते काम सोडून द्यावे आणि विलपॉवर असेल तर ते काम नेटाने करीत राहावे. ते कधी ना कधी नक्कीच होईल. तुमचा भाव आणि त्याचबरोबर दुवा पण असावी, दोन्ही बरोबर असतील तर काम होईल.

**प्रश्नकर्ता :** विलपॉवरपेक्षा दुवा जास्त परिणामकारक आहे का?

**दादाश्री :** हो, पण दोन्ही बरोबर असले पाहिजेत. विलपॉवर नसेल तर दुव्याचा काहीच उपयोग नाही. तुमची विलपॉवर आणि 'ही' दुवा दोन्ही एकत्र आले की काम सफल होईल. कोणाची दुवा जास्त परिणामकारक आहे? तर ज्यांना या जगातली कुठलीही गोष्ट हवीशी

वाटत नाही, कुठल्याही गोष्टीची भीक (हाव) नाही, लक्ष्मीची भीक नाही, विषयांची भीक नाही, मानाची भीक नाही, कीर्तीची भीक नाही त्यांची दुवा परिणामकारक असते. जोपर्यंत मानाची भीक आहे, लक्ष्मीची भीक आहे तोपर्यंत दुवा परिणामकारक होत नाही.

## विचारांमुळे टाकलेले अंतराय...

**प्रश्नकर्ता :** कुठलेही कार्य करताना त्यात विरोधी शक्ती येतात आणि त्या कार्य थांबवतात, तर असे का होते?

**दादाश्री :** ज्याच्यामुळे आपल्याला चांगले कार्य करताना अडथळे येतात त्याला अंतराय कर्म म्हणतात. असे आहे, बागेत जायचा कधीतरी कंटाळा आला आणि आपण म्हटले की 'या बागेत कधीच येण्यासारखे नाही.' आणि नंतर कधी आपल्याला त्या बागेत जायचा प्रसंग आला तर आपणच टाकलेला हा अंतराय आपल्यासमोर येईल आणि आपण बागेत जाऊ शकणार नाही. हे जेवढे अंतराय आहेत तेवढे सगळे आपणच उभे केलेले आहेत, त्यात इतर कोणाचाही हस्तक्षेप नाही. कुठलाही जीव दुसऱ्या कुठल्या जीवात हस्तक्षेप करू शकत नाही. स्वतःच केलेल्या हस्तक्षेपामुळे हे सर्व अंतराय उत्पन्न झाले आहेत. आपण बोललेलो असतो की 'या बागेत येण्यासारखेच नाही.' आणि नंतर तिथे जायचे असेल, त्या दिवशी आपल्याला तिथे जावेसे वाटतच नाही, बागेच्या फाटकापर्यंत जाऊन परत यावे लागते, यालाच म्हणतात अंतराय कर्म! कारण हस्तक्षेप केला की अंतराय पडला.

(मुंबईच्या) वांद्राच्या खाडीजवळ उभे राहिलात तर दुर्गंध येत राहतो, बागेत जाण्याचे कितीही मनात येत असेल तरी जाणे होत नाही, त्याचे काय कारण आहे? तर स्वतःच अंतराय टाकले आहेत, उपभोगाचे अंतराय टाकले आहेत, ते अंतराय तुटले तर काम होईल. पण अंतराय तुटणार कसे? 'जायचे आहे, पण का जाऊ शकत नाही' सतत असा विचार करत राहिले, तर सगळे अंतराय तुटतील. कारण विचारांमुळे अंतराय पडलेले असतात आणि विचारच अंतराय तोडतात. 'जाऊ या,

नाही गेलो तर काय बिघडणार आहे ?' अशा विचारांमुळे अंतराय पडतात. याउलट 'जायचेच आहे, का नाही जाऊ शकणार ?' अशा विचारांमुळे अंतराय तुटतात.

## दुसऱ्यांना अडथळे आणण्यामुळे अंतराय पडतात

राजा एखाद्यावर खुश झाला की तो कोषाध्यक्षांना सांगतो, 'याला एक हजार रुपये द्या.' पण तो कोषाध्यक्ष फक्त शंभरच देतो. काही ठिकाणी तर तो कोषाध्यक्ष ठाकूरांना समजावून देतो की 'ही व्यक्ती काही विशेष नाही, हे सर्व तर खोटे आहे.' म्हणजे जो द्यायला तयार झाला आहे त्यालाच थांबवतो. मग याचे फळ पुढील जन्मात काय मिळेल ? त्याला कधीच पैसे मिळणार नाहीत, लाभांतराय पडेल. कोणाला होणाऱ्या लाभामध्ये तुम्ही अडथळे आणलेत तर लाभांतराय पडतो. त्याप्रमाणेच ज्या ज्या गोष्टींमध्ये तुम्ही अडथळे आणता, कोणाच्या सुखात अडथळे आणले, कोणाच्या विषयसुखात अडथळे आणले, ज्या कुठल्या गोष्टींमध्ये तुम्ही अडथळे आणता, त्या सर्वांमध्ये तुम्हाला अडथळे येतात आणि मग तुम्ही म्हणता की 'मला अंतराय कर्म नडत आहेत.' कोणी सत्संगाला यायला तयार असेल आणि तुम्ही मनाई केलीत तर तुम्हाला अंतराय पडतील. म्हणजे तुम्ही ज्यात अडथळे आणता त्याचे फळ तुम्हाला भोगावे लागेल. काही कोषाध्यक्ष तर असे दीड शहाणे असतात की राजाला बक्षीस देऊ देत नाहीत. राजाला असा सल्ला देतात ना ? मग काय होणार ? त्यांनी अडथळे आणले म्हणून त्यांना देखील अंतराय पडतात, त्यामुळे मग त्यांना कोणत्याही ठिकाणी लाभ होत नाही. काही लोक तर कोणी एखाद्या गरीब माणसाला काही देत असेल, तर त्यापूर्वीच त्यात अडथळे आणतात. अरे, त्यात तुम्ही ढवळाढवळ का करता ?

तुमच्या समाजातील (एखाद्या कार्यक्रमात) सर्व लोक जेवायला बसले असतील, त्यातील एका व्यक्तीने म्हटले की, 'या चार-पाच लोकांना देखील जेवायला बसवा.' आणि तुम्ही मनाई केली, तर हे तुम्ही जेवणाचे अंतराय टाकले. त्यामुळे मग तुम्ही एखाद्या ठिकाणी अडचणीत, मोठ्या अडचणीत सापडता. दुसऱ्यांमध्ये हस्तक्षेप केला

म्हणूनच ही गडबड झाली ना! म्हणून आपण समजून घेतले पाहिजे, की ही अंतराय कर्मे का येतात? ते जर समजले तर मग परत तुम्ही असे करणार नाहीत ना? हे सर्व तुम्हीच टाकलेले अडथळे आहेत. जे आहे ते सर्व तुम्ही तुमच्याच जबाबदारीवर केले आहे. स्वतःच्याच जबाबदारीवर करायचे आहे, त्यामुळे समजून करा.

**प्रश्नकर्ता :** असेही होऊ शकते ना, की राजाने तर सांगितले की हजार द्या, पण तिजोरीची माहिती तर कोषाध्यक्षालाच असते ना?

**दादाश्री :** हो, पण तो राजाच्या हितासाठी करत असेल तर गोष्ट वेगळी आहे, पण ही तर त्याला वाईट सवयच लागलेली असते, त्याला पाहावतच नाही. 'मला पगारच हजार रुपये मिळतो आणि या लोकांना कशाला कारण नसताना देतात?' म्हणून त्याला पाहावत नाही. 'दुसऱ्यांना कशाला देता, मला द्या ना!' असे तुमच्या पाहण्यात आले नाही का?

**प्रश्नकर्ता :** जर कोषाध्यक्षाला माहीत असेल की तिजोरीत शंभर रुपयेच आहेत, तर त्याचा दोष आहे की नाही?

**दादाश्री :** नाही, मग त्याचा दोष नाही. पण तरीदेखील त्याने राजे साहेबांना माहिती दिली पाहिजे की, 'राजेसाहेब आपल्या तिजोरीत काहीही नाही.' पण इथे तर पैसे असताना सुद्धा अंतराय टाकतात. घरातील लहान मुलगा जर कोणाला काही देत असेल, तरी तुम्ही त्याला मनाई करता की 'नाही द्यायचे.' तर त्यामुळे त्या मुलाला नाही पण तुम्हाला मात्र अंतराय कर्म पडते.

खरे म्हणजे अंतराय कर्म बाधक आहे, नाहीतर जिथे आत्मा प्राप्त झालेला आहे तिथे सर्व काही असते. ज्याचा ज्याचा विचार कराल त्या सर्व गोष्टी हजरच असतात. पण इथे तर सगळीकडे स्वतःच अंतराय टाकलेले आहेत, म्हणूनच सर्व थांबले आहे! जिथे आत्मा आहे, तिथे त्याच्या इच्छेनुसार सर्व तयारच असते. आत्मा तर भगवंत आहे, ती काय अशी तशी गोष्ट आहे? पण आपणच अंतराय टाकलेले आहेत तर काय होणार? आपण एवढेच समजून घेतले पाहिजे की बाबा, हे अंतराय

कर्म का अडथळे आणत आहे? लोक पण म्हणतात ना, की 'मला तर अंतराय अडथळे आणतात?' अरे, पण कशामुळे? हे जर एकदा कळले तर परत तसे करणार नाही ना?

## एवढी मोठी चूक! कशी लक्षात येईल?

जीवाने किती तरी अंतराय टाकलेले आहेत! हे 'ज्ञानी पुरुष' आहेत, मोक्ष हातात देतात, चिंतारहीत स्थिती प्रदान करतात, तरी पण कितीतरी अंतराय आहेत की त्याला वस्तू प्राप्त होतच नाही!

भगवंत तर हे इथे आहेत, मी तुमच्या आत पाहत आहे, पण तुम्हाला दिसत नाहीत. भगवंत काही दूर गेले नाहीत. पण होते काय? तर मध्ये इतके अंतराय पडलेले आहेत, ते स्वत:ला कसे दिसतील? हे अंतराय स्वत:च टाकलेले आहेत. हा काय म्हणतो की 'मी चंदुभाई आहे.' तर भगवंत म्हणतात की, 'ठीक आहे.' आणि मग हे जेवढ्या वेळा बोलाल तेवढे अडथळे तुम्हाला येतील.' आणि ते अडथळे तुम्हालाच दूर करावे लागतील. पण ते स्वत:हून दूर होणार नाहीत, ते तर जेव्हा 'ज्ञानी पुरुष' भेटतील आणि ते दूर करतील तेव्हाच दूर होतील!

**- जय सच्चिदानंद**

## मूळ गुजराती शब्दांचे समानार्थी शब्द

| | |
|---|---|
| *कल्प* | : कालचक्र |
| *उपरी* | : बॉस, मालक, वरिष्ठ |
| *अजंपा* | : आतल्या आत कुढणे, बेचैन होणे |
| *कढापा* | : राग, क्लेश |
| *अटकण* | : जी बंधनरूप होते आणि पुढे जाऊ देत नाही |
| *पोतापणा* | : मी आहे आणि माझे आहे असे आरोपण, माझेपणा |
| *निकाल* | : निपटारा |
| *बरकत* | : योग्यता, पात्रता |
| *पूरण* | : चार्ज होणे |
| गलन | : डिस्चार्ज होणे |
| *पुद्गल* | : ज्याचे पूरण-गलन होते |
| *ऑन* | : मूळ किमतीपेक्षा जास्त किमतीने विकणे |
| *बाखडी बांधणे* | : वाद, भांडण, तक्रार करणे |
| *उद्दीरणा* | : भविष्यात फळ देणाऱ्या कर्मांना वेळेआधीच जागे करून, वर्तमानात संपवणे |

# नऊ कलमे

## ( दररोज तीन वेळा बोलावी )

१. हे दादा भगवान! मला, कोणत्याही देहधारी जीवात्म्याचा किंचितमात्रही अहम् दुभावणार (दुखावणार) नाही, दुभवविला जाणार नाही किंवा दुभविण्याप्रती अनुमोदन दिले जाणार नाही, अशी परम शक्ती द्या.

मला, कोणत्याही देहधारी जीवात्म्याचा किंचितमात्रही अहम् दुभावणार नाही अशी स्याद्वाद वाणी, स्याद्वाद वर्तन आणि स्याद्वाद मनन करण्याची परम शक्ती द्या.

२. हे दादा भगवान! मला, कोणत्याही धर्माचे किंचितमात्रही प्रमाण दुभावणार नाही, दुभवविले जाणार नाही किंवा दुभविण्याप्रती अनुमोदन दिले जाणार नाही, अशी परम शक्ती द्या.

मला, कोणत्याही धर्माचे किंचितमात्रही प्रमाण दुभावले जाणार नाही, अशी स्याद्वाद वाणी, स्याद्वाद वर्तन आणि स्याद्वाद मनन करण्याची परम शक्ती द्या.

३. हे दादा भगवान! मला, कोणत्याही देहधारी उपदेशक, साधू, साध्वी किंवा आचार्य, यांचा अवर्णवाद, अपराध, अविनय न करण्याची परम शक्ती द्या.

४. हे दादा भगवान! मला, कोणत्याही देहधारी जीवात्म्याप्रती किंचितमात्रही अभाव, तिरस्कार कधीही केला जाणार नाही, करविला जाणार नाही किंवा कर्त्याप्रती अनुमोदन दिले जाणार नाही, अशी परम शक्ती द्या.

५. हे दादा भगवान! मला, कोणत्याही देहधारी जीवात्म्याशी कधीही कठोर भाषा, तंतीली (टोचणारी) भाषा न बोलण्याची, न बोलवविण्याची किंवा बोलण्याप्रती अनुमोदन न देण्याची परम शक्ती द्या.

कोणी कठोर भाषा, तंतीली भाषा बोलले तरी मला मृदु-ऋजु भाषा बोलण्याची परम शक्ती द्या.

६. हे दादा भगवान! मला, कोणत्याही देहधारी जीवात्म्याप्रती, स्त्री-पुरुष किंवा नपुंसक, कोणताही लिंगधारी असो, तर त्यांच्या संबंधी किंचितमात्र पण विषयविकार संबंधी दोष, इच्छा, चेष्टा-चाळे किंवा विचार संबंधी दोष न करण्याची, न करविण्याची किंवा कर्त्याप्रती अनुमोदन न देण्याची परम शक्ती द्या.

मला निरंतर निर्विकार राहण्याची परम शक्ती द्या.

७. हे दादा भगवान! मला, कोणत्याही रसात लुब्ध न होण्याची शक्ती द्या. समरसी आहार घेण्याची परम शक्ती द्या.

८. हे दादा भगवान! मला, कोणत्याही देहधारी जीवात्म्याचा प्रत्यक्ष किंवा परोक्ष, जिवंत किंवा मृत्यू पावलेल्या, कोणाचाही किंचितमात्रही अवर्णवाद, अपराध, अविनय केला जाणार नाही, करविला जाणार नाही किंवा कर्त्याप्रती अनुमोदन दिले जाणार नाही, अशी परम शक्ती द्या.

९. हे दादा भगवान! मला जगत् कल्याण करण्याचे निमित्त बनण्याची परम शक्ती द्या, शक्ती द्या, शक्ती द्या.

(एवढेच तुम्ही 'दादा भगवान' यांच्याजवळ मागायचे. ही दररोज यंत्रवत् वाचण्याची वस्तू नाही, हृदयात ठेवण्याची वस्तू आहे. ही दररोज उपयोगपूर्वक भावना करण्याची वस्तू आहे. एवढ्या पाठात सर्व शास्त्रांचे सार येऊन जाते.)

## दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित मराठी पुस्तके

1. भोगतो त्याची चूक
2. एडजस्ट एवरीव्हेर
3. जे घडले तोच न्याय
4. संघर्ष टाळा
5. मी कोण आहे ?
6. क्रोध
7. चिंता
8. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
10. भावना सुधारे जन्मोजन्म
11. कर्माचे विज्ञान
12. पाप-पुण्य
13. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार (सं)
14. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार (सं)
15. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य (सं)
16. मानव धर्म
17. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
18. सेवा-परोपकार
19. दान
20. त्रिमंत्र
21. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
22. चमत्कार
23. सत्य-असत्याचे रहस्य
24. वाणी, व्यवहारात (सं)
25. पैशांचा व्यवहार (सं)
26. क्लेश रहित जीवन
27. निजदोष दर्शनाने... निर्दोष!
28. प्रेम
29. गुरू-शिष्य
30. अहिंसा
31. आप्तवाणी-1 ते 7
36. आत्मसाक्षात्कार
37. जगत् कर्ता कोण ?
38. कर्माचा सिद्धांत

## हिन्दी

1. आत्मसाक्षात्कार
2. ज्ञानी पुरुष की पहचान
3. सर्व दु:खों से मुक्ति
4. कर्म का सिद्धांत
5. आत्मबोध
6. मैं कौन हूँ ?
7. पाप-पुण्य
8. भुगते उसी की भूल
9. एडजस्ट एवरीव्हेयर
10. टकराव टालिए
11. हुआ सो न्याय
12. चिंता
13. क्रोध
14. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
16. दादा भगवान कौन ?
17. पैसों का व्यवहार (सं, ग्रं)
19. अंत:करण का स्वरूप
20. जगत कर्ता कौन ?
21. त्रिमंत्र
22. भावना से सुधरे जन्मोंजन्म
23. चमत्कार
24. प्रेम
25. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (सं, पू, उ)
28. दान
29. मानव धर्म
30. सेवा-परोपकार
31. मृत्यु समय, पहले और पश्चात्
32. निजदोष दर्शन से... निर्दोष
33. पति-पत्नी का दिव्य व्यवहार (सं)
34. क्लेश रहित जीवन
35. गुरु-शिष्य
36. अहिंसा
37. सत्य-असत्य के रहस्य
38. वर्तमान तीर्थकर श्री सीमंधर स्वामी
39. माता-पिता और बच्चों का व्यवहार (सं)
40. वाणी, व्यवहार में... (सं)
41. कर्म का विज्ञान
42. सहजता
43. आप्तवाणी - 1 से 9
52. आप्तवाणी - 13 (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
54. आप्तवाणी - 14 (भाग-1 से 3)
56. ज्ञानी पुरुष (भाग-1)
57. आप्तवाणी - 12 (पू)

**( सं - संक्षिप्त, ग्रं - ग्रंथ, पू - पूर्वार्ध, उ - उत्तरार्ध )**

**★ दादा भगवान फाउन्डेशनद्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेतसुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहेत. वेबसाइट www.dadabhagwan.org वरसुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता.**

**★ प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि इंग्रजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित होत आहे.**

## संपर्क सूत्र

### दादा भगवान परिवार


**अडालज :** **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421
**फोन :** +91 79 3500 2100, +91 9328661166/77
E-mail : info@dadabhagwan.org

**मुंबई :** **त्रिमंदिर,** ऋषिवन, काजुपाडा, बोरिवली (E)
फोन : 9323528901

| | | | |
|---|---|---|---|
| **दिल्ली** | : 9810098564 | **बेंगलूर** | : 9590979099 |
| **कोलकता** | : 9830093230 | **हैदराबाद** | : 9885058771 |
| **चेन्नई** | : 7200740000 | **पूणे** | : 7218473468 |
| **जयपुर** | : 8890357990 | **जलंधर** | : 9814063043 |
| **भोपाल** | : 6354602399 | **चंडीगढ** | : 9780732237 |
| **इन्दौर** | : 6354602400 | **कानपुर** | : 9452525981 |
| **रायपुर** | : 9329644433 | **सांगली** | : 9423870798 |
| **पटना** | : 7352723132 | **भुवनेश्वर** | : 8763073111 |
| **अमरावती** | : 9422915064 | **वाराणसी** | : 9795228541 |

**U.S.A. :** **DBVI Tel. :** +1 877-505-DADA (3232),
**Email :** info@us.dadabhagwan.org

**U.K. :** +44 330-111-DADA (3232)

**Kenya :** +254 795-92-DADA (3232)

**UAE :** +971 557316937

**Dubai :** +971 501364530

**Australia :** +61 402179706

**New Zealand :** +64 21 0376434

**Singapore :** +65 91457800

**www.dadabhagwan.org**

## जग कल्याणकारी आप्तवाणी

निरंतर, दात घासतानासुद्धा हे ( टेपरेकॉर्डर ) ठेवले जाते. एक शब्द निघाला, तर त्यालाही हे लोक सोडत नाहीत. आणि नंतर त्याची पुस्तके छापली जातात. लोक ती वाचतील तर कल्याण होऊन जाईल. ही वाणी वाचताच हृदयतृप्ती होईल. या काळाचे हे मोठे आश्चर्यच आहे! अमेरिकेत तर ही आप्तवाणी वाचून लोक आफरीन झाले आहेत. जगासाठी हितकर आहे ना! संपूर्ण जगाचा कचरा काढून टाकेल अशी ही वाणी आहे.

\- दादाश्री

आत्मविज्ञानी 'ए.एम.पटेल' यांच्या आत प्रकट झालेल्या

# दादा भगवानना असीम जय जयकार हो



dadabhagwan.org


9 789391 375690

Printed in India

Price ₹ 150